ईश्वर असला पाहिजे. जर तो सुद्धा व्यापक नसेल तर यांनाच ईश्वर मानावे लागेल. कोण्या एकालाच ईश्वर मानण्याचा आग्रह असेल तर तो आग्रहच राहिल. तसा आग्रह नसल्यास एकच ईश्वर आहे हे सिद्ध होईल.

जीवसम्बन्धः— द्वितीय अध्यायाच्या तृतीय पादाचे नांव 'जीवसम्बन्धः' असे आहे. 'ममैव अंशो जीवलोके जीवभूतः सनातनः ।'[18] असे भगवद्‌गीतेत श्रीकृष्णाने म्हटले आहे. यावरून हे स्पष्ट होते की जीव ईश्वराचा अंश आहे आणि तो अनेक आहे असेही म्हटले आहे. परंतु जीवत्व केवळ व्यावहारिक आहे. कारण समाधीमध्ये ते जीवत्व बाधित होते. तसेच जीवाची उत्पत्ती होणे संभव नसल्याने तो अनादि आहे. कारण जो उत्पन्न होतो तो नष्ट होतो. एवढेच नव्हे तर जीवाचा नाश मानल्यास 'अविनाशि वा अरे अयमात्मा अनुच्छित्तिधर्मा ।' या श्रुतिवाक्याला विरोध येतो. या विश्वात सहा अनादि पदार्थ आहेत. 1. जीव 2. ईश्वर 3. चित्/ब्रह्म 4. जीव व ईश्वराचा परस्पर भेद 5. अविद्या 6. अविद्या व जीवाचा संबंध.

'तत्त्वबोध' नामक ग्रंथात सत्ताद्वयवाद स्पष्ट करताना असेच सहा पदार्थ गुलाबराव महाराजांनी सांगितले आहेत. ईश्वर अंशी आहे तर जीव अंश आहे. परंतु अखंड असल्याने जीव आभासही आहे. उपाधींनी मर्यादित नसल्याने हा अवच्छिन्न नाही. जीवाला आपला आनंद व स्वातंत्र्य असल्याने ईश्वराचे प्रतिबिम्ब आहे. जीव व ईश्वराचा अंश व अंशी. संबंध राजा आणि सेवकाच्या संबंधाप्रमाणे आहे. जीवाला अंश मानल्यास सर्व वैदिककर्म व उपासना संभव आहे. पाण्यात सूर्यासारखा जीव ईश्वराचा आभास आहे किंवा आरश्यात मुखाप्रमाणे जीव ईश्वराचे प्रतिबिम्ब आहे. आकाश एक असूनही घटाकाश, इ. आरोप होतो, तसेच जीवत्व आरोपित आहे. त्या आरोपाने जीवाला सर्व धर्म प्राप्त होतात. (हाच विषय गुलाबराव महाराज विरचित 'शास्त्रसमन्वयः' नामक ग्रंथात आलेला आहे की, धर्मांवरही आरोप होतो) धर्मी तर स्वयंसिद्ध आहे. जीव व ईश्वराचा भेद स्वप्नासारखा कल्पित आहे. ईश्वराचा अंश असल्याने ईश्वराचा दाससुद्धा आहे, तसेच प्रतिबिम्ब, आभास व अवच्छेदसंबंध असूनही जीव ईश्वराचा अंश आहे आणि ईश्वराची पत्नी आहे.



ईश्वर पती आहे. या दोघांची लीला म्हणजेच हे विश्व.

तन्त्राऽतन्त्रः — गुलाबराव महाराजांनी 'तन्त्राऽतन्त्रः' नामक चतुर्थ पादात जीवस्थितीचा विचार केला आहे. पहिल्या तीन सूत्रांमध्ये गुलाबराव महाराज म्हणतात की, जीव अल्पज्ञ असल्याने अधर्म आचरणामुळे व त्याचे ज्ञान इंद्रियाधीन असल्यामुळे अल्प आहे. हा जीव आपल्याच इच्छेने सृष्टिकर्ता आहे. तर तो बालक्रीडेप्रमाणे मिथ्या आहे. जीव नवीन कृती करण्यासाठी स्वतंत्र आहे. कारण ती कृती अत्यंत छोटी असते. हा जीव आपल्या प्रयत्नाची अपेक्षा ठेवतो. असे जर नसेल तर विधी आणि प्रतिषेधरूपाची क्रिया व्यर्थ होते. त्याचे ज्ञान ईश्वराच्या कृपेत परिणत होते. जीवात 'मी' ही भावना आरोपित मानली जाते. 'अहं इदम्' या रूपाचे जे ज्ञान होते ते मिथ्या आहे. हा विषय ब्रह्मसूत्रशांकरभाष्यात आलेला आहे. —'अहं इदं मम इदं इति नैसर्गिकोऽयं लोकव्यवहारः ।' हाच विषय पुराणमीमांसाभाष्यात देखील गुलाबराव महाराजांनी स्पष्ट केला आहे. ते म्हणतात —

'अहमिदं प्रत्ययामत्रव्यवहारावछिन्नतया भासमानयोः भोक्तृभोग्ययोरन्योन्य— भावानुपपत्तावपि प्रत्ययमात्रत्वेनैव बृहद्‌देहादिषु व्यभिचरति ।'[19]

वस्तुतः अहम् आणि इदम् या दोघांचे जे मूळ आहे त्या स्थितीत जीवाला प्रवृत्ती किंवा निवृत्ती होत नाही. अर्थात् जीवाला विधीचा निषेध होत नाही. तरीसुद्धा विधी किंवा प्रतिषेध व्यर्थ नाही. धर्मपालन केले नाही तर अनेक विघ्ने येऊ शकतात.

या पादात जीवाच्या स्वातंत्र्यावर विचार करतांना गुलाबराव महाराजांनी हे स्पष्ट केले आहे की, जीव ईश्वराचाच अंश आहे आणि परतंत्र आहे. ईश्वर मायायुक्त आहे आणि स्वतंत्र आहे.

'ईश्वरदर्शनम्' या ग्रंथात दोन अध्याय व प्रत्येक अध्यायात 4 पाद उपलब्ध आहेत. यांचे स्वरूप बघून असे वाटते की, ब्रह्मसूत्रांप्रमाणेच या ग्रंथात प्रत्येक 4

पादाच्या 4 अध्यायांमध्ये लिहिण्याची गुलाबराव महाराजांची इच्छा असावी. परंतु 4–4 पादांचे दोन अध्यायच उपलब्ध आहेत. ब्रह्मसूत्राच्याच शैलीत ग्रंथाचा आरंभ गुलाबराव महाराजांनी केलेला दिसतो.

ईश्वराचा साक्षात्कार होण्यासाठी या सूत्रग्रंथाची प्रवृत्ती झालेली आहे. परंतु या ग्रंथाचे प्रयोजन ब्रह्मज्ञान नसून, ज्ञानोत्तर भक्तीचे शास्त्र जाणल्यानंतर भगवंताचे परमप्रेम मिळावे, यात आहे. 'अथात ईश्वराराधनजिज्ञासा ।'[20] जिज्ञासा कशाची? तर ईश्वराच्या आराधनेची – म्हणजे भक्तिशास्त्राची. पहिल्या पादात ईश्वराची सामान्य सिद्धी केलेली आहे.

ईश्वर मायायुक्त असला तरी मायेच्या अधीन नसून स्वतंत्र आहे. जैमिनी, तार्किक, शाक्त, अनार्य, अवैदिक, व्याकरण, सांख्य, योग, वगैरे सर्व वैदिक–अवैदिक दर्शनातून ईश्वर मानणे भाग पडते व शेवटी लक्षणेने वेदान्ताचा ईश्वरच सिद्ध होतो, असा सर्व दर्शनांचा संकलनात्मक सिद्धांत दुसऱ्या पादात मांडला आहे.

हा ईश्वर अनेक नसून एकच असल्याची सिद्धी तिसऱ्या पादात केली आहे.

चौथ्या पादात ईश्वरच व्यक्त आणि अव्यक्त म्हणजे सगुण आणि निर्गुण झाला आहे. त्यात न्यून–पूर्ण असा भेद नाही. निर्गुण ब्रह्मच अनध्यस्तविवर्त झाल्याने 'एकदेशी इव साकारासारखे' भासते. प्रीतिमंतांना निर्गुण ब्रह्मच रामकृष्णादि सगुणरूपाने प्रतीत होते. व्यक्त आणि अव्यक्ताचे ऐक्य प्रतिपादन यात केलेले आहे.

दुसऱ्या अध्यायातील प्रथम पादात, निरीश्वरवादाचे समूल आणि सोपपत्तिक खंडन आढळते. विरोध केला तरी स्वसिद्धांतच महाराज प्रतिपक्षाच्या गळी कसा उतरवितात हे पाहणे अतिशय मनोरंजक आहे. 'विरोधादुभयसिद्धिः ।'[21] वाद केला तर अनिर्णय. अनिर्णयामुळे मौन ठेवले तर संशय. संशय दाखविला



तरी संशयाचा निश्चयच होतो व निश्चय केला म्हणजे अस्तित्व मानावेच लागते. अशी अनर्थ परंपरा दाखवून देऊन महाराजांनी बिनतोड युक्तिवाद केला आहे.

दुसऱ्या अध्यायातील दुसऱ्या पादात ईश्वर कोण? शंकर की विष्णू? असे दोन्ही पक्ष घेऊन मनोरंजक रीतीने परस्परांचे दोष दाखवून परस्परांचे श्रेष्ठत्व मांडले आहे. नंतर देवी श्रेष्ठ की देव श्रेष्ठ? राम श्रेष्ठ की कृष्ण श्रेष्ठ? याचाही अनिर्णय घोषित केला आहे. शेवटी ''आग्रह धरला तर आग्रहच उरतो आणि आग्रह सोडला तर दोन्ही एकच होऊन जातात'' असा उत्तमसमन्वयात्मक निर्णय केला आहे. त्यामुळे हे अलातचक्रपरिवर्तन मनोवेधक झाले आहे.

दुसऱ्या अध्यातील तिसऱ्या पादात जीव – पत्नी व ईश्वर – पती असा संबंध दाखविला आहे. अंशांशित्व, बिंबप्रतिबिंबत्व वगैरे सर्व भेद व्यावहारिक सत्तेत आहेत. पारमार्थिक सत्तेत किंवा समाधीत जीवेशांचे अत्यंत ऐक्य असल्याने सर्व भेद लीलामात्र आहे. –''एकाकी न रमते'' या श्रुतीप्रमाणे ईश्वरच स्वतःचा आनंद पुनः पुनः घेण्यासाठी द्वितीय इव झाला आहे असे यात मांडले आहे. अशा जीवाला स्वतःची जी भिन्न सत्ता प्रतीत होते ती नाहीशी करण्यासाठी भगवदाज्ञारूप विहित धर्माचे पालन करण्यास सांगितले असून शेवटी जीवेशांचे ऐक्य प्रतिपादले आहे. नास्तिक दर्शनांचे खंडन करून ईश्वराची सिद्धी, जीवाचे स्वरूप या ग्रंथात विशेष रूपाने सांगितले आहे.

यानंतर बहुतेक उपासना आणि मुक्तीवर विचार करण्याचा प्रयत्न गुलाबराव महाराजांनी केला असेल. पण हा ग्रंथ अपूर्ण राहिल्यामुळे तो विषय अस्पृष्ट आहे.

# 2. अन्तर्विज्ञानसंहिता

'अन्तर्विज्ञानसंहिता' या ग्रंथात महाराजांनी अलौकिक ज्ञान आणि ब्रह्मज्ञान यांचे निरूपण सूत्रात्मक पद्धतीने केले आहे. या ग्रंथात एकूण 233 सूत्रे आहेत. ग्रंथाचा प्रारंभ ज्ञानेश्वर माऊलीला नमस्कार करून केला आहे व ग्रंथ लिहिण्यामागचा आपला उद्देश प्रस्तुत केला आहे. ते म्हणतात

'श्रीमज्ज्ञानेश्वरं देवं श्रीगुरुं करुणार्णवम् ।
नत्वाऽन्तर्ज्ञानहेतुत्व सूत्रजातमुदीर्यते ।।'[22]

'अन्तर्ज्ञान व्हावे म्हणून मी हा ग्रंथ लिहीत आहे, असे महाराज म्हणतात. 'अथान्तर्ज्ञानजिज्ञासा ।'[23] या प्रतिज्ञावाक्याने ग्रंथारंभ झाला आहे. चित्ताविषयी विचार करतांना महाराजांनी पुढील सूत्र दिले आहे.

'अन्तःकनिष्ठस्वभावादूर्ध्वम् ।'[24]

अर्थात् जे चित्त बाहेर जाऊन विषयाला ग्रहण करते. जर त्याला ऊर्ध्वगती प्रदान केली तर ते आत्मतत्त्वापर्यंत पोहचते. 'सर्वाश्रयम चित्तम् ।'[25] अर्थात् चित्त हा सर्वांचा आश्रय आहे. जे जे व्याप्त आहे, विस्तृत आहे त्यांचा आश्रय चित्तच आहे. अन्तर्ज्ञान होण्यासाठी शब्दज्ञान हे सहकारी कारण आहे. ज्या साधकाच्या मनात अंतर्विज्ञान उत्पन्न होते तो सर्वज्ञ होतो. ही सर्वज्ञता दोन प्रकारची आहे. 1. अव्युत्पत्ती 2. व्युत्पत्ती. याचेही दोन आश्रय आहेत. अशुद्ध आश्रय आणि शुद्ध आश्रय.

ज्ञानाच्या भूमिका – कामसंकल्पादींनी अशुद्ध ज्ञान होते तर श्रवण, मनन आणि निदिध्यासनाने शुद्ध ज्ञान होते. या दोहोंद्वारे ज्ञानाच्या एकूण 14 भूमिका उत्पन्न होतात. 14 भूमिका सांगितल्या असल्या तरी प्रत्येक अनन्त आहे.

'द्वयोरपि भूमिका चतुर्दश ।'[26]

या चौदा भूमींचे अनेक भेद आहेत. योगवासिष्ठात अज्ञानाच्या सात



भूमिका व ज्ञानाच्या सात भूमिका वर्णिल्या आहेत. अन्तर्विज्ञानाने श्रद्धा उत्पन्न होण्यास मदत होते. प्रयत्नांनी शोक दूर होतो. 'कनिष्ठस्वभावात् ऊर्ध्वत्वे चमत्कृतिः ।'[27] या नुसार विषय व त्याच्या तादाम्य एकत्वाला 'कानिष्ठ्य' म्हणतात. आत्मा हा श्रद्धारूप असतो. या चौदा भूमींपैकी ज्ञानाच्या सात भूमींमध्ये सर्वज्ञता आपेक्षिकी असते. अज्ञानभूमिकांमध्ये सर्वज्ञता आपेक्षिकी नसते.

'आपेक्षिकी तत्र सर्वज्ञता । द्वितीये नापेक्षिकी ।'[28]

ज्ञानभूमींचे वर्णन करतांना महाराज म्हणतात

'श्रद्धाविचारध्यानज्ञानानि भूमयः ।'[29]

श्रद्धा दोन प्रकारची असते. 1. चमत्कृती 2. योगज.

कनिष्ठापासून ऊर्ध्व स्थिती म्हणजे सिद्धीची अपेक्षा 'चमत्कृती', तर निष्काम कर्माची अपेक्षा ही 'योगज' होय.

'यथोचितवर्णाश्रमैस्ततो मलहानिः ।'[30]

मलहानी म्हणजे अन्तःकरणातील मल, दोष दूर होणे. वर्णाश्रमानुसार विहित धार्मिक कर्मांचे पालन केल्याने कामरहित झाल्यावर (निष्काम) मनोदोष दूर होतात. हे बहिरंग आहेत. हे सिद्ध झाल्यावर आत्मज्ञानाकडे जाण्याचा निर्धार करावा. हा चित्तवृत्तींचा सजातीय प्रवाह आहे. उपासनेद्वारे या स्थितीची प्राप्ती होते. उपासना हीच 'आवृत्ती' आहे. आवृत्ती म्हणजे एकाच चित्तवृत्तीचा प्रवाह वारंवार येणे. कोऽहम्, इत्यादि विचार श्रवण, मननाने दृढ करावे. कपिलमहर्षींच्या मते ही 'विक्षिप्त स्थिती' होय.

ध्यानलक्षण – ध्यानाचे लक्षण वर्णिताना गुलाबराव महाराज म्हणतात –

'ध्यानं तदाकारवृत्तिः ।'[31]

कोणत्याही पदार्थासोबत जेव्हा मन तदाकार होते त्याला 'ध्यान' म्हणतात. 'प्रगृहीतशाखेव ।'[32] या स्थितीला 'संश्लेष' किंवा 'लय' म्हणतात. म्हणजेच वस्तूचे

तद्रूप होणे हेच ज्ञान आहे. याची विस्मृती म्हणजे अज्ञान होय. अज्ञान वासनांच्या आधिक्याने दृढ होते आणि निरीक्षणाने कमी होते. म्हणून निरीक्षण आवश्यक आहे. हे निरीक्षण दोन प्रकारचे आहे. 1. सजातीय 2. विजातीय

सजातीय निरीक्षणात जगन्मिथ्या हे ज्ञान होते. यात अज्ञानाच्या भूमींचा आधार घ्यावा लागतो उदा. जलतरणवत् – अज्ञान पार करण्यासाठी भूमिका आणि विजातीय निरीक्षणात 'ब्रह्मसत्यं' असे ज्ञान होते. यात ज्ञानभूमींचे ग्रहण करावे लागते.

अज्ञानभूमींची अव्युत्पत्ती आणि व्युत्पत्ती आवश्यक आहे. अज्ञानभूमिकांना दूर करावे आणि ज्ञानभूमींचे ग्रहण करावे. स्वप्न, इ. हे ज्ञानभूमीचे आश्रय होऊ शकतात. तर श्रुती, स्मृती, इतिहास, आचार्य यांच्याद्वारे प्राप्त ज्ञानाने सात्त्विकवृत्ती दृढ करावी.

'सत्त्वोत्कर्षादौषधम् ।'[33]

योगसूत्रामध्ये सुध्दा 'जन्मौषधिमन्त्रतपः समाधिजाः सिद्धयः ।'[34] तसेच 'तत्र ध्यानजमनाशयम् ।'[35] असे सूत्र आले आहेत. ध्यानाने जे चित्त निर्माण होते, ते योगानुभावासाठी समर्थ असते. सात्त्विक अवस्था वाढली तर औषध फल देते व त्याने भाविबोध उत्पन्न होतो. सात्त्विकता भविष्यकाळाच्या ज्ञानासाठी आवश्यक असल्याने तिचे प्रामाण्यही आहे. यासाठी गुलाबराव महाराजांनी खालील मते प्रस्तुत केली आहेत.

1) 'प्रतिभेयमिति भोजः ।'[36] या सत्त्वोत्कर्षाला 'राजमार्तण्ड' नामक योगव्याख्यानात भोजराज 'प्रतिभा' असे म्हणतात.

2) 'ऊहनिमित्तमिति वाचस्पतिः ।'[37] वाचस्पति मिश्र यांच्यानुसार भाविबोधाचे कारण 'ऊह' (तर्क) आहे.

3) 'ऋतम्भरेति पतञ्जलिः ।'[38] पतञ्जली महर्षी यांच्यानुसार हे ज्ञान (प्रज्ञा) 'ऋतम्भरा' म्हणविले जाते.



4) 'भिक्षुश्चानौपदेशिकम् ।'[39] विज्ञानभिक्षू यांच्यानुसार हे ज्ञान विना उपदेश उत्पन्न होणारे आहे.

5) 'तारकमिति व्यासः ।'[40] योगसूत्रांवर व्यासभाष्य प्रसिद्ध आहे. त्यानुसार या ज्ञानाचे नाव 'तारक' असे आहे.

6) 'बोधहेतुरिति वसिष्ठः ।'[41] योगवासिष्ठात आचार्य वसिष्ठानुसार हे ज्ञान साक्षात्काराचा हेतू आहे.

7) 'सिद्धप्रज्ञेति ताताः ।'[42] ज्ञानेश्वरांच्या अनुसार हीच 'सिद्धप्रज्ञा' आहे.

'ईश्वरानुग्रहात् तज्जः ।'[43] ईश्वराच्या अनुग्रहाने तो सत्त्वोत्कर्ष उत्पन्न होतो. असेही म्हणता येईल की, सत्त्वोत्कर्षांने अनुग्रह होतो. ब्रह्मसूत्रांत देखील 'शास्त्रयोनित्वात् ।'[44] आणि योगसूत्रांत 'तत्र निरतिशयं सर्वत्र बीजम् ।'[45] असे म्हटले आहे. कारण श्रुती, इत्यादि ईश्वरनिर्मित आहेत. केवळ मुख्य–तात्पर्यांमध्ये भेद असतो. अर्थात् त्यांचे अंतिम तात्पर्य काय आहे हे सांगताना भेद दर्शवितात. हे सर्व श्रुती, इत्यादि ईश्वरनिर्मितच आहेत किंवा ईश्वराचे यथार्थ ज्ञान प्राप्त केल्यावर प्रमाण होतात. गुरु व देवतेच्या आदेशाच्या रूपात जी स्वप्ने असतात ती यथार्थ असतात. स्वप्ने तीन प्रकारची असतात.1) अन्यार्थ (एक–दुसऱ्याचे सूचक असे) 2) अपार्थ (व्यर्थ अपगत अर्थ) 3) यथार्थ (सत्य). अन्यार्थ स्वप्न ही कधी कधी सूचना प्राप्त झाल्याने यथार्थ होतात. यथार्थ स्वप्नामध्ये संशय, अन्यार्थ स्वप्नात विकल्प असू शकतात.

चांगल्या संस्कारांमुळे कधी कधी संभ्रम उत्पन्न होतो. तसेच त्यांच्यामुळेच ज्ञानही होते. किंवा अनेक प्रकारचा संकल्प होऊ शकतो. जर तो अलौकिक असेल तर त्याचे ग्रहण केले पाहिजे. एकाच तत्त्वात निष्ठा असणे ज्याचा स्वभाव आहे ती म्हणजे स्वानुभूती. या स्वानुभूतीतही गुरु, इत्यादींचा आदेश प्राप्त होतो. 'प्रातिभाद्वा सर्वम् ।'[46] असे योगसूत्रात म्हटले आहे. परंपरेचा अर्थ आपल्या इच्छेने करू नये. जेव्हा वासना वाढते तेव्हा अज्ञानाच्या वेगवेगळ्या भूमिकांचा विनियोग

होतो. जर सत्त्व गुणांचा उत्कर्ष झाला असेल तर ज्ञान भूमिकांमध्ये त्यांचा विनियोग करायला हवा. या वासना व सत्त्व हे दोनही अनंत आहेत. वासना अनंत झाल्यावर हे जगत् ब्रह्मापेक्षा विलक्षण आहे असे ज्ञान होईल. तेव्हा शरीरच आत्मा आहे हा वाद राहणार नाही. परंतु जेव्हा सत्त्व अनंत होते तेव्हा माहात्म्य प्राप्त होते. हे सत्य आहे परंतु समूहात सात—सात चे दोन गण असतात. अज्ञानाचे स्थान सात दशांमध्ये असते. त्या सात दशा म्हणजे 1) बीजजाग्रत् 2) जाग्रत् 3) महाजाग्रत् 4) जाग्रत्स्वप्न 5) स्वप्न 6) स्वप्नजाग्रत् 7) सुषुप्ती.

'समष्टिव्यष्टिसृष्ट्यभिमुखमेकजीवाख्यमज्ञानोपहितं चैतन्यं बीजजाग्रत् ।'[47]

'बीजजाग्रत्' म्हणजे त्याप्रकारचे अज्ञानोपहित चैतन्य ज्याचे नांव जीव आहे. समष्टी आणि व्यष्टी सृष्टीप्रती जेव्हा अभिमुख होते तेव्हा ते बीजजाग्रत् असते. हेच चैतन्य जेव्हा अंतकरणाला उपाधी बनविते, अनेक जीवसंज्ञक जीवाभासाचे रूप धारण करते.

'स्थूलादिष्वहंममेतिप्रत्ययो जाग्रत् ।'[48] स्थूलपदार्थांमध्ये 'मी आहे', 'हे माझे आहे' असे जे ज्ञान होते ती म्हणजे 'जाग्रदावस्था'. याच्या पूर्वावस्थेची कल्पना करू न शकल्याने किंवा पूर्वी नसल्याकारणाने ही अवस्था 'जाग्रत्' आहे.

'अभ्यासादियमेव महाजाग्रत् भवति ।'[49] हेच ज्ञान वारंवार होणे म्हणजे 'महाजाग्रत्' अवस्था. वारंवार हे ज्ञान झाल्याने पूर्वजन्म, इत्यादि कारण आहेत. 'जाग्रत्' अवस्थेत मन दृढ किंवा अदृढ असते. 'जाग्रत्स्वप्न' अवस्थेत मनाचेच राज्य असते. परंतु यामुळे स्वप्नात अतिव्याप्ती दोष होणार नाही, कारण स्वप्नावस्थेसाठी निद्रा अपेक्षित असते, जाग्रत्स्वप्नात ती अपेक्षित नसते. जाग्रत् अवस्थेतही अतिव्याप्ती नसते, कारण जाग्रत् स्वप्नामध्ये आपल्यापेक्षा अन्य शरीराची प्रतीती होते. यासाठी शुकमहर्षी व भागवताचे व्याख्याकार श्रीधरस्वामी प्रमाण आहेत असे गुलाबराव महाराज म्हणतात.



या जाग्रत्स्वप्नाच्या अमृदु दशेमध्ये शुक्तिरजत, रज्जुसर्प, इत्यादि ज्ञान होते. याचेच मध्य, तीव्र, इत्यादि दशांमध्ये मनाच्या परिणामाच्या रूपात वेगवेगळे ज्ञान होते. जाग्रत् व स्वप्न या दोहोंचे लक्षण यात असल्याकारणाने याला 'जाग्रत्स्वप्न' असे म्हणतात. या अवस्थेमध्ये 'स्वप्न' अनेकविध असतात. वारंवार होणाऱ्या ज्ञानाने आणि श्रुतीने हे जाग्रतही आहे. जाग्रत् अवस्थेत असत्य पदार्थाच्या आरोपाचे विषय असणेच 'स्वप्नलक्षण' होय. आरोप म्हणजे अल्पसमयासाठीच दिसणे. 'अल्पकालदर्शनग्रहणमारोपः ।'[50] हे आरोप ज्ञाननिद्रेत आदि, मध्य व अंती असते. भावना आंदोलित करणे, इत्यादि मध्ये क्रियेसाठी याचे स्थान कंठापासून हृदयापर्यंत सांगितले आहे. इतर शास्त्रांमध्ये जो 'नाडी' शब्दाचा प्रयोग केला आहे. तो शरीराचा भेद सूचित करण्याकरिता आहे. या अवस्थेत अनुभव केलेल्या विषयाचेच प्राधान्य असते. कधी—कधी न अनुभवलेला विषय भासमान होतो. जसे, कुणी आपलेच शिरच्छेदन बघतो. म्हणूनच या अवस्थेत शरीरच आत्मा असतो, हा वाद नसतो. या अवस्थेत आत्मशक्ती प्रकटित होते. जाग्रत् व स्वप्न अनुभवांची संधी झाल्याने हे सत्य होते. शास्त्रप्रमाणांनीही हे सत्य होते. अन्यार्थ, अपार्थ आणि यथार्थ या भेदांनी स्वप्ने तीन प्रकारची असतात, असे जे वर सांगितले आहे त्यात अपार्थ स्वप्न त्याज्य आहे. कधी कधी तीनही प्रकारच्या स्वप्नांमध्ये इष्ट ज्ञान होते. ते फक्त ज्ञानवान् लोकांनाच होते. हे महाजाग्रताप्रमाणे आहे किंवा नंतर होणाऱ्या भ्रमाप्रमाणे. याला स्थिर मानल्याने ज्ञान दृढ होते. चिरकालपर्यंत जाग्रत् दर्शन न झाल्याने ज्ञान दृढ होते. हीच 'स्वप्नजाग्रत्' स्थिती आहे. ही स्थिती जिवंतपणी किंवा मेल्यानंतरही होते. वरील सहा अवस्थारहित स्थिती आणि जी अन्य चित्तवृत्तींच्या अभावाचे कारण असलेला जो तमोगुण आहे. त्याचे आलंबन करून होणारी चित्तवृत्ती म्हणजे 'सुषुप्ती'.

'भूमिषट्करहिताभावप्रत्ययावलम्बना वृत्तिः सुषुप्तिः ।'[51] या अवस्थेत आत्म्याच्या आनंदरूपाचे ज्ञान होते. ही स्थिती भविष्यकालीन दुःखाचे बीजरूप आहे. शिळा, इ. मध्ये ही अवस्था दृढ असते. अन्य पदार्थांमध्ये ही अवस्था

काळानुसार दृढ होते. इथपर्यंत 'अज्ञानभूमिका' सांगितल्या आहेत. या सर्व अवस्था परस्पर अत्यंत सन्निहित व अनंत असतात. निम्नस्तराच्या योग, मंत्र, इन्द्रजाल, इ. यांच्या परस्पर संयोगाची साधने आहेत. उदा. मिठापासून बनविलेली कृष्णाची मूर्ती, एकच चंद्र दोन भासणे, इत्यादि भ्रमाप्रमाणे. या अवस्थांमध्ये यांचा जो आश्रय अज्ञान आहे, तो वर्धित होतो. 'अव्युत्पत्तिः सर्वज्ञता च ।'[52] अव्युत्पत्ती व सर्वज्ञता प्राप्त होते, यालाच प्रवृत्ती असे म्हणतात. स्वर्ग, नरक, इ. प्रवृत्तीतच असतात. सत्त्व, इ. भेदांमुळे स्वर्ग, नरक, इ. मध्ये भेद असतो. भोगांनुसार ती संमिश्रही असते. ही स्थितीच निवृत्तिकरिता उपकारक असते – जलतरणवत् . जेव्हा संमिश्र सत्त्व नष्ट होते तेव्हा शुद्ध सत्त्वाचा परिणामच ज्ञानभूमींच्या रूपात असतो. या ज्ञानभूमी सात आहेत. अज्ञानभूमिकांमध्ये भोगाचा अनुभव करणारे नष्ट होतात, यातही असेच असते. अज्ञानभूमिकांमध्ये आपापल्या अधिकारानुसार देवता, इत्यादींची स्थिती असते. क्षिप्त, मूढ, विक्षिप्त या अवस्थांचाही त्यात अंतर्भाव असतो. ज्ञानभूमींमध्येही आपापल्या अधिकारानुसार स्थिती असते. ती स्थिती ब्रह्मज्ञानी, इ. रूपात असते. एकाग्र व निरुद्ध अवस्थांचा या ज्ञानभूमीतच अंतर्भाव होतो.

'शुभेच्छा विचारणा तनुमानसी सत्त्वापत्तिरसंसक्तिः पदार्थाभाविनी तुर्यगा इति सप्त ।'[53] 1) शुभेच्छा 2) विचारणा 3) तनुमानसी 4) सत्त्वापत्ती 5) असंसक्ती 6) पदार्थाभाविनी व 7) तुर्यगा अशा सप्तज्ञानभूमी आहेत. यात 'शुभेच्छा' म्हणजे आत्मसाक्षात्कारासाठी आवश्यक साधनसंपत्ती. 'विचारणा' श्रवण, मनन, इत्यादींच्या रूपात असते. 'तनुमानसी' म्हणजे निदिध्यासन. या तनुमानसी नावाच्या ज्ञानभूमिकेत सर्व मुख्य प्रमाणे घेतली जातात. कधी कधी श्रवण व मननातही ती घेतली जातात. 'सत्त्वापत्ती' म्हणजे जीव व ब्रह्म एक आहे हे ज्ञान होणे. या स्थितीत राहणारा 'ब्रह्मविद्' म्हणविल्या जातो. 'असंसक्ती' म्हणजे आपापल्या स्वभावाने होणारी विरक्ती. या अवस्थेत राहणारा 'ब्रह्मविद्वर' म्हणविल्या जातो. काही लोकांच्या म्हणण्यानुसार या स्थितीतून तो आपणहून व्युत्थानस्थिती प्राप्त करतो. भक्तीनेही ही स्थिती प्राप्त होते. 'पदार्थाभाविनी' म्हणजे आत्म्याच्या



ज्ञानाने किंवा ध्यानाने जे पदार्थांचे विस्मरण होते ती ज्ञानभूमिका. ही स्थिती प्राप्त करणारा 'ब्रह्मविद्वरीयान्' असतो. काही लोकांच्या म्हणण्यानुसार तो या स्थितीतून बाह्य प्रेरणेने बाहेर येतो. 'तुर्यगा' म्हणजे आनंद आत्म्याचाच स्वभाव असल्याने आत्म्यात अनिर्वचनीय आनंदप्राप्तीची स्थिती. ही स्थिती प्राप्त करणाऱ्याला 'ब्रह्मविद्वरिष्ठ' असे म्हणतात. ब्रह्मविद्वरिष्ठ कुठल्याच प्रकाराने त्या अवस्थेतून बाहेर येत नाही. वसिष्ठ महर्षींच्या अनुसार तो जीवन्मुक्त होऊन फिरत असतो. त्या अवस्थेत भक्तीनेच प्रारब्धाचा नाश होतो. ती विष्णूची व शिवाची भक्ती असते. कारण ईश्वर एकच आहे. यालाच 'निवृत्ती' म्हणतात.

कर्तव्याची विवक्षा असेल तर साधने उपस्थित होतात. नरक, इ. दुःखाच्या त्यागाकरिता आणि स्वर्गसुख, इ. च्या ग्रहणासाठी जेव्हा लोक प्रवर्तित होतात तेव्हा ती साधने अनेक प्रकारची असतात. स्वप्न, इत्यादि सुद्धा साधने आहेत. भावनांचे आंदोलन याच अवस्थेत होते. मयूरपुच्छ व इंद्रजाल, इ. योग असतात. जन्म, औषधी, मंत्र व तप हे ही सिद्धीचे प्रकार आहेत. 'जन्मौषधिमन्त्रतपःसमाधिजाः सिद्धयः ।'[54] या योगसूत्रात देखील असेच सांगितले आहे. नेत्ररश्मिनिमीलन, इ. सिद्धी आहेत. यक्ष, गंधर्व, इ. विद्या अशाच प्रकारच्या असतात. किरातविद्या देखील अशीच आहे. शुद्ध अशा जेष्ठांच्या व्यवहाराने सुद्धा सिद्धी प्राप्त होते. शाबरी विद्या, इत्यादिनेही प्राप्त होते. परंतु शास्त्रचिंतन आणि स्वचिंतन यांनी सिद्धी व्हावयास हवी. यात अधिकता व सुलभता असते. आपल्या या मताच्या पुष्ट्यर्थ गुलाबराव महाराजांनी अनेक उदाहरणे दिलेली आहेत. न्यायसूत्राच्या वात्स्यायन भाष्यात सांगितले आहे की, शास्त्र व स्वविचार आप्त होऊन प्रमाण होतात. हेच योगवासिष्ठ व महाभारतातही सांगितले आहे. या सिद्धी क्षत्रिय, इत्यादींनाही मिळतात असे वेदात म्हटले आहे. छांदोग्य उपनिषदातील जानश्रुती (जनक) राजाची कथा प्रसिद्ध आहे.[54अ] तसेच या सिद्धी कोणालाही प्राप्त होऊ शकतात, असे पुराणांमध्येही आहे व सत्पुरुषांच्या वचनांवरूनही असेच दिसते. ज्याप्रमाणे एकलव्याने द्रोणाचार्यांच्या मूर्तीची स्थापना केली, तशीच कर्कटीने देवीची स्थापना केली असे

देवी भागवतात (दुर्गासप्तशती) दिसते. ही सर्व साधने अलौकिक सत्त्वाकरिता असतात. निवृत्तीकरिताही या साधनाचा उपयोग होतो. त्या त्या स्थानी उपदेश ग्रहणासाठीही त्यांचा विनियोग होतो. व्युत्थान अवस्थेत आनंदाच्या स्पर्शासाठी त्यांचा विनियोग होतो. देहात्मवाद निराकरणासाठी व दुसऱ्यांमध्ये श्रद्धा उत्पन्न करण्यासाठी त्यांचा विनियोग होतो. स्वतः निश्चय करण्यासाठीही या साधनांचा उपयोग होतो. तसेच समाधिस्थिती प्राप्त होण्यासाठीही त्याचा उपयोग होतो. कोणत्याही प्रकाराने प्रतिभा उत्पन्न होण्यासाठी या साधनांचा उपयोग होतो. कधी कधी अनेक प्रकारचा संयम प्रतिभेला जन्म देतो. प्रतिभेच्या संयमाने सर्वज्ञता प्राप्त होते.

प्रतिभेची व्याख्या करतांना गुलाबराव महाराज म्हणतात, 'निमित्तानपेक्षमविसंवादकं ज्ञानं प्रतिभा ।'[55] कारणाची अपेक्षा न ठेवता उत्पन्न होणारे यथार्थ ज्ञान म्हणजे 'प्रतिभा'. तसेच 'ऊहजं वा ।'[56] तर्काने होणारे ज्ञान म्हणजे 'प्रतिभा' आहे. श्रीकृष्णाच्या प्रसादानेच प्रतिभा प्राप्त होते हा सिद्धान्त आहे, असे महाराज म्हणतात. निवृत्तीत योग व ज्ञान ही दोनही साधने असतात. आणि मनाचा किंवा चित्तवृत्तिनिरोध म्हणजे योग. तसेच यथार्थदृष्टी म्हणजे ज्ञान. या अवस्थेत चित्ताचा नाश होतो. योगाने चित्तनाश होतो असे काहींचे म्हणणे आहे. परंतु योगसुद्धा ज्ञानाद्वारेच चित्तनाश करतो हाच शास्त्राचा निष्कर्ष आहे. ज्याप्रमाणे औषध कुणालाही रोगमुक्त करू शकते तसेच ज्ञानही चित्तनाश करू शकते. ज्ञानात जाती, वर्ण, इत्यादींचा नियम नसतो. प्रतिभेचा संयम केल्याने विवेकज्ञान अवश्य होते. निर्बीज समाधीच्या दृष्टीने संयमही बहिरंग आहे. जेव्हा निवृत्ती होते तेव्हा प्रतिभा आणि सर्वज्ञता असतात. मनाची एकाग्रता यात सामान्य असते. आपापल्या सत्त्वोत्कर्षाने त्यात क्रम येतो. साधनाशिवायही ज्ञानी जाणू शकतो. परंतु सर्वांचे मात्र तसे नसते, जसे पूर्वी पूर्वीच्या विषयाचे स्मरण होते तसे पूर्वजन्माचे ज्ञान होते. ते पूर्वजन्माचे ज्ञान भविष्यकाळाच्या कल्याणाकरिता असते. जसे पूर्वप्रत्यभिज्ञानाने भविष्यदिनाचा निश्चय होतो. म्हणून सर्वांनी आचार्य इ. पासून



म्हणजे गुरुमुखानेच ते प्राप्त करून घ्यावे, असे सांगून गुलाबराव महाराजांनी खालील वाक्यांनी ग्रंथाची समाप्ती केली आहे.

'श्रीज्ञानेशप्रसादेन श्रीकृष्णशिवयोरपि ।
उमाया राधिकादीनां चान्तर्विज्ञानसंहिता ।।'

।। हरिः तत्सत् श्रीमत्सद्गुरुज्ञानेश्वरकृपाप्रसादे सूत्रबद्धायाम्
अन्तर्विज्ञानसंहितायाम् अलौकिकज्ञान–ब्रह्मज्ञानयोर्निरूपणं समाप्तम् ।।[57]

श्री गुलाबराव महाराजांनी 233 सूत्रांमध्ये अन्तर्ज्ञान प्राप्तीसाठी चित्ताच्या अज्ञानाच्या सात भूमिका व ज्ञानाच्या सात भूमिका यांचा सांगोपांग विचार या ग्रंथात मांडला आहे. या भूमिकांच्या अभ्यासाने साधक 'तुर्यगा' या सर्वोच्च ज्ञानभूमीवर आरूढ होतो. यालाच 'जीवन्मुक्त' अथवा 'ब्रह्मविद्वरिष्ठ' असे म्हटले जाते. जीवन्मुक्त स्थितीत जेव्हा भक्ती प्राप्त होते, तेव्हा प्रारब्धदुःखाचा अभिभव होऊन समाधीचा अखंड आनंद मिळतो. या पूर्णावस्थेपर्यंतचे विवेचन महाराजांनी या ग्रंथाच्या निमित्ताने केले आहे.

या ज्ञानभूमिकांना श्रद्धा, विचार, ध्यान आणि ज्ञान हे आधारभूत आहेत. स्वप्न, संभ्रम, संकल्प, स्वानुभूती ही प्रमाणे आहेत. या सर्वांच्या सहाय्याने बाह्यसिद्धी आणि आन्तरसिद्धी प्राप्त केल्या जाऊ शकतात, याचे मार्गदर्शनही महाराजांनी या ग्रंथात केले आहे. संयमाने 'प्रतिभा' निर्माण होते. महाराजांनी प्रतिभेची व्याख्या खालीलप्रमाणे केली आहे–

'निमित्तानपेक्षमविसंवादकं ज्ञानं प्रतिभा ।'[58]

या प्रतिभेवर संयम साधल्यास अर्थात् धारणा, ध्यान, समाधी साध्य झाल्यास साधकाला संपूर्ण तत्त्वांचे ज्ञान होते, सर्वज्ञता प्राप्त होते. निर्बीज समाधी साधली जाऊन पुरुष पूर्णत्वाला प्राप्त होतो. महाराजांनी अलौकिक ज्ञान आणि ब्रह्मज्ञान होण्यासाठी गुरुमुखाने त्याचे श्रवण करावे असे आग्रहाने प्रतिपादित केले आहे.

परंज्ञान प्राप्तीचे अनेक उपाय दर्शनशास्त्रांमध्ये वर्णिले आहेत. महाराजांनी या सर्व उपायांची सांगड या ग्रंथात घातल्याचे दिसते. अत्यंत सुलभ आणि लघु व्याख्या महाराजांनी या ग्रंथात केल्या आहेत.



# 3. समसूत्री

'समसूत्री' या सूत्रात्मक लघुप्रकरणग्रंथात 15 सूत्रे असून गुलाबराव महाराजांनी काही प्रमुख सांख्यसिद्वांतांची 'समसूत्री' बनविण्याचा संकल्प केलेला आहे असे वाटते. सांख्यदर्शनात आध्यात्मिक, आधिदैविक आणि आधिभौतिक ही दुःखे दूर करण्यासाठी विवेकज्ञान हा श्रेष्ठ उपाय मानल्या गेला आहे.

'अथाकत्रयहानमखण्डकप्राप्तिश्चात्यन्तपुरुषार्थः ।'[59] या सूत्रात या दुःखांना दूर करणे आणि आनंद प्राप्त करणे हाच पुरुषार्थ आहे असे गुलाबराव महाराजांनी प्रतिपादित केले आहे. यात अद्वैत वेदान्ताची छाया स्पष्ट दिसते. कारण अद्वैत वेदान्तातही दुःखहानी आणि आनंदप्राप्तीलाच मोक्ष म्हटले गेले आहे.

'न दृष्टानुश्रविकाभ्यां तत्सिद्धिः क्षुत्प्रतिकारवन्निवृत्तेऽप्यनुवृत्ति–दर्शनात् ।'[60] या सूत्रात गुलाबराव महाराजांनी सांख्यकारिकेनुसार हे स्पष्ट केले आहे की या पुरुषार्थ सिद्धीकरिता तीन उपाय असतात. 1. लौकिक उपाय 2. वैदिकोपाय 3. शास्त्रोपाय. यांच्यात मोक्षरूपी पुरुषार्थ सिद्ध करण्यासाठी लौकिक आणि वैदिक उपाय असमर्थ आहेत,[61] असे सांख्यकारिकेनुसार गुलाबराव महाराजांनी स्पष्ट केले आहे. कारण लौकिकोपायात दुःखनाश किंवा आनंदप्राप्ती अंतिम आणि एकान्त असत नाही.[62] तसेच वैदिकोपायातही काही दोष असतात जसे–

1. अशुद्धी – यज्ञयागादि वैदिक कर्मांमध्ये पशु हिंसा होत असल्याकारणाने वैदिकोपाय अशुद्धिदोषाने दूषित आहेत.

2. क्षय – वैदिकोपायांनी प्राप्त फल नष्ट होते. जसे म्हटले गेले आहे की, जेवढे पुण्य आहे ते संपेपर्यन्त मनुष्य स्वर्गात राहतो आणि नंतर त्याला मनुष्यलोकात जन्म घ्यावा लागतो.

3. अतिशय – वैदिकोपायांनी अर्थात वैदिककर्मांच्या अनुष्ठानाने जे पुण्य प्राप्त

होते, त्याने मिळणारे फल पुण्याच्या प्रमाणानुसार असते. अर्थात, जास्त पुण्य करणाऱ्याला जास्त सुखप्राप्ती होते.

असे तीन दोष असल्याकारणाने वैदिकोपाय पुरुषार्थ देत नाही. त्यामुळे शास्त्रोपायाचाच अवलंब करावा लागेल. अर्थात् शास्त्रात सांगितलेल्या प्रकाराने पुरुषार्थाला सिद्ध करावे लागेल.

यानंतर गुलाबराव महाराजांनी सांख्यदर्शनाच्या सत्कार्यवादसिद्धांतासंबंधी सूत्र केलेले आहे. सांख्यदर्शनात म्हटले आहे की, 'प्रत्येक वस्तूपासून कोणतीही वस्तू निर्माण होऊ शकत नाही'. याच्या उदाहरणादाखल वाचस्पती मिश्र म्हणतात, 'तिळापासूनच तेल निर्माण होते, वाळूपासून नव्हे'. यावर गुलाबराव महाराज म्हणतात — सर्व कार्यपदार्थ एका सत्पदार्थापासून निर्माण होतात. जसे मुण्डकोपनिषदात् म्हटले आहे, 'सतः पुरुषात् केशरोमाः भवन्ति ।'[63] तसेच सत्पदार्थापासूनच सर्वांची निर्मिती होते. म्हणजे प्रमाणांमध्ये निपुण असलेल्या पंडितांनी या कार्यवादाचा अर्थात् सांख्यांच्या सत्कार्यवादाचा त्याग करायला हवा. या सूत्राने हे कळते की, सत्कार्यवादाचा अर्थ एका सत्पदार्थापासून सर्व कार्यपदार्थांचे निर्माण.

कठोपनिषदात श्रेयस् व प्रेयस् अशा दोन मार्गांचे वर्णन केलेले आहे. यात जो आपल्यासाठी हितकारक आहे तो 'श्रेयस्. या पार्श्वभूमीवर गुलाबराव महाराज म्हणतात, सत्य आणि मिथ्या यांचे विवेचन म्हणजेच 'श्रेयस्' आहे आणि मोक्षच सर्वोत्कृष्ट आहे. कारण श्रुतींमध्ये मोक्षालाच सर्वोत्कृष्ट म्हटले आहे.

आता बंधमोक्षाची व्यवस्था विचारांचा विषय होतो. गुलाबराव महाराज म्हणतात, आपल्या स्वभावाने जो बंधनात आहे, त्याच्याकरिता उपदेशाचे विधान व्यर्थ होते. कारण बंधन जर जीवाचा स्वभाव आहे तर तो त्याला कधीच सोडणार नाही. म्हणजे बंधन आगन्तुक अर्थात् कोणत्यातरी कारणाने झालेले आहे असे मानावे लागेल. वेदान्ताने अविद्याच ते कारण मानले आहे.64 एखाद्या विषयाचा



उपदेश झाल्यावरही त्याचे व्यवस्थित ज्ञान झाले नाही तर त्यासाठी वेदच प्रमाण आहेत. जीव स्वतः मुक्त आहे, त्याचे बंधन कृत्रिम आहे. जसे, 'शुभ्र कापडावर लाल रंगाची छाप आहे' असे जर म्हटले तर त्याचे खंडन करताना गुलाबराव महाराज म्हणतात, 'जीवाविषयी बंधावस्था असे काही उपरक्त नाही परंतु निमित्त दूर झाल्याने जीवाचा स्वभाव असाच व्यक्त होतो.

यानंतर 'महत्' तत्त्वाविषयी गुलाबराव महाराज स्पष्ट करतात की, सांख्यांचे 'महत्' कालसंबंधाने, देशसंबंधाने किंवा कर्मसंबंधाने महत् होऊ शकत नाही. कारण काळाच्या संबंधाने 'महत्' म्हटल्यावर प्रकृतीच्या अवस्थेत 'महत्' चे ज्ञान न होण्याचा प्रसंग उद्भवेल. देशाच्या संबंधाने 'महत्' सांगितले तर ते संभव नाही कारण 'महत्तत्त्व' प्रकृतीचे कार्य आहे. तो ईश्वराचा धर्म असल्याने स्थिरही नाही यावर गुलाबराव महाराज म्हणतात, की 'महत्तत्त्व' प्रकृतीवर आधारित आहे असे म्हणणेही योग्य नाही. कारण प्रकृति स्वतः परतंत्र आहे.[65] ग्रंथाच्या शेवटी महाराज म्हणतात—

'यापरी तत्त्वविवेका करूनि धरिसी मनात नित्य हरी ।
संसृतिबन्धन तुटुनी मोक्षाची तुज मिळेल पदवि खरी ।।'[66]

अत्यंत दुःखनिवृत्ती हे सांख्यशास्त्राचे ध्येय आणि परमानंद प्राप्ती मिळून एकच पुरुषार्थ वेदान्तात मांडला आहे. त्याच्या प्राप्तीसाठी जडचेतन विवेक येथे सांगितला आहे. 'जीव स्वतःला बद्ध समजत असला तरी बद्धता हा जीवाचा स्वभाव नाही. स्वभाव असता तर त्याला दुःखनिवृत्तीची इच्छा होणे कधीच शक्य नव्हते. त्याला मोक्षाचा उपदेशही व्यर्थच झाला असता. केवळ विचारांच्या साहाय्याने जरी त्याने भ्रमरूप अविद्येचा स्वतःपासून व्यतिरेक केला तरी तो स्वतंत्र आहे, असा याला अनुभव येतो. त्यावेळी श्रीहरीची प्रेमभक्ती केली की खरा मोक्ष मिळेल' असा विषय या ग्रंथात महाराजांनी मांडला आहे.

महाराजांनी परंपरागत सांख्यसिद्धान्तांचे पूर्णतः ग्रहण केले पण जे

सिद्धान्त वेदान्तविरोधी आहेत त्या सिद्धान्तांना वेदान्ताशी समन्वयात्मक पद्धतीने प्रतिपादित केले आहे. जसे सांख्यदर्शनात सत्कार्यवाद सिद्ध करण्यासाठी जे हेतू दिले त्यापैकी 'सर्वसम्भवाभावात्' हा हेतू न स्वीकारता वेदान्त्यांप्रमाणे एकच सत् तत्त्व या कार्यांमागे आहे, असे मानले आहे. अर्थात् सत्पदार्थापासून सर्व कार्यपदार्थ निर्माण होणे हाच 'सत्कार्यवाद' होय असे महाराज म्हणतात.

सांख्यदर्शनाच्या परंपरेप्रमाणेच त्रिविध दुःखांचा एकान्तिक आणि आत्यंतिक नाश हाच पुरुषार्थ असून त्यासाठी शास्त्रोपाय हाच श्रेष्ठ उपाय असल्याचे महाराजांनीही मान्य केले आहे.

महाराजांनी या ग्रंथात 'श्रेयस्' म्हणजे केवळ कल्याणमार्ग असा मोघम अर्थ न करता सत्–असत् किंवा सत्य–मिथ्या यांच्यातील विवेक म्हणजे 'श्रेयस' अशी व्याख्या केली आहे. सांख्याप्रमाणेच पुरुष स्वरूपतः मुक्त असून बंधन हे आगंतुक आहे, हे महाराजांना मान्य आहे.

सांख्य–योग–वेदान्त या शास्त्रांचा समन्वय करणे हा महाराजांचा मुख्य उद्‌देश होता आणि म्हणूनच यापैकी कोणतेच शास्त्र गौण नाही पण दृष्टीभेदाने ते भिन्न असल्याप्रमाणे भासित होते असे ते मानत होते. त्यामुळे सांख्याचे प्रकृतितत्त्व पूर्ण स्वतंत्र नसून ते परतन्त्र आहे. असे मानून त्याने ते वेदान्ताच्या अविद्येकडे जोडण्याचा प्रयत्न केल्याचे दिसून येते व याद्वारे एक समन्वय त्यांनी प्रस्थापित केला असे वाटते.



# 4. दुर्गातत्त्वम्

'दुर्गातत्त्वम्' नावाच्या सूत्रात्मक लघुग्रंथात गुलाबराव महाराजांनी दर्शनशास्त्राच्या मौलिक सिद्धांतांना सूत्ररूपात वर्णिले आहे. यात तीन उपदेश आहेत. प्रथम उपदेशात 21 सूत्रे, द्वितीय उपदेशात 23 सूत्रे तर तृतीय उपदेशात 29 सूत्रे अशी एकूण 73 सूत्रे आहेत.

ग्रंथारंभी गुलाबराव महाराजांनी आता 'अथातस्तत्त्वजिज्ञासा ।'[67] 'तत्त्व जाणण्याची इच्छा' असे सूत्र दिले आहे. हे मीमांसासूत्र ब्रह्मसूत्राच्या शैलीनुसार आहे. तत्त्वजिज्ञासेचे फळ दुसऱ्या सूत्रात सांगितले आहे. ते म्हणजे तत्त्व जाणल्याने दुःखत्रय दूर होतात आणि आधिदैविक, आधिभौतिक व आध्यात्मिक या तीन दुःखांचा येथे परामर्श आहे. सृष्टीत सर्व प्राणी दुःखाला दूर करू इच्छितात. त्यांना दूर करण्याचा उपाय म्हणजे सत्य जाणणे हा आहे. सृष्टीतील सर्व प्राणी दुःख दूर करू इच्छितात. दर्शनशास्त्र हे दुःख दूर करण्याचे उपाय सांगतात.

सर्व दर्शनांमध्ये दुःखाचे कारण सत्य न जाणणे हेच सांगितले आहे. म्हणजे सत्य जाणणे हाच दुःख दूर करण्याचा उपाय आहे. गुलाबराव महाराजांनी तत्त्वाचे दोन प्रकार तिसऱ्या सूत्रात सांगितले आहेत. ते आहेत सत्य आणि मिथ्या.

तसेही 'तत्त्व' शब्दाची व्याख्या करतांना वात्स्यायन महर्षींनी 'न्यायसूत्रात' या 'सतश्च सद्‌भावः, असतश्चासद्‌भावः तत्त्वम् ।' अर्थात् सत्याचे आपले स्वरूप आणि असत्याचे आपले स्वरूप तत्त्व आहे. गुलाबराव महाराजांच्या चौथ्या सूत्रावर या न्यायसूत्रभाष्याचा प्रभाव दिसतो. सत्याची व्याख्या करतांना गुलाबराव महाराज म्हणतात, सत्य म्हणजे जे तीनही काळी बाधित होत नाही. अशाच प्रकारचे भाष्य तैत्तिरीय उपनिषद् भाष्यात शंकराचार्यांनी केले आहे. तसेच मिथ्यात्वाचे लक्षण देतांना गुलाबराव महाराजांनी म्हटले आहे जे सत्–असत् पेक्षा विलक्षण आहे, ते मिथ्या आहे. अर्थात् ते अनिर्वचनीय आहे. अद्वैत वेदान्तात पंचपादुकाचार्यांनी आपल्या व्याख्येत 'मिथ्या शब्दः अनिर्वचनीयतावचनः ।' असे म्हटले आहे. अर्थात्

सत्त्वासत्त्वविलक्षणम् = अनिर्वचनीयम् = मिथ्या असे निष्पन्न होते. तर या मिथ्याच्या लक्षणात गुलाबराव महाराजांवर अद्वैत वेदान्ताचा प्रभाव स्पष्ट दिसून येतो. पुढे जाऊन गुलाबराव महाराजांनी मिथ्याचे दोन प्रकार सांगितले आहेत. ते म्हणजे 1. कार्य 2. कारण.

ज्याची उत्पत्ती होते ते कार्य आणि ज्याच्यापासून उत्पन्न होते ते कारण असे लक्षण आहे. जे कार्य आहे ते अनेक प्रकारचे असून आदि आणि अन्त असणारे आहे. कारण हे उपादान व निमित्त असे दोन प्रकारचे असते. जे आपल्या कार्यात राहते ते उपादानकारण. जसे मृत्तिका घटाचे उपादान कारण आहे. जे उपादान कारणाहून भिन्न आहे आणि कार्याचे कारण आहे ते निमित्तकारण. जसे कुंभार इ. घट, इ. चे निमित्त कारण होत.

या कारणाविषयी सांगतांना गुलाबराव महाराज म्हणतात की कारण अनादि असून विनाशी असते. परंतु सत्य पदार्थ कार्य नसते आणि कारणही नसते, तेच चैतन्य आहे. त्यापेक्षा भिन्न सर्व जड पदार्थ आहेत. चैतन्य स्वतंत्र आहे आणि जड परतंत्र आहे. याचे वर्णन करतांना गुलाबराव महाराज म्हणतात की शरीरात मन जसे स्वतंत्र आहे, तसेच चैतन्य स्वतंत्र आहे. नख, केशादि सारखे पदार्थ हे जड परतंत्र आहे.

यानंतर द्वितीय उपदेशाचा आरंभ होतो. यात ब्रह्मविचार प्रस्तुत केलेला आहे.

उपनिषदांनुसार ब्रह्माचे लक्षण देतांना गुलाबराव महाराजांनी सूत्र रचले आहे.

'सत्यं ज्ञानमनन्तं सुखं तत् ब्रह्म ।'[68]

अर्थात् यात प्रत्येक शब्द ब्रह्माचे स्वरूप लक्षण आहे. ते कोणत्याही प्रकारच्या भेदाने शून्य एकच तत्त्व आहे. ज्याचे ज्ञान उपनिषद् वाक्यानेच होते. जे कारण सांगितले आहे ते त्रिगुणात्मक आहे. त्यालाच श्वेताश्वेतर उपनिषदात 'माया'



असे म्हटले आहे. भगवद्गीतेतही

'दैवी हि एषा गुणमयी मम माया दुरत्यया ।'[69] असे म्हटले आहे.

सत्त्व, रजस्, तमस् हेच तीन गुण आहेत.

| सत्त्व | रजस् | तमस् |
|---|---|---|
| शुद्ध, प्रकाशक व कारण | चंचल, अविचारी | मूढ, आलस्य, प्रमाद विचाराचे व निद्रा यांनी युक्त |

कारणरूपी अज्ञानाच्या दोन शक्ती असतात. आवरण व विक्षेपशक्ती यांत तमोगुणात्मक आवरणशक्ती ब्रह्माचे आच्छादन करते. रजोगुणात्मक विक्षेपशक्ती असत्य वस्तूला उत्पन्न करते. याहून विलक्षण ज्ञानशक्ती सत्त्वगुणात्मक असते. विक्षेपशक्तीत रजोगुण व सत्त्वगुणाचे संमिश्रण असते.

या विक्षेपशक्तीचा आश्रय जे चैतन्य आहे तोच ईश्वर होय आणि आवरणशक्ती ज्या चैतन्यात आहे तो जीव होय. अशाप्रकारच्या या अज्ञानालाच शास्त्रात 'अविद्या' असे म्हणतात.

वेदान्तानुसार तत्त्वविचार करतांना गुलाबराव महाराजांनी अद्वैतानुसार 'ाड् अनादि पदार्थांचा उल्लेख केला आहे. 1. जीव 2. ईश्वर 3. अविद्या 4. जीव व ईश्वराचा भेद 5. चैतन्य 6. संबंध.

हे सहा अनादि पदार्थ आहेत. यानंतर यांचे स्वरूप सांगण्याचा गुलाबराव महाराजांचा संकल्प दिसून येतो. ब्रह्माचे स्वरूप सांगताना गुलाबराव महाराज म्हणतात की, ब्रह्म एकच आहे त्याला आदि व अन्त नाही. बाकी सर्व पदार्थांना आदि नसून त्यांचा अंत होतो. अनादि व अनंत याचा अर्थ आदि व अंत नाही तो, ज्याला आदि व अंत असतात ते कार्य आहे. काही पदार्थ अनादि सान्त आहेत. अर्थात आदि नसूनही त्यांचा अंत होतो.

यानंतर तृतीयोपदेशात गुलाबराव महाराजांनी सर्व जगताचे कारण अज्ञान

कसे प्रवर्तित होते? या प्रश्नाचे उत्तर दिले आहे. गुलाबराव महाराज म्हणतात की चेतन तत्त्वाच्या संयोगाने अज्ञानात प्रवृत्ती येते. या अज्ञानामुळे सत्त्व, रजस्, तमस् नावांच्या गुणांमध्ये क्षोभ होतो. तेव्हा त्यापैकी 'बुद्धी' किंवा 'महत्तत्त्व' उत्पन्न होते. बुद्धितत्त्वाने अहंकार तयार होतो. त्यापासून पाच तन्मात्रांची, ज्ञानेंद्रियांची व कर्मेंद्रियांची उत्पत्ती होते. नंतर पाच तन्मात्रांपासून पंचमहाभूतांची उत्पत्ती होते. ब्रह्माला आच्छादित करणेच हे या अज्ञानाचे लक्षण आहे.

यानंतर गुलाबराव महाराजांनी सृष्टीक्रमाचे लक्षण दिले आहे.

बुद्धी = निश्चयात्मिका

अहंकार = अभिमान

पंचतन्मात्र = शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध

ज्ञानेंद्रिये = श्रोत्र, त्वक्, चक्षू, रसना व प्राण

कर्मेंद्रिये – वाक्, पाणि, पाद, पायु व उपस्थ

मन = ज्ञानेंद्रिये व कर्मेन्द्रिये

इन्द्रियांच्या अस्तित्वाचे अनुमान त्याच्या कार्याद्वारे करावे लागते, असे इन्द्रियांचे स्वरूप स्पष्ट केले आहे. नंतर –

श्रोत्र = कर्णेन्द्रिय

त्वक् = सर्व शरीरव्यापी

चक्षु = चक्षुरिन्द्रिय

रसना = जिह्वाग्रवर्ती

घ्राणेन्द्रिय = घ्राण नासाग्रवर्ती

यांत जो श्रोत्रेन्द्रियाने ऐकू येतो तो 'शब्द', त्वग् इन्द्रियाने ज्याचे ज्ञान



होते तो स्पर्श, तसेच रूपाचे डोळ्यांनी, रसाचे रसनेने व गंधाचे घ्राणाने ज्ञान होते.

यानंतर पंचभूतांची उत्पत्ती गुलाबराव महाराजांनी परंपरेप्रमाणेच सांगितली आहे.

शब्दापासूनआकाश, स्पर्शापासून वायू, रूपापासून तेजस्, रसापासून जल, गन्धापासून पृथिवी.

हे सर्व तन्मात्र 'अपञ्चीकृत' भूत आहे. येथे तृतीय उपदेश समाप्त होतो.

या सूत्रात्मक लघु ग्रंथात गुलाबराव महाराजांनी दर्शनशास्त्रातील मौलिक सिद्धान्तांना सूत्ररूपात वर्णिले आहे. प्रथम उपदेशात सत्य व मिथ्या अशी दोन तत्त्वे सांगितली असून पुढे कारण व कार्यासंबंधी सूत्रे आहेत. शेवटी जड व चेतनात त्यांची परिणती दाखविली आहे. द्वितीय उपदेशात अज्ञानाचे सत्त्व, रज, तम हे तीन गुण सांगून आवरण व विक्षेप या दोन शक्तींचे वर्णन केले आहे. यातील ईश्वर व जीवाची व्याख्या मार्मिक आहे.

ईश्वर = 'विक्षेपशक्त्याश्रय चैतन्यमीश्वरः।'[70]

जीव = 'आवरणशक्तिगतं चैतन्यं जीवः।'[71]

तसेच वेदान्तातील सहा अनादि पदार्थांची वैशिष्ट्ये प्रतिपादिली आहेत.

तृतीय अध्यायात चेतनाच्या सान्निध्यामुळे अज्ञानच सृष्टी उत्पन्न करते असे सांगून बुद्धिपासून पंचभूतांपर्यंत विश्वोत्पत्ती वर्णिली आहे.

'दुर्गातत्त्वम्' शीर्षकान्तर्गत ज्या सूत्रांची रचना केली गेली अर्थात् जी सूत्रे उपलब्ध आहेत त्यांच्या विवेचनावरून असे म्हणता येईल की हे शीर्षक 'दुर्गातत्त्वम्' असे नसून 'दुर्गतत्त्वम्' असे अभिप्रेत असावे. कारण उपलब्ध 73 सूत्रांमध्ये दुर्गादेवीचे तत्त्व सांगितलेले नाही आणि पुढे सांगण्याची दिशाही दाखवलेली नाही. जर 'दुर्गतत्त्वम्' असे शीर्षक घेतले तर 'असे तत्त्व ज्याला प्राप्त करणे कठीण आहे' असा अर्थ होतो. कारण उपलब्ध सूत्रांमध्ये दुर्ग अर्थात् दुर्गम

तत्त्वाचेच निरूपण केले आहे. परंतु ते निरूपण अपञ्चीकृतभूतांपर्यंतच उपलब्ध आहे. पुढे पञ्चीकरण, इ. क्रमाने संपूर्ण तत्त्वनिरूपण करणे अशी गुलाबराव महाराजांची योजना असावी असे वाटते.



# 5 न्यायसूत्राणि

'न्यायसूत्राणि' हा सूत्रात्मक ग्रंथ अपूर्ण स्वरूपात उपलब्ध आहे. प्रमाणांचा परिचय दिल्यानंतर हा 37 सूत्रे असलेला ग्रंथ संपलेला दिसतो. गुलाबराव महाराजांना 'न्याय' या शीर्षकांतर्गत काही सांगायचे असल्यामुळे त्यांनी 'न्यायसूत्राणि' या रचनेला सुरूवात केली. आरंभी तर्कव्याख्या करण्याची प्रतिज्ञा केली. गुलाबराव महाराजांच्या दृष्टीने तर्काचे स्वरूप विलक्षण आहे. न्यायसंप्रदायात ऊह किंवा कल्पनेला 'तर्क' म्हणतात.

ष्याप्यारोपेण व्यापकारोपः तर्कः ।'[72] या लक्षणानुसार 'जर धूम आहे तर अग्नी असेल' अशा प्रकारच्या कल्पनेला 'तर्क' म्हणतात. परंतु गुलाबराव महाराजांच्या न्यायसूत्रानुसार ''ज्याच्या बलाने मी पूर्वी उत्पन्न ज्ञान सोडू शकत नाही तोच 'तर्क' आहे,'' हे लक्षण आहे. "पूर्वी प्राप्त झालेले ज्ञान ज्याच्या आधारावर सोडले जाऊ शकत नाही, तो तर्क आहे"[73] असे या लक्षणावरून कळते. 'स्थाणुर्वा पुरुषो वा' । अशा संशय स्थळी 'स्थाणूच असला पाहिजे' असे ज्ञान स्थिर होण्याकरिता ज्या उपपत्ती दिल्या जातात, तोच 'तर्क' आहे. न्यायदर्शनात हा तर्क प्रमाण मानलेला नाही, परंतु प्रमाणासाठी उपकारक आहे असे सांगितले आहे.

शब्द आणि त्याच्या अर्थांनी तर्क निष्पन्न होतो. जसे 'स्थाणुर्वापुरुषो वा' । अशा संशयस्थळी शब्दाच्या अर्थांना घेऊन तर्क प्रवृत्त होतो आणि शब्द व अर्थ हे दोन्ही प्रमाणांवर आधारित आहेत. येथे गुलाबराव महाराजांनी सहा प्रमाणांचा उल्लेख केला आहे. प्राचीन न्यायशास्त्रात चार प्रमाणे मानलेली आहेत. पूर्वमीमांसेचे भाट्ट मीमांसक आणि अद्वैत वेदान्ती सहा प्रमाणे मानणारे आहेत. 'न्यायसूत्राणि' शीर्षक असलेल्या या लघुग्रंथात गुलाबराव महाराजांनी सहा प्रमाणांचा उल्लेख करून आपला वेदान्ताकडे असलेला कल प्रदर्शित केलेला आहे.

प्रत्यक्ष, अनुमान, उपमान, शब्द, अर्थापत्ती, अनुपलब्धी.

न्यायसूत्राच्या पाचव्या सूत्रात महाराजांनी वरील 6 प्रमाणे सांगितली

आहेत. यात भाव, अभाव पदार्थांच्या भेदाने 'अपेक्षा' चा उल्लेख केलेला आहे.[74] भावपदार्थ सिद्ध आणि संबंधी असा दोन प्रकारचा असतो. तर अभाव पदार्थ अत्यंताभाव व अन्योन्याभाव असा दोन प्रकारचा असतो. न्यायदर्शनातही कारिकावली ग्रंथात अभावाचे हे दोन प्रकार सांगितले आहेत. जसे 'संसर्गाभावात्यन्ताभावभेदतः ।'[75]

| | | |
|---|---|---|
| अभाव | संसर्गाभाव | अत्यन्ताभाव |
| प्रागभाव | प्रध्वंसाभाव | अन्योन्याभाव |

परंतु गुलाबराव महाराजांनी संसर्गाभावाचा एक प्रकार म्हणजेच अन्योन्याभाव आहे असे दोनच प्रकार सांगितले आहेत. या संदर्भात गुलाबराव महाराजांनी भावपदार्थाचे लक्षण सांगताना म्हटले आहे की, जो सिद्धीपूर्वी सोडला जाऊ शकत नाही तो 'भावपदार्थ'. ज्याचे ग्रहण होऊ शकत नाही तो 'अभाव' आहे, असे अभावाचे लक्षण केले आहे. सिद्धपदार्थ सोडून संबंधी आणि अभाव हे दोनही आपेक्षिक आहेत असे प्रथमाह्निकाच्या अंती गुलाबराव महाराजांनी स्पष्ट केले आहे. या 'अपेक्षे' चेही स्वरूप पुढे 24व्या सूत्रात दिलेले आहे.

'अन्वयव्यतिरेकयोः तुलना ज्ञानमपेक्षा ।'[76]

अन्वयज्ञानात सत्त्वाची अपेक्षा असते. जसे 'यत्र धूमः तत्र वह्निःष। आणि व्यतिरेकात अभावाची अपेक्षा असते जसे 'यत्र वह्निर्नास्ति तत्र धूमः नास्ति ।' अर्थात् संक्षेपाने असे म्हणता येईल, 'कार्यसत्त्वे कारणसत्त्वं कारणाभावे कार्याभावःष। असे सांगून प्रथमाह्निक समाप्त करून गुलाबराव महाराजांनी प्रमाणांचा विचार प्रस्तुत करण्याचा संकल्प केला आहे असे वाटते. परंतु प्रथमाह्निकानंतर केवळ 26 सूत्रच उपलबध आहेत. एकूण 37 सूत्रांचा हा एक लघुग्रंथ आज उपलब्ध आहे. प्रमाणांच्या विचारानुसार सहा प्रमाणांचे लक्षण आणि प्रकार दिलेले आहेत.

1. प्रत्यक्ष प्रमाण— गुलाबराव महाराजांनी प्रत्यक्ष प्रमाणाचे लक्षण देताना गौतम न्यायसूत्रांचेच अनुसरण केलेले आहे. प्रत्यक्ष प्रमाणाचे लक्षण देणारे गौतम



न्यायसूत्र खालीलप्रमाणे —

'इन्द्रियार्थसन्निकर्षोत्पन्नं अव्यपदेश्यम् अव्यभिचारि व्यवसायात्मकं प्रत्यक्षम् ।'[77] अर्थात् प्रत्यक्ष प्रमाण —

अ. इन्द्रिय आणि पदार्थांच्या संयोगाने उत्पन्न होते.

ब. शब्दांनी व्यक्त करता येत नाही.

क. खंडित होत नाही.

ड. निश्चयात्मक असते.

गुलाबराव महाराजांच्या प्रत्यक्ष प्रमाणाच्या लक्षणातही ही सर्व विशेषणे दिसतात. तसेच न्यायदर्शनाप्रमाणे प्रत्यक्षाचे सविकल्प व निर्विकल्प नावाचे प्रकार गुलाबराव महाराजांनी स्वीकृत केले आहेत. त्यात निर्विकल्पक प्रत्यक्ष म्हणजे ज्यामध्ये प्रत्यक्षत्व जाती, विशेष आणि संबंध राहतो. न्यायशास्त्रात निर्विकल्पक प्रत्यक्षाचे लक्षण 'नामजात्यादियोजनारहितम्'[78] असे आहे आणि जे निर्विकल्पकापेक्षा भिन्न आहे ते सविकल्पक प्रत्यक्ष आहे.

गुलाबराव महाराजांच्या प्रत्यक्ष प्रमाणाचे विश्लेषण या ग्रंथात येथे समाप्त होते.

2. अनुमान प्रमाण — गुलाबराव महाराजांनी अनुमानाचे लक्षण 'दृष्टपूर्वकमनुमानं पूर्ववत् शेषवत् सामान्यतोदृष्टं च ।'[79]

या लक्षणात गुलाबराव महाराजांनी शाब्दिक निर्वचनही प्रस्तुत केले आहे. अनु+मान अर्थात् प्रत्यक्षावर आधारित ज्ञान. हेच 'दृष्टपूर्वकमनुमानम्' या शब्दाने सांगितले आहे. गौतम न्यायसूत्रानुसार या अनुमानाचे तीन प्रकार आहेत. 1. पूर्ववत् 2. शेषवत् 3. सामान्यतोदृष्ट. गुलाबराव महाराजांनी या तीनही प्रकारांचे लक्षण व उदाहरणखालील सूत्रांमध्ये स्पष्ट केले आहे.

'तत्राद्यं कारणलिङ्गकम् — यथा दृष्ट्वा भित्तिखननमेषा

पतिष्यतीत्यनुमानम् ।'[80]

द्वितीयं कार्यलिङ्गकम् ।।— यथा दृष्ट्वा गर्भमनया कृतं मैथुनमित्यनुमानम् ।[81]

अनपवादसम्बन्धाविशेषात् भवति तत्सामान्यतोदृष्टम् ।।— यथा चैत्र आगतो गतिमानयम् इत्यनुमीयतेऽगतिमतआगमनासम्भवात् ।[82]

या प्रकारांची उदाहरणे प्राचीन न्यायापेक्षा भिन्न आहेत.

3. शब्दप्रमाण —गुलाबराव महाराजांनुसार शब्दप्रमाणाचे लक्षण 'आप्तोपदेशः शब्दः ।'[83] अर्थात् आप्तव्यक्तीचे शब्द प्रमाण असतात. आप्त दोन प्रकारचा असतो 1. सर्वज्ञ 2. ध्यानाने विशेष जाणणारा. यात 'सर्वज्ञ' तर ईश्वर आहे आणि त्याचे शब्द म्हणजे 'वेदष ध्यानाने विशेष ज्ञान प्राप्त करणारे ऋषीमुनी असतात. त्यांचे वचन म्हणजे स्मृतिग्रंथ. स्मृतिवचन तेव्हाच प्रमाण असतात जेव्हा ते वेदानुकूल असतात. परंतु वेद स्वतःप्रमाण आहेत.

4. उपमान — गुलाबराव महाराजांनी दिलेले उपमानाचे लक्षण 'प्रसिद्धसाधर्म्यात् साध्यसाधनमुपमानम् ।'[84] आणि गौतमन्यायसूत्रातील उपमानाचे लक्षण समान आहे. न्यायदर्शनात 'संज्ञासंज्ञिसम्बन्धज्ञानमुपमानम् ।'[85] असे म्हटले आहे. जसे 'गोसदृशो गवयः' । असे म्हटल्यावर प्रसिद्ध गोसदृशाने 'गवयः' चे ज्ञान होणे 'उपमिति' आणि सादृश्यज्ञान म्हणजे 'उपमान' होईल.

5. प्राचीन न्याय परंपरेत उपमानानंतर शब्दप्रमाण आलेले आहे. गुलाबराव महाराजांनी 'शब्द' प्रमाणानंतर उपमान प्रमाण सांगून शब्दापेक्षा उपमानाची दुर्बलता दर्शविलेली आहे. अर्थात् प्रत्यक्ष, अनुमान व शब्द ही प्रमुख तीन प्रमाणे आहेत असा गुलाबराव महाराजांचा विचार दिसतो.

6. अर्थापत्ती — 'सम्पाद्यसम्पादक—कल्पनमर्थापत्तिः ।'[86] असे अर्थापत्तीचे लक्षण गुलाबराव महाराजांनी दिले आहे. 'संपाद्य' ने 'संपादकाष्वी कल्पना म्हणजे अर्थापत्ती असा अर्थ घेतला पाहिजे. जसे 'आपाद्यात् आपादककल्पनमर्थापत्तिः' ।



अर्थात् कोणत्याही अर्थाची उपपत्ती न झाल्याने तिच्या उपपत्तीची कल्पना म्हणजे 'अर्थापत्ती' हिलाच 'उपपाद्यात् उपपादक कल्पना' म्हणतात.

अर्थापत्ती

| दृष्ट | श्रुत |
|---|---|
| पीनो देवदत्तः दिवा न भुङ्क्ते । | अविद्या कल्पना |

अर्थापत्तीचे प्रसिद्ध असलेले दोन प्रकार गुलाबराव महाराजांनी मान्य केलेले आहेत, ते म्हणजे दृष्ट अर्थापत्ती व श्रुत अर्थापत्ती. दृष्ट अर्थापत्तीच्या उदाहरणात 'पीनो देवदत्तः दिवा न भुङ्क्ते' । हे वाक्य दिलेले आहे. यात 'पीनत्व' उपपाद्य आहे, 'भोजन' उपपादक आहे. भोजनाशिवाय पीनत्व असू शकत नाही. जेव्हा दिवसाच्या भोजनाचा निषेध केलेला असतो तेव्हा रात्रीभोजनाची कल्पना केली जाते. येथे एक विषय ज्ञातव्य आहे की, गुलाबराव महाराज विरचित सर्व मुद्रित पुस्तकांमध्ये दृष्ट अर्थापत्तीचे उदाहरण वाक्य 'पीनो देवदत्तः न भुङ्क्तेष। असे दिसते. 'दिवा' हा शब्द मुद्रित केलेला दिसत नाही. 'दिवा' या शब्दाशिवाय हे अर्थापत्तीचे उदाहरण होणार नाही कारण भोजनाच्या अभावी पीनत्व होणार नाही आणि भोजनाचा अभाव असल्याने रात्रीभोजनाची कल्पना कुठून संभव होणार? म्हणून मुद्रित ग्रंथांमध्ये 20 व्या सूत्रात 'दिवा' हा शब्द असणे अनिवार्य आहे.[87]

श्रुतार्थापत्तीचे उदाहरण देताना गुलाबराव महाराजांनी "द्वितीयाश्रुतौ सर्वत्र श्रुतं ब्रह्मैव, जगदाभासस्य का गतिरित्यतोऽविद्या कल्पनीया"88हे उदाहरण घेतलेले आहे. श्रुतींमध्ये सर्वत्र 'ब्रह्म' सांगितले आहे. तेव्हा शंका निर्माण होते की प्रत्यक्ष जगताचा आभास काय आहे? याच्या उपपत्तिकरीता अविद्येची कल्पना करावी लागते. वेदान्तात 'तरति शोकं आत्मवित् ।' हे उपनिषद् वाक्य अर्थापत्तीच्या उदाहरणादाखल घेतले आहे. यात 'तरति' या शब्दाने मुक्ती सांगितली आहे. 'शोकम्' या शब्दाने संसार (किंवा जगत्) सांगितला आहे. 'आत्मवित्' शब्दाने आत्मज्ञानी प्रतिपादित केला आहे. तेव्हा आत्म्याला जाणणारा संसारातून मुक्ती

मिळवतो असा अर्थ होईल. याचे दोन अर्थ होतात–

1. आत्मज्ञानानेच मोक्ष मिळतो.

2. ज्याच्यापासून मुक्ती मिळते तो संसार अविद्येने निर्माण झाला आहे. म्हणजे संसार मिथ्या किंवा बाधित असतो.

गौतमन्यायदर्शनात 'अर्थापत्ती' प्रमाण नाही. न्यायासाठी अर्थापत्तीची आवश्यकता नसते व अर्थापत्तीने होणारे ज्ञान व्यतिरेक अनुमानानेही प्राप्त होते.

6. अनुपलब्धि – 'अभावप्रमाकरणमनुपलब्धिः ।'[89] असे अनुपलब्धीचे लक्षण गुलाबराव महाराजांनी केलेले आहे. अर्थात् अनुपलब्धीने अभावाचे यथार्थ ज्ञान होते. येथे एक विषय ज्ञातव्य आहे की, गौतमन्यायदर्शनात अनुपलब्धीला वेगळे प्रमाण मानलेले नाही. त्यांच्यानुसार अभावाचे ज्ञान प्रत्यक्ष प्रमाणानेच होते. भाट्ट मीमांसक व अद्वैत्यांनी अनुपलब्धीला वेगळे प्रमाण मानलेले आहे. या अनुपलब्धीविषयी गुलाबराव महाराजांनी स्पष्ट केले आहे की, प्रमेयानुसार अनुपलब्धीचे भेद होत असतात.

या प्रमाणांचे स्वरूप सांगितल्यानंतर गुलाबराव महाराजांनी 26 व्या सूत्रात म्हटले आहे की, 'येथे जे सांगितले त्या प्रमाणांपेक्षा ज्याची परीक्षा होणार नाही ते सर्व हेत्वाभासात अंतर्भूत होतात'.[90]

या ग्रंथात गुलाबराव महाराजांनी 'येन जातं ज्ञानं त्यक्तुं न शक्यते स तर्कः ।'[91] अशी तर्काची व्याख्या केली आहे. वेदान्तामध्ये न्यायघटित भाषेतच सर्वयुक्तिवाद मांडण्यात येतो, म्हणून वेदान्ताला अविरोधी असलेले न्यायशास्त्र ग्रंथरूपाने मांडण्याची महाराजांची इच्छा होती असे दिसते. कारण शेवटी त्यांनी अध्यायाला 'निगमान्ततर्कलक्षणनिष्क्रमः' असे नाव दिलेले आहे.

अपूर्ण स्वरूपात उपलब्ध असलेल्या या ग्रंथात महाराजांनी पूर्वाचार्यांनी वर्णिलेल्या सहा प्रमाणांचे लक्षण आणि स्वरूप अत्यंत सोप्या भाषेत वर्णिले आहे.



छोट्या, सुटसुटीत सुबोध व्याख्या करण्यात महाराजांचा हातखंडा दिसतो. यथार्थ ज्ञान प्राप्त करण्यासाठी आवश्यक साधनांचे अर्थात् प्रमाणांचे विवेचन या ग्रंथात महाराजांनी पूर्वपरंपरेनुसार केले आहे. अनुमानप्रमाणाच्या पूर्ववत्, शेषवत्, सामान्यतोदृष्ट या प्रकारांचे लक्षण जरी प्राचीन पद्धतीने दिले. तरीपण त्यांचे दृष्टान्त मात्र प्राचीन न्यायापेक्षा अत्यंत वेगळ्या प्रकारचे दिले आहेत. काही न्यायसूत्रांचे विवरणही त्यांनी केले आहे. 'न्यायसूत्रविवरणम्' या ग्रंथात त्यांचा उहापोह केला जाणार आहे.

# 6. न्यायसूत्रविवरणम्

'न्यायसूत्राणि' या ग्रंथात गुलाबराव महाराजांनी 'येन जातं ज्ञानं त्यक्तुं न शक्यते स तर्कः।'[92] अशी तर्काची व्याख्या केली आहे. वेदान्तामध्ये न्यायघटित भाषेतच सर्वयुक्तिवाद मांडण्यात येतो, म्हणून वेदान्ताला अविरोधी असलेले न्यायशास्त्र ग्रंथरूपाने मांडण्याची महाराजांची इच्छा होती असे दिसते. त्यानुसार त्यांनी न्यायसूत्रे लिहिलेली आहेत. या ग्रंथात महाराजांनी पूर्वाचार्यांनी वर्णिलेल्या सहा प्रमाणांचे लक्षण आणि स्वरूप अत्यंत सोप्या भाषेत वर्णिले आहे. यथार्थ ज्ञान प्राप्त करण्यासाठी आवश्यक साधनांचे अर्थात् प्रमाणांचे विवेचन या ग्रंथात महाराजांनी पूर्वपरंपरेनुसार केले आहे. अनुमानप्रमाणाच्या पूर्ववत्, शेषवत्, सामान्यतोदृष्ट या प्रकारांचे लक्षण जरी प्राचीन पद्धतीने दिले असले तरी त्यांचे दृष्टान्त मात्र प्राचीन न्यायापेक्षा अत्यंत वेगळ्या प्रकारचे दिले आहेत.

'न्यायसूत्रविवरणम्' या ग्रंथात महाराजांनी काही न्यायसूत्रांचे विवरण केलेले आहे. ग्रंथांच्या भागांना निर्णय असे म्हटले आहे. हा अपूर्ण स्वरूपात असलेला ग्रंथ तीन निर्णयापर्यंत उपलब्ध आहे. प्रथम निर्णयात महाराजांनी कारणविषयक चर्चा केलेली आहे. ग्रंथारंभी महाराज म्हणतात, 'अथैतदखिलं वस्तुजातं कार्यकारणाभ्यां निबध्यते।'[93] जी जी वस्तू दिसते ती ती एक तर कार्य असते किंवा कारण असते. जे उत्पन्न होते ते कार्य म्हणावे व ज्यापासून ते उत्पन्न होते ते त्या कार्याचे कारण म्हणावे. उदा. पुत्र कार्य आहे व आई–बाप कारण आहेत.

हे कारण दोन प्रकारचे आहे. अधिष्ठान व अनुगत. अधिष्ठान म्हणजे ज्याचे स्वरूप बदलत नाही ते. व अनुगत म्हणजे कार्य होताना ज्याचे स्वरूप बदलून जाते ते. उदा. पुत्र झाला म्हणजे आईचे स्वरूप बदलत नाही. म्हणून आई अधिष्ठान कारण आहे. देह जो उत्पन्न होतो तो शुक्रापासून होतो. आई–बापाप्रमाणे पुत्र उत्पन्न होण्याला शुक्रही कारण आहे, पण शुक्रात बदल होतो म्हणून शुक्र अनुगत कारण आहे.



हे अनुगत कारण पुनः दोन प्रकारचे आहे. उपादान व निमित्त. जे कार्यात असते ते उपादान. उदा. मातीचा घट होतो व त्यांत माती असते म्हणून माती घटाचे उपादान कारण आहे.

हे उपादान कारणही दोन प्रकारचे आहे, परिणामी व विवर्ती. वर जे अनुगत कारण सांगितले तेच 'परिणामी' होय व अधिष्ठान कारण सांगितले तेच 'विवर्ती' होय.

निमित्त कारण दोन प्रकारचे आहे. कर्तृरूप व सहकारी रूप. कार्य करणारा तो कर्तृरूप व सहकारी रूप, ज्याच्या योगाने कर्ता कार्य करतो ते. उदा. स्वयंपाकाला आचारी कर्तृरूप कारण असून गंज, पोळपाट वगैरे सहकारीरूप आहेत. हे निमित्तकारण आहे तरी कर्त्याप्रमाणे चेतन नाही, जड आहे म्हणून ते सहकारी म्हटल्या जाते. 'उपादानगोचरज्ञानेच्छाप्रयत्नवान् कर्ता।'[94] पुनः कर्त्याला उपादान माहित पाहिजे व इच्छाही पाहिजे, नाही तर एखादा रानटी मनुष्य स्वयंपाकाला बसविला व त्याने पोळी करावयाला लोखंडाची पळी आणि गंज घेतला तर तो कर्ता होणार नाही.

कारण

अधिष्ठान — अनुगत

उपादान — निमित्त

परिणामी — विवर्ती — कर्तृरूप — सहकारीरूप

द्वितीय निर्णयात लक्षणाविषयीचा उहापोह केलेला आहे. महाराज म्हणतात, आपणाला कोणतीही वस्तू दोन रीतीने समजते. लक्षणांनी व प्रमाणांनी. 'लक्षणप्रमाणाभ्यां वस्तुसिद्धिः।'[95] दुसऱ्या पदार्थापासून एखाद्या पदार्थास निराळा करणारा धर्म असणे म्हणजे लक्षण. 'अतिव्याप्त्यव्याप्त्यसम्भवदोषत्रयहीनं व्यावर्तकम् असाधारणधर्मरूपं लक्षणम्।'[96] शेगडी व कुत्रे हे एकच नाहीत. कारण त्यांचे धर्म निराळे आहेत. शेगडी कुत्र्याहून आपण त्याच्या धर्माने निराळी करतो.

ह्याला 'असाधारण' धर्म म्हणतात. असाधारण धर्म ज्याचा त्याचेच ठिकाणी राहतो. त्याचप्रमाणे मिरच्या व साखर हे ही एक नाहीत. लक्षण करताना अतिव्याप्ती, अव्याप्ती व असंभव हे तीन दोष येत असतात.

अतिव्याप्ती – अतिव्याप्ती दोष सांगताना महाराज म्हणतात, की 'अलक्ष्ये लक्षणगमनमतिव्याप्तिः ।'[97] गाय म्हणजे दोन शिंगाची असणे हे लक्षण होत नाही. कारण बैलाला व म्हशीलाही दोन शिंगे असतात. दोन शिंगाची म्हणजे गाय, म्हटले तर एखादा गायीच्या ऐवजी म्हैस घेऊन येईल. म्हणून हे लक्षण होत नाही. ह्यास 'अतिव्याप्ती' दोष म्हणतात. ह्यांत ज्याचे लक्षण करावयाचे त्याबरोबर आणखी दुसरे पदार्थ येतात. गायीचे दूध आण म्हटले तर एखादा म्हशीचेही दूध घेऊन येईल. म्हणून शिंगावरून गाईचे लक्षण होत नाही.

अव्याप्ती –अव्याप्ती म्हणजे काय हे सांगताना महाराज म्हणतात की, 'लक्ष्यैकदेशवृत्तित्वम् अव्याप्तिः ।'[98] गाय म्हणजे 'काळी असणे' असे लक्षण केले तर लाल गायी सुटल्या जातील. म्हणजे लक्षण कमी पडेल. पूर्वीचे लक्षण अधिक पदार्थावर गेले होते आता ते ज्याचे लक्षण करायचे त्यालाही पूर्णपणे व्यापत नाही. हाही पूर्वी प्रमाणेच दोष आहे. ह्यास 'अव्याप्ती' दोष म्हणतात.

असंभव – असंभव या दोषांविषयी महाराज म्हणतात, 'सर्वथा अविद्यमानस्य लक्षणस्य लक्ष्ये समन्वयकरणमसम्भवः ।'[99] 'गाय म्हणजे दोन पायाची' असे लक्षण केले तर दोन पायाची गाय कुठेच नसते. म्हणून हा असंभव दोष होतो.

ह्यातील कोणताच दोष येणार नाही तेव्हा त्यास लक्षण म्हणावे. 'एतैर्दोषैर्विवर्जितमसाधारणधर्मकथनं लक्षणम् ।'[100] म्हणून ''सास्नादिमत्त्वं गोलक्षणम्'' कंठाला पोळी असणारे स्त्रीरूपी जनावर म्हणजे गाय हे लक्षण बरोबर होईल. कारण ह्यात अतिव्याप्ती येत नाही. कारण दुसऱ्या कोणत्याच स्त्रीरूपी जनावरास पोळी नसते. तसेच अव्याप्ती येत नाही कारण सर्वच गायीस पोळी असते. व पोळी असते म्हणून असंभवही येत नाही.



लक्षण दोन प्रकारचे असते. तटस्थ लक्षण व स्वरूप लक्षण. ज्याचे लक्षण करावयाचे त्याला 'लक्ष्य' म्हणतात व लक्ष्याचे ठिकाणी जे असते त्याला 'लक्षण' म्हणतात. गाय हे लक्ष्य, सास्नादिमत्त्व हे लक्षण आहे. एखाद्या वेळी जे पदार्थांच्या ठिकाणी रहाते ते तटस्थ लक्षण व जे नेहमी पदार्थांच्या ठिकाणी असते ते स्वरूप लक्षण होय. जसे छत्रवान् राजा असे राजाचे लक्षण होईल. परंतु राजावर नेहमीच छत्र असते असे नाही. म्हणून ते तटस्थ लक्षण आहे. गायीच्या कंठाला पोळी नेहमी असते म्हणून सास्नादिमत्त्व हे स्वरूप लक्षण आहे.

यानंतर तृतीय निर्णयात महाराजांनी प्रमाणांविषयी चर्चा केली आहे. 'अबाधितज्ञानं प्रमा ।'[101] निश्चित ज्ञानाला 'प्रमा' म्हणतात. 'प्रमाकरणं प्रमाणम् ।'[102] जे केव्हाच चुकत नाही ते खरे निश्चित ज्ञान होय. खरे ज्ञान ज्याचे योगाने समजते त्याला 'प्रमाण' म्हणतात. प्रमाणे चार प्रकारची आहेत. प्रत्यक्ष अनुमान, उपमान व शाब्द. 'इन्द्रियार्थसन्निकर्षजन्यं निश्चयात्मकं अव्यभिचारि ज्ञानं प्रत्यक्षम् ।'[103] इन्द्रियांनी जे समजते ते प्रत्यक्ष होय. जसे शेगडी ही प्रत्यक्ष प्रमाणाने समजली. अनुमानाविषयी सांगताना महाराज म्हणतात, 'तत्पूर्वकमनुमानम् ।' अनुमान त्रिविध आहे. 1) कार्यलिङ्गक 2) कारणलिङ्गक 3) सामान्य. 'सादृश्यात् वस्तुनिर्धारणमुपमानम् ।'[104] सादृश्याहून वस्तूचे निर्धारण होणे म्हणजे उपमान तर 'आप्तोपदेशः शब्दः ।'[105] आप्ताचा उपदेश म्हणजे 'शब्दप्रमाण' आणि आप्त म्हणजे यथार्थवक्ता. अशाप्रकारे प्रमाणांचे प्रकार सांगितल्यानंतर तृतीय निर्णयाची समाप्ती झालेली आहे.

या ग्रंथात महाराजांनी प्रथम निर्णयात कारण, द्वितीय निर्णयात लक्षण, तर तृतीय निर्णयात प्रमाणांचे विवरण केलेले आहे. प्राचीन न्यायसूत्र ग्रंथाच्या शैलीनुसारच गुलाबराव महाराजांनी हा ग्रंथ लिहिलेला आहे.

पारंपारिक न्यायसूत्रांपेक्षा गुलाबराव महाराजांच्या न्यायसूत्रविवरणामध्ये खालीलप्रमाणे विशेष दिसतात.

1) पांरपारिक न्यायशास्त्रात प्रत्यक्ष, अनुमान, उपमान व शब्द अशी चार प्रमाणे मानलेली आहेत. गुलाबराव महाराजांनी 'न्यायसूत्राणि' नामक रचनेत प्रत्यक्ष, अनुमान, उपमान, शब्द, अर्थापत्ती व अनुपलब्धी अशी सहा प्रमाणे मानलेली आहेत.

2) गुलाबराव महाराजांनी सर्वज्ञ व ध्यानाने विशेष जाणणारा असे आप्ताचे दोन प्रकार सांगितले आहेत, जे पारंपारिक न्यायशास्त्रात नाहीत.

3) महाराजांनी न्यायसूत्रविवरणात कारणाचे दोन प्रकार सांगितलेले आहेत —

अ. अधिष्ठान कारण ब. अनुगत कारण. या अनुगत कारणाचे उपादान व निमित्त असे दोन भेद दर्शविले आहेत. उपादान कारणाचे पुन्हा परिणामी व विवर्ती असे दोन भेद सांगून निमित्त कारणाचे कर्तृरूप व सहकारीरूप असे दोन भेद महाराजानी सांगितले आहेत. पारंपारिक न्यायशास्त्रात 'कारण' मानलेले नाहीत. कारण त्यांना 'विवर्त' ही संकल्पनाच मान्य नाही.

4) महाराजांनी 'न्यायसूत्राणि' या रचनेत सहा प्रमाणे मानली आहेत व 'न्यायसूत्रविवरणम्' या रचनेत चार प्रमाणे मानली आहेत. हे दोनही ग्रंथ अपूर्ण स्वरूपात उपलब्ध आहेत. त्यामुळे नेमक्या संख्येचा ऊहापोह करणे शक्य नाही.



# 7. शास्त्रसमन्वयः

'शास्त्रसमन्वयः' हा गुलाबराव महाराजांचा शास्त्रग्रंथ असून वेगवेगळी शास्त्रे एकाच सूत्रात आणून त्यांचा समन्वय घडवून आणण्यासाठी महाराजांनी हा ग्रंथ लिहिलेला आहे. श्लोक व आवश्यक तेथे श्लोकावरील वृत्ती असे या ग्रंथाचे स्वरूप आहे. सर्व शास्त्रकार, मुनी भ्रांतिवर्जित होते आणि त्यांनी लोकांना अंततोगत्वा परमार्थ प्राप्ती व्हावी म्हणून भिन्न भिन्न शास्त्रांची निर्मिती केली. या सर्वांचा समन्वय करण्यासाठीच महाराजांनी या ग्रंथाची रचना केलेली दिसते. या ग्रंथात ९८ श्लोक असून महाराजांचा हा ग्रंथ अपूर्ण स्वरूपात उपलब्ध आहे. हा ग्रंथ जर पूर्ण झाला असता तर, समन्वयाचे मार्गदर्शक तत्त्व विस्तारपूर्वक समजावून घेऊन त्यानुसार परस्पर भेदभावना कशी नाहीशी करावी यासंबंधी महाराजांचे शास्त्रपूत विचार आपल्याला कळले असते.

ग्रंथाच्या आरंभी अलकावतीचे प्रभू श्री ज्ञानेश्वरांना नमन केले आहे. महाराज म्हणतात,

'अहेतुकदयामूर्तिम् सर्गस्थित्यन्तकारणम् ।
प्रणमामि परानन्दमलकावतिवल्लभम् ।।'[106]

जो अहेतुक दयेची मूर्ती आहे, सृष्टी, स्थिती व संहाराचे कारण आहे, परमानन्दस्वरूपी आहे अशा अलकावतीच्या प्रभूंना (ज्ञानेश्वरांना) नमन करतो. महाराज त्यांच्या आराध्य दैवताला नमस्कार करतांना म्हणतात,

'श्रीमान् ज्ञानेश्वराचार्य उमा माता शिवः पिता ।
पतिः कृष्णो राधिकाद्या भगिन्यो गोपिका मम ।।

पञ्चायतनमित्येतत् हृद्यास्थाप्य प्रपूज्य च ।
प्रणम्य सर्वशास्त्राणां प्रवक्ष्यामि समन्वयम् ।।'[107]

श्री ज्ञानेश्वर माझे आचार्य आहेत, पार्वती परमेश्वर माझे माता पिता आहेत.

श्रीकृष्ण माझा पती आहे आणि राधिका आणि गोपिका माझ्या बहिणी आहेत. हे पंचायतन माझ्या हृदयात प्रस्थापित करून पूजा आणि प्रणाम करून सर्व शास्त्रांचा समन्वय सांगत आहे.मधुराद्वैतसम्प्रदायानुसार भक्तिसंप्रदायाची विशेष भावना वरील श्लोकात प्रदर्शित झाली आहे. मधुराद्वैतसम्प्रदायानुसार पञ्चायतन म्हणजे ज्ञानेश्वर, पार्वती, परमेश्वर, श्रीकृष्ण आणि राधिकादिगोपिका.

शास्त्रांमधील दोन प्रकारचे तत्त्व सांगताना महाराज म्हणतात,

'द्वेधा तत्त्वं तु शास्त्रेषु श्रद्धात्तं यौक्तिकं तथा।
आद्यमार्षं द्वितीयं च लोकबोधार्थमाश्रितम्।।'[108]

शास्त्रांमध्ये 2 प्रकारचे तत्त्व सांगितले आहे. 1) श्रद्धात्त 2) यौक्तिक. यात श्रद्धात्तचा अर्थ श्रद्धेने स्वीकृत. जसे आर्षवाङ्मय, दुसऱ्या यौक्तिकाचा अर्थ समाजाच्या बोधाकरिता स्वीकृत. श्रद्धेने स्वीकृत तत्त्व म्हणजे आर्षतत्त्व. युक्तीने स्वीकारलेले तत्त्व म्हणजे लौकिकतत्त्व. अशा दोन तत्त्वांचा येथे उल्लेख केलेला आहे.

'यत्तु केवलश्रद्धात्तं मनने तत्समन्वयः।
यत्तत्त्वं यौक्तिकं तस्य मननेऽपिच समन्वयः।।'[109]

जो केवळ श्रद्धेने घेतला गेला आणि जे युक्तीने सिद्ध आहे. त्या दोहोंचा 'मनना' त समन्वय आहे. श्रवण, मनन, निदिध्यासन असे आत्मदर्शनाचे तीन उपाय उपनिषदांमध्ये सांगितलेले आहेत. केवळ श्रद्धेने घेतलेल्या तत्त्वाचा समन्वय सतत मनन केल्याने होऊ शकतो. तर्क वापरून समन्वय करता येतो आणि यात तोच शास्त्रसमन्वय केला जातो. अशाप्रकारे विविध संप्रदायांमध्ये युक्तीने सांगितलेल्या विचारांचा समन्वय या ग्रंथात केल्या जात आहे. 'युक्तीने पटवून देण्याचा माझा बाणा आहे.' असे गुलाबराव महाराजांचे प्रसिद्ध वाक्य आहे. समन्वय केल्यावरही जर भेदातच आग्रह असेल तर गुणात दोषाचे आरोपण केल्याने तो असूयाग्रस्तच असेल यात संशय नाही, असे महाराज म्हणतात.



परंतु वेदान्त्याला योगाची अपेक्षा या जगात दिसून येते. म्हणूनच जेव्हा हे जग वाईट मार्गावर जाते तेव्हा त्यात प्राचीन आचार्यांचा कोणताही अपराध नसतो. म्हणून नेहमी भाष्य, इ. ऋषी वचनांचा समन्वय आवश्यक आहे कारण ते सर्व महर्षी सर्वज्ञ आहेत आणि त्यांच्यात भ्रम नसतो.

प्रथम महापुरुषांमध्ये विशिष्ट भागाचा परित्याग केल्यामुळे समन्वय सांगितला आहे. त्यांच्या सोबतच माझा हा प्रयत्न माझ्या आत्मशांतिकरिता केला जात आहे. मी त्यांच्याशी समन्वयासाठी आणि आत्मशांतिकरिता प्रयत्न करीत आहे. 'विशिष्टस्य परित्यागात्' म्हणजे ज्याप्रकारे भागलक्षणेने काही शब्दांचा काही विशिष्ट अंश सोडून काही अर्थाचा भाग घेतला जातो, त्याचप्रकारे समन्वय करतांना विशिष्ट भागाचा त्याग अपेक्षित आहे.

'अधीत्य गौतमीं विद्यां शार्गलीं योनिमाविशेत्।
इत्यादि प्रतिषेधास्तु भक्तिभिन्नपराश्च वै।।'[110]

गौतम महर्षींचे तर्कशास्त्र वाचून कोल्हाच्या जातीत जन्म होईल इ. जो शास्त्र अध्ययनाचा प्रतिषेध आहे ते सर्व भक्तिशास्त्राहून भिन्न शास्त्रांना लागू आहे. काही ग्रंथांमध्ये तर्कविद्येचा प्रतिषेध करताना असे म्हटले जाते की, तर्कविद्येचे अध्ययन करून कोल्हीचा जन्म प्राप्त होईल. परंतु गुलाबराव महाराजांच्या मते तो प्रतिषेध भक्तिशास्त्र सोडून बाकी शास्त्रांना लागू आहे. अद्वैतात किंवा द्वैतात निष्ठा असेल किंवा विशिष्टाद्वैतात निश्चय असेल तर महाविष्णूचा दास परमगतीला प्राप्त करेल आणि जो महाविष्णूचा दास नाही त्याचा अधःपात होईल. परंतु ईश्वराविषयीही अनेक विरुद्ध धारणा/भावना आहेत ना? असे म्हटल्यास, ते सत्य आहे परंतु त्या सर्व धारणा चुकीच्या आहेत असे उदयनाचार्यांच्या 'न्यायकुसुमाञ्जलिः' ग्रंथाच्या पाचव्या स्तबकात सांगितले आहे. 'कार्यायोजनदृत्याते पदात् प्रत्ययतः श्रुतेः प्रमाणम्।' परंतु अशाप्रकारे सर्व धर्मांचा एकाच तत्त्वात समन्वय होईल. तर जैनांसारखे सर्व ज्ञान अनेकांतच होईल. सर्व धर्मांचा समन्वय जरी येथे केला तरी हा समन्वय जैनांच्या अनेकांतवादासारखा

नाही. कारण येथे बऱ्याच अंशी भेद आहे आणि एकाच पदार्थांमध्ये दोन विरूद्ध धर्म राहू शकत नाहीत.

'मैवं भिन्नांशभेदेन व्यवस्थासम्भवादिह ।
भावाभावविरोधश्च न चैकस्मिन्नसम्भवात् ।।' [111]

असे म्हटले तर ते योग्य होणार नाही. कारण या समन्वयात वेगवेगळे अंश आहेत. त्यांच्या भेदांमुळे व्यवस्था बनविली जाऊ शकते. एकाच तत्त्वात भावपदार्थ आणि अभावपदार्थांचा विरोध असू शकत नाही.

जसे नैयायिकांच्या अपेक्षेने योगदर्शनात ईश्वर भावरूपी आहे असे मी म्हणतो आणि परमेश्वराची सिद्धी दुसऱ्याप्रकारे करतो. अशाप्रकारे सर्व शास्त्रांचा समन्वय करतो. जैन दर्शनात जसा अनेकांतवाद सांगितला तर मोठा उपद्रव होईल, शांतता राहणार नाही हे 18 व्या श्लोकाद्वारे सांगून जैनमताला दूर ठेवले आहे. जैन दर्शनात एकाच वस्तूत विरूद्धासारखे भाव व अभावाचा अन्वय सांगितला आहे. नव्यजैन संप्रदायात तर तो विरोध दुसऱ्या दर्शनांच्या दृष्टीने संभावित केल्या जातो. आमच्या मते या दोघांचा प्रवेश होण्याची शंका करायला नको, असे महाराज म्हणतात.

न्यायशास्त्रात सांगितलेल्या देश, काळ, क्षेत्र, द्रव्यापेक्षा परमात्मा भावरूप आहे आणि योग दर्शनानुसार देश, काळ, क्षेत्र, द्रव्यापेक्षा अभावस्वरूपाचा आहे असे मी येथे म्हणणार नाही. परंतु ज्या नैयायिकांचे गुण प्रकाशित नाहीत त्याचे प्रकाशनच करेन म्हणून आमच्या मते कोणतीही अनुपपत्ती नाही. देश, काल, क्षेत्र, द्रव्य यांच्या अपेक्षेने परमात्मा न्यायशास्त्रानुसार भावपदार्थ आणि योगदर्शनानुसार अभावरूप असे मी म्हणणार नाही, असे गुलाबराव महाराजांचे मत आहे. तरी या समन्वयाचे प्रयोजन म्हणजे जे काही गुण अप्रकाशित होते ते प्रकाशात आणणे हेच समन्वयाचे प्रयोजन आहे.



'नयेऽस्मिन्न विरुध्यन्ते आर्हताश्चेद्भवेत्तथा ।
अध्यस्तानामधिष्ठानं सत्तास्फूर्तिप्रदं यथा ।। ' [112]

या शास्त्रात जैनांचा निषेध होणार नसेल तर ठीक आहे कारण अध्यास होतेवेळी अधिष्ठानच सत्तेची स्फूर्ती देते. जैनसुद्धा अशाचप्रकारे एकान्तवादाच्या आधाराने कसातरी समन्वय सांगतात. तर काही पक्षाने 'त्यांच्या मतांचा प्रवेश यात होणे अनिवार्य आहे' या आशंकेचे उत्तर या श्लोकाने दिले आहे.

जैनांच्या मताशी विरोध होण्याची संभावना आमच्या समन्वयात झाली नाही तरी पूर्णपणे कुठल्याही प्रकारे त्या मताचा प्रवेश होणार नाही असे नाही. कारण, ज्यांचा समन्वय केलेला आहे त्या धर्मांच्या स्थानी राहणाऱ्या धर्मीत भेद आहे. ज्याच्यावर ज्याचा आरोप केलेला आहे त्यांचा भेद स्वीकृत केला तर तेव्हा आमच्याशी विरोध होण्याची संभावना आम्हाला इष्टच होईल. पण आम्ही त्यांच्यावर अवलम्बून राहिलो नाही हे तर तत्त्व आहे. असत् हेच सत् पासून भिन्न आहे, सत् असत् पासून नाही हा सूत्र–भाष्यकारांचा सिद्धान्त आठवावा. अशाप्रकारचा समन्वय केल्याने जैनांचा अनेकांतवाद आणि हा समन्वय एकच प्रकारचा होईल अशी शंका येऊ शकते. पण गुलाबराव महाराजांच्या मते या समन्वयाने जैनमताबद्दलचा विरोध दूर होतो. आमच्याच युक्तींवर त्यांचे विचार आधारित आहेत असे गुलाबराव महाराजांचे मत आहे.

'प्रत्यक्षे न विवादोऽस्ति सन्दिग्धादिकृतःस्वयम् ।
न्यायः प्रवर्तते त्वेवं न्यायीभाष्यकृदुक्तवान् ।।' [113]

प्रत्यक्षात विवाद नाही कारण न्यायभाष्यकारांनी स्वयं म्हटले आहे की न्याय (तर्क) संदिग्ध, इत्यादीने प्रवृत्त होतो. 'नानुपलब्धे न निर्णीतेऽर्थे न्यायः प्रवर्तते अपि तु संदिग्धे ।' संशयाचा आश्रय प्रत्यक्षापासून भिन्न म्हटला जातो. तर चार्वाकांच्या मताचा प्रवेश होऊ शकणार नाही. प्रत्यक्षापासून वेगळा राहणारा तर अभावच आहे असा निश्चय केला तर न्याय प्रवृत्त होणार नसून सूत्र व भाष्य

दोन्ही व्यर्थ होतील. अशाप्रकारे प्रत्यक्षभिन्न अशा अभावात स्थिति आहे असे म्हटले तर अभावाला अवलंबून न्याय प्रवृत्त होत नाही. अभावात स्वरूपाने काही भेद नसतो, जो भेद असतो तो तर त्या अभावाच्या विषय आणि आश्रयामध्येच असतो. अभावाचे ज्ञान विशेषणविशेष्य भावाने होते. अनुपलब्धी प्रमाणाने सुद्धा होते. तर हे प्रत्यक्षच झाले.

'यत् यत् दृष्टं न तत्तद्वै संशयाधारतामियात् ।
तस्मात्संशयमात्रेण दृष्टभिन्नग्रहो भवेत् ।। ' [114]

ज्याचे प्रत्यक्ष ज्ञान झाले ते नक्की संशयाचा आधार होऊ शकत नाही. म्हणून संशयाने दृष्टापासून भिन्नाचे ज्ञान होते. खरं सांगाचयं झालं तर जैनसुद्धा शुद्ध संशयवादी नाहीत. अपेक्षाबुद्धीने त्यांना द्रव्याचा निश्चय करावा लागतो.

जैनांचा सुद्धा पूर्णपणे संशयवाद नाही. कारण, जैन आपल्या काल, दिक्, इ. चारांच्या अपेक्षेने निश्चितच सत्–असत्, इ. धर्मांचा आश्रय होईल असे म्हणतात. तसेच दुसऱ्या पदार्थांच्या काल, दिक्, इ. चारांच्या अपेक्षेने कोणतीही वस्तू असत्, इ. धर्मांचा आश्रय होऊ शकतो असे बुद्धिपुरस्सर सांगतात. अन्यथा भूतकाळाच्या अपेक्षेने जे बंधनात होते असे जैन अनंत भविष्यत्काळाच्या अपेक्षेतून मुक्त होतील या निश्चयाची संभावना सुद्धा होणार नाही.

वर प्रत्यक्षाबद्दलची चर्चा आलेली आहे. प्रत्यक्षाबद्दल काही विवाद नाही. न्यायसूत्रांवर भाष्य लिहितांना वात्स्यायन महर्षींनी म्हटले आहे की,

"नानुपलब्धे न निर्णीते अर्थे न्यायः प्रवर्तते अपि तु संशयिते ।" म्हणजे जे उपलब्धच नाही व ज्याच्याबद्दल निर्णय झालेला आहे त्याच्याविषयी तर्क किंवा न्याय प्रवृत्ती होत नाही. अर्थात् ज्याच्या विषयी संशय आहे त्या ठिकाणी न्यायाची प्रवृत्ती होते. म्हणून नेहमी संशय होण्याचे स्थान प्रत्यक्षाहून भिन्न असते असे प्रत्यक्षाचे महत्त्व स्वीकारले तरी आमचे मत चार्वाकांच्या मतासारखे होणार नाही, असे महाराज म्हणतात.



अभाव हा प्रत्यक्षाहून भिन्न आहे. हा निश्चय झाल्यामुळे न्यायाची प्रवृत्ती होणार नाही तर न्यायसूत्र आणि त्यावरील भाष्य व्यर्थ होतील. मग प्रत्यक्षाहून भिन्न अभावाविषयी न्यायाची प्रवृत्ती होते काय? याचे उत्तर असे देता येईल की, न्याय अभावावर अवलंबून प्रवृत्त होत नाही.

अभावाच्या स्वतःच्या रूपात भेद नसतो. प्रतियोगी (म्हणजे ज्याचा अभाव आहे तो) आणि अधिकरण (म्हणजे ज्या ठिकाणी अभाव आहे ते) याला 'अनुयोगी' म्हणतात. तर प्रतियोगी आणि अनुयोगी यांच्या भेदाने अभावाचेसुद्धा भेद होतात जसे 'भूतले घटो नास्ति ।' या वाक्यात ज्याचा अभाव आहे तो घट प्रतियोगी आहे आणि जेथे अभाव आहे ते भूतल अनुयोगी आहे. अशाप्रकारे प्रतियोगी व अनुयोगी यांच्या भेदाने अभावाचा भेद दर्शविता येतो. पण वस्तुतः अभावात भेद नाही.

अभावाचे ज्ञान विशेषण – विशेष्य भावाने होते. वरील 'भूतले घटो नास्ति ।' या वाक्यात 'घट – अभाव – विशिष्टं भूतलं' असा शाब्दबोध होतो. म्हणून घटाभाव हे विशेषण, भूतल हे विशेष्य असे म्हटले जाते. तर्कशास्त्रानुसार पदार्थाच्या अभावाचे ज्ञान प्रत्यक्षाने होते. पण अद्वैतवेदान्तामध्ये अभावाच्या ज्ञानासाठी अनुपलब्धी प्रमाण स्वीकारलेले आहे. कोणतेही साधन असो, अभाव तर प्रत्यक्ष आहे यात काही शंका नाही. जे जे प्रत्यक्ष आहे ते ते संशयाचे स्थान नाही. म्हणून संशय हा प्रत्यक्षाहून भिन्न आहे असा तर्क लावता येतो.

अभावाचे स्वरूप विशद करून गुलाबराव महाराजांनी जैनांच्या अनेकांतवादाबद्दल असे म्हटले आहे की, जैन हे संशयवादी नसून परस्पर अपेक्षेने पदार्थांचा निर्णय करणारे आहेत.

संशयवादी जैनांच्या मतानुसार संशयसुद्धा नित्य झाला तर संशयाचा जो आश्रय आहे तो कसा नित्य होणार नाही? स्याद्वादात किंवा संशयवादात जो आश्रय किंवा अधिष्ठान आहे त्यातच सर्व शास्त्रांचे तात्पर्य पंडितांद्वारे मानले जाते. संशय नित्य असेल तर संशयाचे स्थान सुद्धा नित्य होण्याची आपत्ती आहे.

सर्व शास्त्रांचे हे अधिकरणच (स्थान) तात्पर्य आहे.

निर्विकल्प प्रत्यक्षामध्ये तर संशय नेहमीच असतो. सत् पदार्थाच्या निश्चयाने संशय असणार नाही तेव्हा त्या निश्चयाने किंवा दुसऱ्या प्रकाराने अनुमिती होईल. प्रत्यक्ष संशय असतो हे तर्कसिद्ध नाही कारण निर्विकल्पक प्रत्यक्षामध्येच केवळ संशय असतो असे समाजात दिसून येते, अशी शंका आल्यास महाराज म्हणतात, निर्विकल्पक ज्ञानसुद्धा निश्चयच आहे. यात संशय नाही कारण निर्विकल्पकात देखील पदार्थाच्या सत्तेचा निश्चय होतो. ज्या पदार्थाचे निर्विकल्पक ज्ञान झाले आहे त्या पदार्थात हा पदार्थ अवयवी आहे किंवा अवयवशून्य आहे असा संशय होत नाही. म्हणूनच दोन्ही प्रकारचे प्रत्यक्ष व्यवसायात्मक आहेत असे न्यायसूत्रकारांनी म्हटले आहे.

"न प्रमा नापि भ्रमः यन्निर्विकल्पकम् ।"[115]

'व्यवसायात्मक' या शब्दाने 'निर्विकल्पक' चा उल्लेख आहे. जर निर्विकल्पक प्रत्यक्षात संदेह असता तर त्यात अनुमानच प्रवर्तित होईल.

याठिकाणी गुलाबराव महाराजांनी न्यायसूत्राचा उल्लेख केलेला आहे. या सूत्राने सविकल्प व निर्विकल्प दोन्ही प्रकारच्या प्रत्यक्षाचे लक्षण दिलेले आहे. निर्विकल्पक प्रत्यक्षात संशय असला तर त्या ठिकाणी अनुमानाची प्रवृत्ती होते.

'स्थाणुर्वा पुरुषो वा' अशा प्रत्यक्षातही संशय असतो. जेव्हा कोणत्याही पदार्थाचे विशेष ज्ञान होत नाही तेव्हा संशय होतो. स्थाणुर्वा पुरुषो वा असे दोन्ही अंश होऊन होणाऱ्या प्रत्यक्षज्ञानातही संशय राहतो, अशी शंका आल्यास त्याचे समाधान करतांना महाराज म्हणतात की, तेथे विशेष धर्माचे ज्ञान न होणेच संशयाचे प्रयोजक आहे. विशेषाच्या अज्ञानाचा जो आश्रय आहे तो प्रत्यक्षाहून भिन्न असल्याने तो निर्विकल्पक नाही. जोपर्यन्त ते ज्ञान सविकल्पक रूपात बदलत नाही तोपर्यंत सविकल्पक प्रत्यक्ष होणार नाही. अशाप्रकारे हे सिद्ध होते की संशयाचा आश्रय नेहमी प्रत्यक्षाहून भिन्न असल्याने त्यात तुमच्या नास्तिक मताचा थोडा



अंशसुद्धा येणार नाही.

'स्थाणुर्वा पुरुषो वा' असा संशय दुरून एखादी वस्तु प्रत्यक्ष पाहत असतांना होऊ शकतो. तर प्रत्यक्षातसुद्धा संशय होऊ शकतो अशी शंका कोणी उपस्थित केली तर गुलाबराव महाराजांच्या मतानुसार ते प्रत्यक्षाचे स्थान नसून विशेषाचे ज्ञान नसल्यामुळे त्या ठिकाणी संशय होतो आणि ते प्रत्यक्ष सविकल्प किंवा निर्विकल्प यापैकी कोणत्या स्वरूपाचे हे ठरले जात नाही. म्हणून संशयाचे स्थान हे नेहमी प्रत्यक्षाहून भिन्न आहे.

प्रत्यक्षात संशय जरी मानला तरी तो भावरूप पदार्थाच्या प्रत्यक्षात राहील अभावात नाही. म्हणूनच तो कधीच अधिकरण/आश्रय होणार नाही. भावरूप प्रत्यक्षात कुठेही संशय होऊ शकत नाही. परंतु अभावरूप प्रत्यक्षात संशय असू शकतो कारण त्या ठिकाणी अधिकरणाचेच प्रत्यक्ष ज्ञान होते.

जर प्रत्यक्षाहून भिन्न भावपदार्थ आहे असे मानले तर 'आस्तिक मतच होईल. म्हणूनच आमचा प्रयत्न कुठल्याही पक्षाशिवाय सफल झालेला आहे.

'तुष्यतु दुर्जनः' या न्यायाने प्रत्यक्षात संशय स्वीकारल्या गेला तरी त्याच प्रत्यक्षाला पक्ष बनवून ग्रंथकार 'भवेत् वा' या शब्दाने उत्तर देतात. जर 'प्रत्यक्षाम्ध्येच संशय आहे असा तुमचा आग्रह असेल तर संशय असू द्या. परंतु त्याच्यातही ज्या पदार्थाचे विशेष ज्ञान झाले नाही त्याच पदार्थात संशय होणे योग्य आहे. परंतु तो भावपदार्थ असायला हवा, अभाव पदार्थ नाही. कारण अभाव कुठल्याही प्रकारे अधिकरण किंवा आश्रय होऊ शकत नाही. अभावाला आश्रय मानले असता त्या अभावात राहणारी वस्तुसुद्धा द्रव्य इ. स्वरूपाची होण्याची आपत्ती येईल. अशाप्रकारे प्रत्यक्षाहून भिन्नभाव पदार्थ मानल्यावर आस्तिक मतच होईल. नास्तिक दर्शन तर पूर्वपक्षाच्या रूपानेसुद्धा अयोग्य आहे. वरीलप्रमाणे म्हणत असतांना कुणी प्रत्यक्षाहून भिन्न भावपदार्थ आहे असे स्वीकारले तर आस्तिकता प्राप्त होऊन त्याला नास्तिकवाद सोडावा लागेल. अशाप्रकारे आस्तिकत्व प्रस्थापित करण्याचा आमचा

प्रयत्न सफल झाला आहे.

'संशयश्चेदभावेऽपि तद्‌वृत्तिः प्रतियोग्युत ।
मानाभावः सदैवाद्ये द्वितीये भावनाशनम् ।।'[116]

अभावातही जर संशय असला तर तो संशय अभावात राहणारा किंवा अभावप्रतियोगी असेल? पहिल्या पक्षात प्रमाण नाही. दुसऱ्या पक्षात भावपदार्थाचा नाश मानावा लागेल. अभावरूपी अधिकरणातसुद्धा संशय राहील असे पूर्वपक्ष म्हणतो. तर त्यांना हे विचारायला हवे की तो संशय अभावात राहतो की त्यांच्या संशयाचा अभाव आहे? संशय अभावात राहण्याचा पक्ष स्वीकार्ह नाही. कारण त्यात प्रमाण नाही. अभाव एककोटी ज्ञान आहे. तेव्हा त्यात उभयकोटी ज्ञानरूपी संशय होणे शक्य नाही. असे अन्यत्र सुद्धा पाहिल्या गेले नाही. जर संशय अभावाचा प्रतियोगी मानला गेला तर हा विकल्प होईल की, तो संशय प्रागभावाचा प्रतियोगी होईल की प्रध्वंसाभावाचा प्रतियोगी होईल? जर संशय प्रागभावाचा प्रतियोगी म्हटला गेला तर संशय उत्पन्न झाल्याने प्रागभाव नष्ट होईल. अर्थात् संशयाचे अधिकरणच नष्ट होईल तेव्हा तुमचे म्हणणे उन्मत्त भाषण होईल.

जर संशय प्रध्वंसाभावाचा प्रतियोगी मानला गेला तर संशयाचा स्वतःचा नाश होत असल्याने आस्तिकत्व किंवा न्यायप्रवृत्ति तुम्हाला स्वीकारावी लागेल. जर दोनही पक्षांमध्ये उपेक्षा दाखविली तर विप्रतिपत्ती झाल्याने आपल्या होणाऱ्या समन्वयात दोष दाखविण्याचा तुमचा प्रयत्न व्यर्थ होईल.

या श्लोकात गुलाबराव महाराजांनी अभावाबद्‌दल एक चर्चेचा विषय उपस्थापित केलेला आहे. अभावाच्या ठिकाणी संशय असू शकतो असे जरी कोणी म्हटले तर याविषयी दोन विकल्प येतात. 1) संशय अभावाच्या ठिकाणी राहतो? की 2) संशयाचा अभाव आहे? अभावाच्या ठिकाणी संशय राहू शकत नाही. कारण याला काही प्रमाण नाही. ज्या ठिकाणी अभाव असा निश्चय झालेला आहे. जो एककोटिक आहे त्याठिकाणी द्विकोटिक संशय कसा असेल? म्हणून अभावात



संशय नाही आणि दुसऱ्या विकल्पानुसार, संशय जर प्रतियोगी असेल तर प्रागभावाचा प्रतियोगी की प्रध्वंसाभावाचा? (म्हणजे संशयाचा अभाव म्हणत असतांना तो संशयाचा प्रागभाव किंवा प्रध्वंसाभाव? हे ठरविले पाहिजे.)

प्रागभाव – 'अनादिः सान्तः ।' या लक्षणानुसार एखाद्या वस्तूच्या उत्पत्तीपूर्वी असणारा त्याचा अभाव म्हणजे प्रागभाव.

प्रध्वंसाभाव – 'सादिरनन्तः ।' या लक्षणानुसार एखादी वस्तू नष्ट झाल्यावर उत्पन्न होणारा त्या वस्तूचा अभाव म्हणजे प्रध्वंसाभाव.

संशयाचा प्रागभाव म्हणजे संशय होईपर्यन्त असणारा त्याचा अभाव. पण प्रागभाव म्हटल्याने आपोआप वस्तूची उत्पत्ती येते. म्हणजे संशय उत्पन्न झाल्यावर प्रागभाव नष्ट होतो असा अर्थ होईल. तर संशयाच्या अभावाचे अधिकरण तेव्हा राहणार नाही. म्हणून संशयाचा अभाव असे म्हटले तर संशय स्वतः अभावाचा आश्रय होऊन अधिकरण नाश म्हणजे संशयनाश असा अर्थ होतो. तर तेव्हा आस्तिकत्व तुम्हाला स्वीकारावे लागेल किंवा न्यायप्रवृत्ती आपोआप स्वीकारावी लागेल. जर या दोन्ही पक्षांची उपेक्षा केली तर तुमचे वचन केवळ विप्रतिपत्ती होऊन आमच्या समन्वयात ती व्यर्थ होईल.

'आश्रयोऽस्ति यथा वस्त्वविकल्पसविकल्पयोः ।
अधिष्ठानं तथैवात्मा संशयाध्यवसाययोः ।।'[117]

ज्याप्रकारे सविकल्पक आणि निर्विकल्पकज्ञानाचा एकच वस्तू आश्रय आहे त्याप्रमाणेच संशय आणि निश्चय या दोनही ज्ञानाचा एकच आत्मा आश्रय आहे. न्यायदृष्टीने सांगितलेला विचार दृष्टांत म्हणून संशय आणि निश्चय या दोहोंच अधिकरण एकच आहे असे या श्लोकात सांगितले आहे.

न्यायविचारात एकच वस्तू सविकल्पक आणि निर्विकल्पक प्रत्यक्षाचा विषय होते तेथे परस्पर विरूद्ध दोन प्रकारचे ज्ञान एकाच वस्तूविषयी होऊ शकते आणि वस्तूमध्ये विरोध नाही. तसेच संशय आणि निश्चय परस्परविरुद्ध असतानाही

त्यांचे अधिकरण साक्षीरूप आत्म्यामध्ये थोडासुद्धा विरोध येणार नाही कारण तो साक्षीच धर्मी होय.

जर असे म्हटले की अनुभवानेच सविकल्पक आणि निर्विकल्पकामध्ये विरोध नाही तर त्याच अनुभवाने संशय आणि निश्चयातसुद्धा विरोध नाही. धर्मी आणि विशेषण यामध्ये एक आवश्यक कल्पित असतो. जेव्हा धर्मी कल्पित मानला तेव्हा दुसरा आश्रय होतो. विशेषण कल्पित झाल्यास धर्मीत कोणताच विरोध येत नाही. तेव्हा ते विशेषण साध्यच होईल, सिद्ध होणार नाही. विद्वान् म्हणतात, धर्मीमध्ये सर्व विज्ञान राहते यात कोणताच विरोध नाही. विपर्यय तर विशेषणात राहतो. म्हणूनच येथे सर्व विचारांचा समन्वय केल्या जात आहे.

गुलाबराव महाराजांच्या मते जगात सर्व विकल्प धर्माविषयी होतात, धर्मीच्या विषयी नाही. अर्थात् धर्मी एक असूनही व्यक्ती आपल्या संस्कारांनी अनेक धर्मांचा आरोप करू शकतो. धर्मीच्या आपल्या धर्मांचे ज्ञान म्हणजे तत्त्वज्ञान आणि त्याच्या विपरीत ज्ञान म्हणजे भ्रम किंवा संशय.

ब्रह्मसूत्रभाष्यात शंकराचार्यांनी यांचे दोन प्रकार सांगितले आहे 1) वस्तुनिष्ठ व 2) व्यक्तिनिष्ठ. जसे कोणताही पदार्थ मंदप्रकाशात दिसल्यावर कुणाला हा स्थाणू आहे अथवा पुरुष असा संशय येऊ शकतो. हे व्यक्तिनिष्ठ आहे. परंतु तो स्थाणू अथवा पुरुष असणे त्याचे तत्त्व आहे, जे वस्तुनिष्ठ आहे. म्हणूनच प्रकार किंवा धर्मांचा समन्वय करणे या ग्रंथात अपेक्षित आहे.

धर्मीच्या साक्षात्कारानेच जर कृतार्थता होते तर आम्हाला धर्माच्या विज्ञानानेही कृतकृत्यता वाटेल. धर्मीच्या विषयात उत्पन्न विमर्शाचा योग्य समाधानाने नाश होतो तेव्हा जी कृतार्थता होईल ती संशयाच्या नाशाने उत्पन्न होईल.

कृतकृत्यता दोन प्रकारची असते. एक नित्य आणि दुसरी अनित्य. त्यांच्यामधील नित्य आत्मानंदाच्या रूपातच राहते. दुसरी संशय समाप्त झाल्यावर



होते. म्हणूनच वेदांती अज्ञानालासुद्धा नष्ट होणारा मानतात. कारण जेव्हा अज्ञान नष्ट होते तेव्हा ज्ञानसुद्धा कुठे राहील? हेच परम शिवसुद्धा म्हणतात.

व्यवहाराच्या विषयात जर विवाद झाला तर धर्मीसुद्धा कल्पित होईल. परमार्थात तर ब्रह्म निश्चयाने ईश्वर किंवा प्रकृतिसुद्धा होईल.

जर असे म्हटले की – ज्या ज्या विषयात विवाद उत्पन्न होतात त्यावेळी विशेषण आणि धर्मीची कल्पना केली जाते. कारण दुसऱ्या वेळी धर्मी किंवा विशेषणाच्या रूपात चित्तवृत्तीच राहत नाही – तर त्याचे उत्तर असे आहे की, व्यवहारात तर धर्मीचासुद्धा नाश मानला गेला आहे. परमार्थात तर जगत्कारणाच्या विषयात वेदांती परब्रह्माला धर्मी मानतात. नैय्यायिक ईश्वराला धर्मी मानतात तर सांख्य प्रकृतीला. कुठेही अभावाला धर्मीच्या रूपात मानले नाही हाच या श्लोकात 'हि' या अव्ययाचा अर्थ आहे.

'जडो धर्मी तदा ब्रह्मसत्तातो नातिरिच्यते ।<br>
धर्मी जीवस्तदा सच्चिद्ब्रह्मणो नातिरिच्यते ।।

धर्मीश्वरस्तदा ब्रह्म सच्चित्सौख्यं पृथङ् न हि ।<br>
सच्चिदानन्दभेदोऽपि वृत्त्या नैव स्वरूपतः ।।'[118]

जडपदार्थ धर्मी झाला तर तो पदार्थ ब्रह्माच्या सत्तेपासून भिन्न नाही. जीव धर्मी झाला तर तो सच्चिद्ब्रह्म होऊन अर्थात् ब्रह्माच्या चैतन्य अंशाहून भिन्न नाही. जर ईश्वर धर्मी असता तर तो ब्रह्माच्या आनंद अंशाहून भिन्न नाही. सत्, चित्, आनंद भेदसुद्धा केवळ त्या चित्तवृत्तीमुळे आहे, स्वरूपामुळे नाही.

1) धर्मी जड पदार्थ असेल (प्रकृती) तर तो ब्रह्माच्या सत्तेहून वेगळा नाही. 2) धर्मी जर जीव असेल तर तो ब्रह्माच्या सद् आणि चित् अंशांहून भिन्न नाही. 3) धर्मी जर जीव असेल तर तो ब्रह्माच्या सत्, चित्, आनंद अंशांहून भिन्न नाही. तेव्हा कोणाच्याही धर्मीच्या स्वरूपात कोणत्याही प्रकारे समन्वय होऊ शकेल त्याच स्वरूपात प्रयोजनसुद्धा प्राप्त होईल.

'भवेदेवं प्रकारेऽपि सर्वशास्त्रसमन्वयः।
तस्मादत्र प्रमाणानि प्रवक्ष्यामि यथामति।।'[119]

कारण, स्वरूप आणि प्रयोजन यादृष्टीने सर्वशास्त्रांचा समन्वय होऊ शकेल. म्हणून मी माझ्या बुद्धीनुसार याविषयी प्रमाण सांगणार आहे, असे महाराज म्हणतात.

सूत्र, व्याख्यान, अनुव्याख्यान, इ. हे सर्व परमेश्वराचे निःश्वास आहेत. योग, सांख्य, शिल्पादि विद्या, कर्म, वेद, शास्त्र इ. सर्व विज्ञान परमेश्वरापासून आहे.

'योगो ज्ञानं तथा सांख्यं विद्या शिल्पादि कर्म च ।
वेदाः शास्त्राणि विज्ञानमेतत्सर्वं जनार्दनात्।।'

वेद, धर्मशास्त्र, पुराण, भारत, वेदांग, उपवेद, कामिकादि आगम, कापाल, लकुल इ. पाशुपत, सोम, भैरवादि आगम आणि त्यांचे शेकडो भेद, वैष्णवागम, ब्राह्मागम, बौद्धागम, जैनागम, चार्वाक, तर्क, मीमांसा, सांख्ययोग, त्यांचे भेद व इतर शास्त्रे हे सर्व सर्वज्ञ परमेश्वराने संक्षेपाने तयार केले. (सूतसंहिता. 22) असे वेद आणि पुराणांमध्ये नारायण, शिवसुद्धा शास्त्रांचे कारण सांगितले आहे. नारायण, शिवसुद्धा सर्व कारणांचे स्वरूपी आहेत.

'ननु सूतसंहितायां कथमधिकारिविभेदतो मार्गाः।
प्रोक्तास्तस्मान्न स्यात् पक्षक्षपणात्समन्वयो युक्तः।।'[120]

सूतसंहितेमध्ये अधिकाऱ्याच्या भेदाने अनेक मार्ग कसे सांगितले आहेत? म्हणूनच बौद्धांशी समन्वय योग्य नाही. अधिकाऱ्याच्या भेदाने सर्व मार्ग प्रामाणिक असूनही वेदांचेच श्रेष्ठत्व सूतसंहितेमध्ये सांगितले आहे. म्हणूनच अवैदिक मार्गांकडे पक्षपात आणि सर्व मार्गांचा समन्वय योग्य नाही. वेदांचे श्रेष्ठत्व वेदांच्या विषयातच सांगितले आहे. तसेच त्या शास्त्रात त्याच्या श्रेष्ठत्वाचे प्रतिपादन केले पाहिजे. जसे अन्य मार्गाच्या अवलंबाने वैदिक भ्रष्ट होतात तसेच वैदिक मार्गाने तान्त्रिकही



भ्रष्ट होतात असे मेरुतंत्र ग्रंथात महेश्वराने सांगितले आहे.

वाममार्गाचे अनुसरण करणारा सव्यमार्गाच्या अनुसरणाने भ्रष्ट होतो. तसेच सव्यमार्गाचे अनुसरण करणारा वाममार्गाच्या अनुसरणाने भ्रष्ट होतो. अशाप्रकारे कारण रूपाने सत्पदार्थासोबत समन्वय केला जातो. तेव्हा निरोपित होणाऱ्या पदार्थाच्या समन्वयात काही लक्षणे सांगितली जातात आणि ज्याला वेदान्ती 'ब्रह्म' असे म्हणतात. इतर दार्शनिक प्रधान (प्रकृती) किंवा पुरुष असे म्हणतात, त्या जगत्कारण परमेश्वराला विघ्ननाशाकरिता माझा नमस्कार.

वेदान्ती ज्याला 'ब्रह्म' असे म्हणतात त्यालाच सांख्य 'पराप्रकृति' असे म्हणतात. असे कां? कारण सांख्यमतानुसार प्रकृति निरवयव (अवयवरहित) व नित्य आहे. त्या प्रकृतीमध्ये चैतन्याचा स्वीकार केला नाही तरी अस्तित्व, महत्त्व आणि जगत्कारण धर्मांनी त्या प्रकृतीलासुद्धा व्यापक समजतात.

जसे सांख्य 'प्रकृतीला' व्यापक मानतात तसे काही दार्शनिक 'पुरुषाला' व्यापक मानतात. तसे जगताचे उपादानकारण ईश्वर आहे असे काही लोक मानतात. अशा त्या परमेश्वराला विघ्ननाशाकरिता माझा नमस्कार असा अर्थ आहे.

वेदान्तशास्त्रात अंतिम तत्त्व म्हणजे ब्रह्म असे म्हटले गेले आहे. परंतु सांख्यदर्शनात अंतिम तत्त्व प्रधान (प्रकृति) म्हटल्या गेले आहे, काही ईश्वराला जगताचे कारण मानतात, असे अनेक रूपांमध्ये मानल्या गेलेल्या त्या अंतिम तत्त्वाला नमस्कार.

'शान्त आसितुमिच्छामि स्वात्मन्येव जिनो यथा।
इति वासिष्ठवाक्याच्च बौद्धशास्त्रान्वयश्चिति।
नागार्जुनोऽप्येवमाह शून्यं ब्रह्मार्थबोधकम्।।'[121]

मी माझ्याच स्वरूपात शान्त होऊन जिना (आत्मज्ञानी) सारखा राहू इच्छितो' या योगवासिष्ठाच्या वाक्यातून चैतन्यात बौद्धशास्त्राचा समन्वय होतो तसाच आचार्य

नागार्जुनानेही जो 'शून्य' असे म्हटले आहे तो ब्रह्माचा अर्थच सांगतो.

सर्व आलंबनधर्मांनी, सर्व तत्त्वांनी, सर्व क्लेशांनी आणि वासनांनी शून्य पदार्थालाच शून्य म्हणतात. परंतु तो परमार्थाने शून्य नाही.

'आलोकमाला' या ग्रंथात असे सांगितले आहे –

'जी स्थिती सात्त्विक राहण्याने आपल्या विरूद्ध असलेल्या तमोवृत्तीला अवसर देत नाही आणि जिला जाणणे कठिण आहे ती स्थिती 'शून्यता' अशी म्हणविली जाते. ही शून्यता लोकरूढीनुसार नास्तिकता या अर्थामध्ये जाणारी नाही.

योगवासिष्ठात एक वाक्य आहे –"मी ज्ञानी व्यक्तीसारखा शांत राहू इच्छितो" यावरून बौद्धांचा उल्लेख होतो. गुलाबराव महाराजांच्या नुसार येथे चैतन्यात बौद्धविचाराचा समन्वय होऊ शकतो. बौद्धदर्शनाचे शून्यवादी आचार्य नागार्जुनांच्या मतानुसारही जे अंतिम तत्त्व शून्य आहे ते ब्रह्माचे वाचक आहे. म्हणूनच त्यांनी शून्याचे शास्त्रीय लक्षण दिले आहे. सर्व धर्म, तत्त्व, क्लेश आणि वासनारहित तत्त्वच शून्य आहे.

'बिन्दुसत्तां विना शून्यं दशताजनकं कथम् ।
शून्यसत्ताऽनवच्छिन्ना नैकांकादृशतोद्भवः ।।' [122]

जर सर्वांचे मूळ कारण असलेला 'बिन्दु' राहत नाही तेव्हा केवळ शून्य त्या दशांना कसे उत्पन्न करील? कोणतीही अमर्यादित शून्याची सत्ता स्वतः त्या दशेचे कारण होत नाही. म्हणूनच गणितशास्त्रात सांगितले जाते की 'शून्य' नेहमीच असते. जगत् ज्यात नाही तो आत्मा केवळ पूर्ण रूपात राहतो. पुन्हा प्रमाण उद्धृत केले जात आहे. "ज्याला शैव 'शिव' म्हणतात, वेदान्ती 'ब्रह्म' म्हणतात, बौद्ध 'बुद्ध' असे म्हणतात आणि प्रमाण सांगण्यात समर्थ नैयायिक 'कर्ता' असे म्हणतात, जैनधर्मी 'अर्हत्' असे म्हणतात, मीमांसक 'कर्म ' असे म्हणतात. तो सर्व लोकांचा प्रभू परमेश्वर आपली इच्छा पूर्ण करो." वेदान्ताच्या दृष्टीने जीवतत्त्वात जगत् न



राहिल्यामुळे जीवसुद्धा शून्यच आहे.

ज्याप्रकारे शैव शिवाला सर्वज्ञ, सर्वकर्ता आणि सर्वशक्तिमान् इ. लक्षणांनी युक्त मानतात तसेच वैष्णव विष्णूला मानतात.

बौद्ध आणि जैन जीवाला अशाप्रकारच्या गुणांनी युक्त मानतात. जसे योगवासिष्ठातही जीवाला प्रयत्न इ. मानतात. जसे बौद्ध सर्वज्ञत्व, सांख्य मुक्ती होण्याच्या स्थितीला मानतात, तसे योगशास्त्रात पुरुष उदासीन, निःसंग आणि आचार्य मानल्या गेला आहे.

सर्वशक्तीच्या धर्माला घेऊन वैशेषिक दर्शनात ईश्वराला कर्ता मानले आहे. सर्व वेदान्ती ब्रह्माला उपादान व निमित्तकारण मानतात.

'सर्वांशस्य भवत्प्राप्तिश्चेकांशोपासनेऽपि च ।
अतः फलदृशाऽपि स्यादीशे शास्त्रसमन्वयः ।।' [123]

परमेश्वराच्या सर्वांशाने ईश्वराची प्राप्ती होते. एकांशाने उपासना होते म्हणून फळाच्या दृष्टीनेही ईश्वरामध्ये शास्त्रसमन्वय होतो.

महाभारतात सांगितले आहे –

हे राजर्षी, सांख्य, योग, पांचरात्र, वेद आणि पाशुपत हे सर्व ज्ञान म्हणजे भिन्न भिन्न मते आहेत. हे राजन्, आपल्या शास्त्राच्या ज्ञानानुसार परमेश्वरावर निष्ठा होते. परंतु तमोगुणामुळे परमेश्वराला तसे जाणत नाही. त्यालाच बुद्धिमान् शास्त्रकार आपल्या शास्त्रांनी व्यक्त करतात. त्यालाच नारायण ऋषी, निष्ठा इ. म्हणतात. त्याशिवाय दुसरे काही नाही हे माझे वचन आहे. संशयरहित सर्व पदार्थांमध्ये नारायण नित्य राहतो.

"सांख्यं योगं पांचरात्रं वेदाः पाशुपतं तथा ।
ज्ञानान्येतानि राजर्षे विद्धि नाना मतानि वै ।।
यथागमं यथाज्ञानं निष्ठा नारायणः प्रभुः ।

न चैनमेवं जानन्ति तमोभूता विशांपते ।।
तमेव शास्त्रकर्तारः प्रवदन्ति मनीषिणः ।
निष्ठां नारायणमृषिं नान्योऽस्तीति वचो मम ।
निःसंशयेषु सर्वेषु नित्यं वसति वै हरिः ।।"[124]

यावर टीकाकारांनी जे शास्त्राधारित श्रेष्ठत्व सांगितले तो वैदिकांचा अलंकार आहे आणि येथे श्लोकाचा अर्थ सिद्ध करणारा नाही. विष्णूप्रती शक्ती, विष्णूचे ज्ञान, वेद, परंज्ञान ही सर्व भिन्न भिन्न मते आहेत आणि केवळ जीवाच्या उद्धारासाठी आहेत. जसे स्त्रीचे मातृत्व पुत्रालाच माहित असते, पतीला नव्हे. तसेच कोण कशाचा अधिकारी आहे हे ईश्वरच जाणतो, दुसरा कोणी नाही.

तसेच आचार्य मधुसूदनानेही आपल्या 'प्रस्थानभेद' नामक ग्रंथामध्ये सांगितले आहे की सर्व पूर्वर्षी आपापल्या विषयात सर्वज्ञ आहेत. म्हणूनच त्याच विषयात ते भ्रान्त नाहीत. सर्व धर्मांचा व दर्शन मार्गांचा समन्वय करतांना त्यांनी म्हटले आहे की, दार्शनिक मुनी, ऋषी सर्वज्ञ असल्याने त्यांच्यात भ्रांतीची कल्पना करणे योग्य नाही. तसेच सर्व शास्त्रांचा कर्ता ईश्वर आहे हे 'शास्त्रयोनित्वात् ।'[125] यात सांगितले आहे आणि तसेच 'तत्र निरतिशयं सर्वत्रबीजम् ।'[126] या योगसूत्रातही याच विषयाचे प्रतिपादन केलेले आहे.

जर ही शंका केली गेली की ते सर्व ऋषी गौणार्थात सर्वज्ञ आहेत तर आम्ही पूर्वीच सांगितले की ईश्वरच सर्व शास्त्रांचा कर्ता आहे. प्राचीन मुनी स्वयं वेदांचे द्रष्टे होते. तसेच तुमचे मुनीसुद्धा विभिन्न आगमांचे द्रष्टे होतात. अशाप्रकारे शब्दामध्ये समन्वय झाल्यानंतर साक्षिगोचर प्रत्यक्षात कुणात विवाद होणार नाही. अशाप्रकारे साक्षिचैतन्याला होणाऱ्या शाब्दप्रत्यक्षात समन्वय झाला तरी कोणात विवाद होणार नाही? म्हणून समन्वय सिद्ध झाला.

'सर्वत्र दृष्टान्तवैषम्यात् विरूद्धेऽपि च भावनात् ।
अल्पसत्वाच्च जीवस्य वितर्कोऽत्र भवेद्वृथा ।।' [127]



1) दृष्टान्तात भेद असल्यामुळे 2) विरुद्ध अंशात भावना होत असल्यामुळे आणि 3) जीव अल्पज्ञ असल्यामुळे वितर्क व्यर्थ होईल.

शाब्दज्ञान आणि साक्षिप्रत्यक्ष यात समन्वय प्राप्त झाला तरी अनुमानाने खंडन मंडन होण्याची शक्यता आहे. म्हणून या समन्वयात प्रमाण नाही असे म्हटले तर—त्याचं उत्तर असं आहे –

1) अनुमान तर स्थिर नाही, कारण त्यात सर्व उदाहरणांमध्ये वैषम्य आहे. जे जे उदाहरण दिले जाते ते तर सर्वप्रकारे समान नसते. म्हणून त्यात दुसऱ्यांना शंका होणे शक्य आहे आणि सिद्धान्तही शंकेने दुर्बल होईल. वेदान्ती स्वप्नाच्या उदाहरणाने जगाला मिथ्या मानतात. पण तेच उदाहरण घेऊन बौद्धांच्या विज्ञानवादाचे खंडन करतात.

2) अशाप्रकारे उदाहरणाचे दौर्बल्य दृष्टान्तात दिसते कारण त्याच्या विरूद्ध पदार्थात त्याची भावना केली जाते जसे –

1. महात्म्यांचे हृदय कसे असते? समुद्राप्रमाणे गंभीर असते.

विरूद्ध अर्थात – संसार कसा असतो? समुद्राप्रमाणे (गंभीर) असतो. दुर्जन कसा असतो? जळणाऱ्या अग्नीप्रमाणे.

पापाचा दाह कसा होतो? जळणाऱ्या अग्नीप्रमाणे.

अशाप्रकारे दृष्टान्त आणि उदाहरणामध्ये सर्वत्र विषमता दिसते.

(शंका) हेतूच्या निश्चयाने साध्याचा निश्चय झाला तर खंडन मंडन सार्थक होईल असे म्हटले तर ते योग्य नाही.

3) कारण, जीव तर अल्पज्ञ आहे.

हेतू तीन प्रकारचा असतो.

1. अन्वयव्यतिरेकी 2. केवलान्वयी 3. केवलव्यतिरेकी

अन्वयाद्वारे हेतूने साध्याची सिद्धी तर अनिश्चित आहे, कारण जीव अल्पज्ञ आहे. 'ही या स्वरूपाची वस्तू' अशा ज्ञानात सर्व जगाबद्दल होणाऱ्या संशयाचा समावेश होणार नाही.

'यत्र यत्र धूमः तत्र तत्र वह्निः' अशा प्रकारचे व्याप्तिवाक्य सुद्धा भ्रान्तिजन्य धूमाच्या विषयी दुर्बल आहे.

ज्या ठिकाणी ज्ञान झालेल्या धूमहेतूमध्ये व्याप्तीचा व्यभिचार होऊ शकेल तेथे 'वह्नि असण्याच्या' रूपाचे साध्य सिद्ध होणार नाही. जेवढ्या स्थानांमध्ये असे आहे तेवढ्या स्थानांमध्ये असेच राहील असे म्हटले तर हे प्रत्यक्षावर आश्रित असल्यामुळे अनुमितीसाठी प्रमाण राहणार नाही.

असे = धूम आहे.

असे = वह्नि असतो.

संपूर्ण जगात असेच असते असे म्हटले तर सर्वज्ञ आचार्यापेक्षा अल्पज्ञ जीवाला शाब्दज्ञानाचा आश्रय घ्यावा लागत असल्यामुळे अनुमानात प्रमाण राहणार नाही.

समन्वयात अशी शंका येऊ शकते की, शब्द आणि प्रत्यक्षाने समन्वय झाल्यावरही अनुमान, समन्वयात बाधित करण्यात अजून सक्षम होतो. अर्थात् अनुमानाने समन्वयाचे खंडन होऊ शकते. यावर गुलाबराव महाराज म्हणतात की, अनुमान स्वतः स्थिर नाही. कारण अनुमानात सर्व उदाहरणांची विषमता दिसते. आपल्या सिद्धान्ताकरिता कुणी दुसऱ्याने उदाहरण दिले तर तिसरी व्यक्ती त्याठिकाणी शंका घेऊ शकते म्हणून अनुमान सबळ नाही. याविषयी 'तर्क अप्रतिष्ठानात् ।'[128] इ. ब्रह्मसूत्रही प्रमाण आहेत. उदाहरण कसे दुर्बल आहे हे सिद्ध करतांना गुलाबराव महाराज म्हणतात– वेदान्ती जगताला मिथ्या सिद्ध करण्याकरिता स्वप्नाचे उदाहरण देतात. त्याच उदाहरणाने तेच वेदान्ती बौद्धांच्या क्षणिकवादाचे खंडन करतात.



हेतूच्या निश्चयाने साध्याचा निश्चय संभव आहे. तर त्याने खंडन मंडनही संभव आहे, असे जर म्हटले तर त्याचे उत्तर देतांना गुलाबराव महाराज म्हणतात की, जीवाची बुद्धी अल्प आहे. म्हणून अन्वयहेतूने साध्याची सिद्धी होत नाही. जो काही अन्वयव्यतिरेकी हेतूच्या उदाहरणाच्या रूपात दिल्या जातो 'यत्र धूमः तत्र अग्निः ।' हा ही समर्थ हेतू नाही. कारण हे भ्रान्ति धूमाच्या (ज्या धूमाविषयी भ्रम आहे तो) विषयात प्रवृत्त होण्याने दुर्बल आहे.

'हेतुद्वयेऽवशिष्टेऽपि श्रद्धातत्त्वं न हीयते
जीवसामान्यसार्वज्ञाद्विरोधवचनादुत ।।'[129]

(इतर) दोन हेतूंमध्ये भेद राहिला नाही तरी 'श्रद्धा' हे तत्त्व त्यामध्ये राहणारच. जीवाला सामान्य विषयात सर्वज्ञत्व होईल आणि विरोधाचे वचन राहील.

अन्वय आणि व्यतिरेकी हेतू (अन्वयव्यतिरेकी हेतुः) वृथा झाला तरी बाकी दोन हेतू– केवलान्वयी, केवलव्यतिरेकी हेतू तर सार्थक राहतील आणि साध्यसिद्धीने समन्वयाचे निराकरण होऊ शकेल, असे म्हटले तर ते ठीक नाही.

कारण, बाकी दोन हेतूंमध्ये सुद्धा साध्याची सिद्धी श्रद्धेने होते.

1. जीवाला सामान्य विषयात सर्वज्ञत्व होईल. जसे –

ज्या ज्या ठिकाणी पदार्थत्व आहे त्या त्या ठिकाणी अभिधेयत्व आहे. 'घट' या ठिकाणी पदार्थत्व हेच अभिधेयत्वाच्या पर्यायाने घेतलेले आहे. पक्ष आणि साध्य एकच ठिकाणी राहण्याचा दोष आहे.

जीव सामान्य विषयातच सर्वज्ञ होईल, विशेषात नाही म्हणून श्रद्धाही त्यात स्वीकारलेली आहे. सांख्यसारग्रन्थात विज्ञानभिक्षूने सुद्धा अनुमान सामान्याचे बोधक आहे विशेषाचे नाही असे म्हटले आहे.

2. तसेच विरोधात सुद्धा आहे. जसे –

जगाला सत्य मानणारे जगातील उदाहरणाने जगाला नित्य असे सिद्ध

करतात तसेच जगाला असत्य मानणारे जगातील उदाहरणाने जगाला अनित्य सिद्ध करतात.

सांख्य – जे जे सत्य आहे ते नित्य आहे.

परंपरेने स्थायी असण्याचा अनुभव होत असल्यामुळे, पृथिवी–इत्यादीप्रमाणे.

असे प्रतिपादित करतात.

बौद्ध – जे सत्य आहे ते क्षणिक आहे

अस्थिर इ. अनुभव होत असल्यामुळे बीज इ. प्रमाणे.

असे प्रतिपादित करतात.

म्हणून वादी आणि प्रतिवादी या दोघांना पंचावयव वाक्यांचे जल्पन करण्यात सारखे सामर्थ्य आहे. त्यामुळे तर्काने कोणाचेही खंडन योग्य नाही. अशाप्रकारे सर्वांची युक्ती दुर्बल असल्यामुळे ते ते फक्त श्रद्धेने सिद्ध होते. म्हणून प्रत्येक ठिकाणी समन्वय होईलच.

जर असे म्हटले की, अन्वयव्यतिरेकी हेतू असमर्थ असल्यावरही केवलान्वयी, केवलव्यतिरेकी नावाचे दोन हेतू असल्याने त्यांच्या द्वारे साध्य सिद्ध करून समन्वयाचे खंडन करू शकतात. तर यावर गुलाबराव महाराज म्हणतात, अशा ठिकाणी साध्य सिद्धी श्रद्धेनेच होते. याप्रकारे हेतूचे वैषम्य आणि हेतूचा विरोध या दोषांमुळे तर्क समन्वयाचे खंडन करण्यासाठी समर्थ नाही, हे गुलाबराव महाराजांचे मत आहे. त्यामुळे सर्व विषयांमध्ये समन्वय संभव आहे.

प्राचीन न्यायशास्त्रानुसार वेदांचे प्रामाण्य सिद्ध करण्याकरिता न्यायाचा उपयोग होतो आणि संशय इ. त्याच न्यायाची अंगे आहेत. वाद, छल, जल्प, वितंड हे खंडन मंडन करून बुद्धिकुशलता दाखविण्यासाठीच आहेत.

गुलाबराव महाराजांच्या मते, तर्काचाच आश्रय घेतला तर गर्व होण्याची



शक्यता आहे. म्हणून केवळ शब्दांवर अथवा तर्कावर आधारित राहाणे व्यर्थ आहे. जर शब्द आणि तर्क यामध्ये सपक्ष दोष दाखविला तर तो तर्कामध्येच होईल, शब्दप्रमाणामध्ये नाही. असे असेल तर दुसरा मार्ग नाही, दुसरा मार्ग राहिलाच पाहिजे असा तुझा आग्रह का? (समन्वयाने) सर्व लोकांना सुख होत असेल तर तुला चिन्ता कशाची?

तर व्यासमहर्षींनी ब्रह्मसूत्रांमध्ये सांख्य, इ. चे खंडन कां केले आहे? म्हणजे ते फक्त वेदनिष्ठा व्यक्त करण्यासाठी आणि वस्तुतः केलेलं खंडन नाही. व्यासमहर्षींची पूर्वरचना (ब्रह्मसूत्र) वादींच्या विनोदासाठी आणि दुसरी रचना 'वेदान्त' नावाने प्रसिद्ध असून जिज्ञासू लोकांच्या ज्ञानासाठी आहे.
वेदव्यास महर्षींनी ब्रह्मसूत्रांमध्ये सांख्याचे निराकरण केले, पण कापिलमत म्हणून तेच भारतातील मोक्षधर्मामध्ये स्वीकारले. त्यांनी ब्रह्मसूत्रांमध्ये पांचरात्राचे निराकरण केले पण तेच त्यांनी महाभारतात स्वीकारले.

महत् पासून सात तत्त्वे आचार्यांनी सूत्रभाष्यात निराकृत केली पण तीच त्यांनी गीतेच्या तेराव्या अध्यायाच्या भाष्यात स्वीकारली. त्यामुळे खंडन मंडन हे फक्त वाद करणाऱ्यांच्या विनोदासाठी आहे. पण्डितांचे पाण्डित्य केवल भुक्तीसाठी आहे, मुक्तीसाठी नाही.

'शाब्दे समन्विते त्वेवमन्यशब्दो वृथेति चेत् ।
रक्षिते गौणशब्देऽपि मुख्यः शब्दो वृथा न किम् ।।' [130]

शाब्दाविषयी समन्वय झाला, दुसरे शब्द आता व्यर्थ आहेत असे म्हटले आणि गौणशब्दांचे रक्षण केले तरी मुख्य शब्द व्यर्थ होणार नाही का? बुद्धी विशद करण्यासाठी वेदांवर आश्रित असलेला तर्क स्वीकारावा लागेल. कारण, शब्दाचे खंडन करण्यास तर्क समर्थ नाही.

माझ्या शब्दांवर आश्रित असलेल्या तर्काने तुमच्या शब्दांचे खंडन मी करणार आहे. कुठल्याही प्रकाराने तर्क दूर झाला तर केवळ शब्दप्रमाणाने सिद्ध

होणाऱ्या उपायांमध्ये समन्वय होईल आणि त्याने उपायामध्येसुद्धा समन्वय होईल.

उपायांचा समन्वय तर भगवान् श्रीकृष्णाने सांगितला —

काही लोक ध्यानाने आत्मदर्शन करतात, तर काही लोक आत्म्यात आत्मदर्शन करतात, काही लोक सांख्याने, योगाने आणि काही लोक कर्मयोगाने आत्मदर्शन करतात. वेदांवरच आश्रित असल्यामुळे ते सुद्धा मृत्यूला पार करून जातात.

उपायसमन्वयमाहुः हृदयप्रियचरणाः—

"ध्यानेनात्मनि पश्यंति केचिदात्मानमात्मना ।
अन्ये सांख्येन योगेन कर्मयोगेन चापरे ।।
तेऽपि चातितरंत्येव मृत्युं श्रुतिपरायणाः ।।"[131]

सूतसंहितेत जे धर्माचे श्रेष्ठत्व सांगितले आहे ते धर्मपालनासाठी आहे, ईश्वरासाठी कधीच नाही. कल्पित असलेले उपायसुद्धा भगवद्भक्तीचे साधन असू शकतील असे महात्मा श्रीकृष्ण, ज्ञानदेव, इ. म्हणतात.

तरी सर्वांचा तत्त्वभेद कुठून होणार? त्यांच्या विरोधाचे वचन हेच त्यांच्या तत्त्वांमध्ये अभेद सांगते. महात्मा लोकांच्या वचनांमध्ये विरोध असण्याची संभावना असेल तर स्वयं परमेश्वर अशा कपिलमहर्षींनी दुसऱ्यांची वंचना करण्यासाठी जडपदार्थापासून सृष्टी कशी बरे सांगितलेली असती?

कपिलमहर्षी सर्वज्ञ असतील तर कणादमहर्षी सर्वज्ञ नाहीत असे यथार्थज्ञान कसे होईल? म्हणून असा न्याय श्रद्धेने घेतलेल्या मतांमध्ये प्रसक्त होईल. मुनी सर्वज्ञ असले तर आम्ही कां नाही? असा हा न्याय बुद्धिमात्र आश्रित करून चालणाऱ्या वादांमध्ये प्रसक्त होईल.

शब्दांवरच आधारित असलेल्या मनात दैन्याचा दोष येईल, तर्कावरच आधारित असलेल्या मनात गर्वाचा दोष येईल.स्वपक्षाच्या दोषाने दोनही व्यर्थ होतील असे माझे मत आहे, स्वपक्षदोषही तर्कातच येईल, शब्दाश्रित मतात नाही.



भागवतात श्रीकृष्ण परमात्म्याने स्वयं उद्धवाला सर्व तत्त्वांचा समन्वय सांगितलेला आहे.

' युक्तं च सन्ति सर्वत्र वदन्ति ब्राह्मणा यथा ।
मायां मदीयामुद्गृह्य वदतां किन्नुदुष्करम् ।।[132]

ज्याप्रकारे पण्डित सांगतात तसे प्रत्येक ठिकाणी युक्ती आहेत. माझ्याच मायेला घेऊन बोलणाऱ्यांना काय कठिण आहे?

याविषयी पण्डितांच्या आरंभवाद, परिणामवाद, विवर्तवाद अशा तीन विकल्पना सिद्ध आहेत. नैयायिकांचा आरंभवाद, सांख्यांचा परिणामवाद, वेदान्तींचा विवर्तवाद असे शास्त्रांमध्ये सिद्धान्त प्रसिद्ध आहेत. परंतु गुलाबराव महाराजांच्या मते विवर्तवादच स्वीकार्य आहे. या तीनही वादांचे प्रामाणिक श्लोक भागवतादि ग्रंथांमध्ये पाहता येऊ शकतात.

स्वप्नात अवयवांच्या संयोगाने द्व्यणुकादि उत्पन्न होणार नाही का? तसेच स्वप्नातल्या कपालसंयोगाने कुम्भाची सृष्टी कोणी नाकारली? आरंभवादसुद्धा असाच मायेने संभव आहे. परिणामाच्या विवादाने स्वप्नात दुधाचे दही बनणार नाही का? मायेने अवयवांचा संयोगच आरंभ म्हटलेला आहे, तर गुणांचा परिणामच परिणाम म्हटलेला आहे.

वेदान्तात अज्ञानही तमोवत् (तमो गुणाप्रमाणे) सावयव म्हटले आहे. सांख्यभाष्यातही गुणांच्या आश्रयाने प्रकृती सावयव म्हटलेली आहे.

न्याय आणि वैशेषिकामध्ये तसेच अनेक परमाणू सांगितलेले आहेत. अशाप्रकारे तीन वादांमध्ये शास्त्रच प्रमाण आहे.

'तत्र परमाणुवादे शास्त्रम् :—

"चरमः सद्विशेषाणामनेको संयुतः सदा ।
परमाणुः स विज्ञेयो नृणामैक्यभ्रमो यथा ।।'[133]

परमाणुवादात शास्त्र –

विशेष असणाऱ्या पदार्थांचा अंतिम, अवयव परमाणू असे समजावे आणि त्याने लोकांना एकत्व भ्रम आहे.

प्राणनाथ श्रीकृष्णाने स्वतः असे म्हटले – कार्य, कारण, कर्ता–यांच्यामध्ये प्रकृतीच कारण आहे. हे सर्व सत् यातच अंतर्भूत होईल. म्हणून भेद काही राहणार नाही. म्हणून सर्व शास्त्र सुद्धा मायामय आहे असे सिद्ध होते.

"अहं पयो ज्योतिरथानिलो नभो मात्राणि देवा मन इन्द्रियाणि कर्ता

महानित्यखिलं चराचरं त्वय्यद्वितीये भगवन्नयं भ्रमः"[134]

हे भगवान्! मी, पाणी, अग्नी, वायू, आकाश, तन्मात्रा, देवता मनस्, इन्द्रिय, कर्ता (पृथिवी) महत्, हे सर्व चराचर एकमात्र तुमच्यातच होणारा भ्रम आहे.

हेच विज्ञानभिक्षूने सांख्यसार ग्रन्थात म्हटले आहे –

ज्या तत्त्वामध्ये नाम आणि रूपाने मुक्त हे जग सुस्थिर आहे त्याला काही प्रकृती म्हणतात, काही माया म्हणतात तर काही परमाणू म्हणतात.

अशाप्रकारे उपाधीत आणि उपहित असलेल्या पदार्थात समन्वय सांगितलेला आहे. बुद्धिमान व्यक्तीने ज्ञानेश्वराचे स्मरण करून वाद सोडवावा.

सर्व भारतीय दर्शनांमध्ये स्थूलदृष्टीने अनेक विरोध दिसून येतात. परंतु या विरोधाभासांमुळे त्या दर्शनाचा अपप्रचार करणे अयोग्य आहे, असे गुलाबराव महाराज म्हणतात.

या ग्रंथात गुलाबराव महाराजांनी उपाधी आणि उपाधियुक्त या दोघांमध्ये समन्वय सांगितला आहे. श्री ज्ञानेश्वरांचे स्मरण करून विद्वानांनी सर्व विवाद सोडले पाहिजेत हा त्याचा निष्कर्ष आहे.

दर्शनांमध्ये विरोध केवळ धर्माला आहे. धर्म ज्याच्यावर आश्रित आहे. तो



'धर्मी' एकच आहे. ज्याच्यात समन्वय संभव आहे. धर्माच्या दर्शनांमध्ये परस्पर भेद दाखविणे केवळ पांडित्याचे निदर्शन असते. आत्मज्ञान्याला हा विरोध बाजूस सारुन एक समन्वय सिद्ध करणे आवश्यक आहे. म्हणून ग्रंथाच्या शेवटी गुलाबराव महाराजांनी हेच सांगितले आहे की, ज्ञानेश्वर महाराजांना हृदयात ठेऊन सर्व विरोधांना दूर करून आपल्यासाठी समन्वय सिद्ध करायला हवा.

सर्व भारतीय दर्शनांमध्ये स्थूलदृष्टीने अनेक विरोध दिसून येतात. परंतु या विरोधाभासांमुळे त्या दर्शनांचा अपप्रचार करणे अयोग्य आहे असे महाराज म्हणतात. शास्त्रांमध्ये दिसणाऱ्या भेदांचा समन्वय मननाने केला जाऊ शकतो, असे युक्तिपूर्वक महाराजांनी या ग्रंथाद्वारे पटवून दिले आहे. केवळ 98 श्लोकांतच ग्रंथरचना थांबल्याने समन्वयाचे मार्गदर्शक तत्त्व विस्तारपूर्वक समजावून देऊन त्यानुसार परस्पर भेदभावना कशी नाहीशी करावी याबाबतच्या महाराजांच्या विचारांपासून आपण वंचित राहिलो आहोत.

8. युक्तितत्त्वानुशासनम्

या लघुप्रकरणग्रंथाच्या आरंभी मंगल श्लोकात गुलाबराव महाराजांनी याचे प्रयोजन सांगितले आहे की हा ग्रंथ सर्व शास्त्रसिद्धान्तांमध्ये प्रवेशाकरिता लिहिलेला आहे. महाराज म्हणतात,

''ज्ञानेश्वरं गुरु नत्वा युक्तितत्त्वानुशासनम् ।
सर्वशास्त्रप्रवेशाय प्रवक्ष्यामि यथामति ।।''[135]

या ग्रंथात तत्त्वविचारासंबंधी दर्शनांच्या सर्व पारिभाषिक शब्दांचे व तत्त्वांचे स्वरूप स्पष्ट केलेले आहे.

या ग्रंथात सांख्य, योग, न्याय, वेदान्त, इ. दर्शनांच्या आधारे पदार्थ लक्षणे सांगितलेली आहेत. हा ग्रंथ अपूर्ण स्वरुपात उपलब्ध आहे.

नित्य व अनित्य या दोन भेदांनी तत्त्व दोन प्रकारचे आहे. ज्याचा नाश होत नाही ते नित्य आणि ज्याचा नाश होतो तो अनित्य. वेदान्तात तर ब्रह्मभिन्न सर्व पदार्थ अनित्य आहेत. काही पदार्थ व्यवहार होईपर्यन्तच नित्य व अनित्य असतात आणि हे तत्त्व दुसऱ्या दृष्टीने ज्ञान व ज्ञेय या भेदांनी दोन प्रकारचे आहे. हे ज्ञान साक्षिज्ञान आणि वृत्तिज्ञान भेदांनी दोन प्रकारचे आहे. साक्षिज्ञान वेदान्तात प्रसिद्ध आहे आणि हे विदेह कैवल्यापर्यंत नित्य आहे. वृत्तिज्ञान 'अहम्' आणि 'इदम्' यांच्या रूपांनी दोन प्रकारचे आहे. 'अहम्' वृत्तीचा ज्ञाता, प्रमाता, कर्ता, भोक्ता इ. शब्दांनी व्यवहार होतो. सर्व दर्शनांमध्ये हा 'अहम्' मोक्षापर्यंत नित्य आहे. 'इदम्' वृत्तीचे ज्ञानही दोन प्रकारचे आहे. यथार्थ व अयथार्थ. यथार्थाचे लक्षण आहे – 'व्यवहार योग्यम्' अर्थात् ज्याच्याशी व्यवहार होऊ शकतो तो यथार्थ. कोणत्याही प्रयोजनाला संपादित करणारा 'व्यवहार' म्हणविल्या जातो. वेदान्ताहून भिन्न दर्शनांमध्ये उत्पत्तीच्या अवस्थेत हे ज्ञान अनित्य आहे. लयेच्या दशेत संस्काराच्या रूपात नित्य आहे. अयथार्थ ते ज्ञान आहे जे केवळ भासमान् आहे.



यथार्थ ज्ञानाचे चार प्रकार आहेत. 1) संस्कार, 2) स्मृती, 3) प्रत्यभिज्ञा, 4) प्रमा यांच्यात 1) संस्कार –'मनसि ज्ञानस्य लीनभावः संस्कारः ।'136 मनात ज्ञानाची लय होण्याची स्थिती 'संस्कार' आहे. यथार्थ ज्ञानाने होणारा संस्कार यथार्थ आहे आणि भ्रमाने होणारा अयथार्थ आहे. 'संस्कारमात्रजन्यं ज्ञानं स्मृतिः ।'[137] केवळ संस्काराने होणारे ज्ञान 'स्मृती' आहे. पूर्वदेश व काळाशी संबंध ठेवणारे मानसिक ज्ञान 'स्मृती' म्हणविल्या जाते, हे अनित्यच आहे.

2) स्मृती – यथार्थ व अयथार्थ भेदाने 'स्मृती' दोन प्रकारची होऊ शकते.

3) प्रत्यभिज्ञा –'स्मृतिपूर्वः परत्र पूर्वदृष्टपरिचयः प्रत्यभिज्ञा ।'[138] स्मृतीच्या आधारे होणारे आणि पूर्वी प्रत्यक्ष झालेल्या विषयाचे होणारे ज्ञान म्हणजे 'प्रत्यभिज्ञा'. काही लोकांच्या मते प्रत्यभिज्ञा यथार्थ व अयथार्थ अशा भेदांनी दोन प्रकारची सांगितली जाते. परंतु अधिकतर ती यथार्थच मानल्या गेली आहे. नित्य प्रत्यभिज्ञा व अनित्य प्रत्यभिज्ञा नावाने प्रत्येकीचे दोन भेद आहेत. ईश्वराची प्रत्यभिज्ञा नित्य आहे आणि जीवाची अनित्य.

4) प्रमा –'जीववृत्तिरनित्या सर्वत्र ।प्रमा वक्ष्यते ।'[139] कधीही कुठल्याही साधनाने बाधीत न होणारे ज्ञान म्हणजे 'प्रमा'.

अशाप्रकारे ज्ञानाचे भेद सांगितल्यावर गुलाबराव महाराजांनी ज्ञेय पदार्थांचे विवेचन केलेले आहे. ज्ञेय किंवा प्रमेय पदार्थ पाच प्रकारचा आहे. 1) सत्ता, 2) धर्मी, 3) धर्म, 4) उपाधी आणि 5) अभाव. 'सर्वत्रानुगाऽस्तित्वव्यवहारहेतुः सत्ता ।'[140] सर्वव्याप्त असून देखील 'अस्ति' या व्यवहाराचे जे कारण असते ती 'सत्ता'. ही 'सत्ता' 3 प्रकारची असते 1) पारमार्थिक, 2) व्यावहारिक आणि 3) प्रतिभासिक. यांच्यात जी तिन्ही काळात बाधित होत नाही ती पारमार्थिक. ती सत्ता परब्रम्हाची आहे. ब्रह्मज्ञान झाले नसता जिचा बाध होत नाही ती 'व्यावहारिक सत्ता' आहे, जसे प्रपंचाची सत्ता. ब्रह्मज्ञान झाले नसताना देखील जिचा बाध होतो ती 'प्रतिभासिक सत्ता' आहे. जसे रज्जू, सर्प इ. आश्रयच 'धर्मी' आहेत.

आणि त्याच्यावर आश्रित सर्व धर्म आहेत. जसे द्रव्य आश्रय म्हणून द्रव्य धर्मी आहे आणि त्याच्यावर आश्रित गुण त्याचे धर्म. 'आश्रयो धर्मी। आश्रितो धर्मः।'[141] धर्मीचे चार प्रकार आहेत. 'अविकारी—सहकारि —कारण—कार्यभेदात्।'[142] 1) अविकारी 2) सहकारी 3) कारण 4) कार्य. 1) अविकारी — जो नित्य असून परिणामरहित आहे व विकाररहित आहे. सांख्यांच्या प्ररुषाप्रमाणे, 2) कारण किंवा कार्याहून सतत जवळ राहणारा 'सहकारी' आहे. देश व काळाने 'सहकारी' दोन प्रकारचा आहे. 'ब्रह्मभिन्नः साधारणाश्रयो देशः।'[143] ब्रह्माशिवाय सर्व कार्यांचा साधारण आश्रय म्हणजे 'देश'. यालाच सांख्यदर्शनात आकाशाहून भिन्न मानतात आणि वेदान्तात आकाशरूपी मानतात. आकाशही 'कार्य' आहे. वेदान्त सोडून सर्व दर्शनात नित्य मानले आहे. दिशेचा अंतर्भाव त्यातच होतो आणि कर्माच्या दृष्टीने दिशेचेही अनेक प्रकार होतात. कारण त्याच्या कर्मात नियम दिसून येतात.

'अतीतादिव्यवहारहेतुः कालः।'[144] भूत, भविष्य, वर्तमान या व्यवहाराचे कारण 'काळ' आहे. इंद्रियांनी काळाचे ज्ञान होऊ शकते आणि काळ नित्य आहे असे वेदान्ती मानतात. नैय्यायिक सुद्धा काळास नित्य मानतात. काळ एक असूनसुद्धा त्याचे क्षणादि भेद केवळ उपाधीमुळे झाले आहेत. 3) ज्याच्यापासून कशाची तरी उत्पत्ती होते ते 'कारण'. 'यस्मादुत्पद्यते तत्कारणम्।'[145] कारण हे सुद्धा दोन प्रकारचे आहे, 1) उपादान, 2) निमित्त यांच्यात आपल्यापेक्षाही मोठ्या अवयवीची उत्पत्ती करणारे परमाणू, इ. 'आरंभक' कारण आहेत. आपले पूर्वीचे स्वरूप सोडून दुसऱ्या अवस्थेस प्राप्त करणारे 'परिणामी' कारण आहेत. जसे दूधाचे दही होणे आणि आपल्या स्वरूपाला न सोडता दुसऱ्या अवस्थेला प्राप्त करणारे 'विवर्त' कारण आहेत. जे वेदान्तात 'अधिष्ठान' आहे जसे ब्रह्म. हे उपादानकारण सर्व दर्शनांमध्ये नित्य आहे. निमित्त कारण दोन प्रकारचे आहे 1) कर्ता, 2) करण. या दोहोत ज्याच्यात उपादान कारणाने अपरोक्ष ज्ञान असते, इच्छा असते आणि क्रिया असते, तो कर्ता आहे. विश्वाचा कर्ता ईश्वर आहे. कर्माचा कर्ता जीव आहे. त्यांच्यात ईश्वर नित्य आहे. जीव मुक्तीपर्यंत अनित्य आहे. पूर्वमीमांसेमध्ये परमेश्वर न मानल्यामुळे जीव नित्यकर्ता आहे.



'व्यापारवदसाधारणं कारणं करणम्।'[146] सर्व प्रकारच्या कारणांमध्ये जे असाधारण कारण आहे त्याला 'करण' असे म्हणतात. जसे दण्ड, चक्र इ. घटाचे 'करण' आहेत. विश्वाचे कारण नित्य आहे. बाकी अनित्य आहे नैयायिकांनुसार कारण तीन प्रकारचे आहे, 1) समवायी 2) असमवायी 3) निमित्त. यांच्या भेदाने त्यांच्यात उपादानच समवायी कारण आहे. त्याच्याशी संबंधित असमवायी कारण आहे. जसे दोन परमाणूंचा संयोग द्वयणुकाचे कारण आहे अथवा तंतूचे रूप पटाच्या रूपाचे कारण आहे. हे सर्व प्रकारचे कारण साधारण व असाधारण या नावांनी दोन प्रकारचे आहे. कोणत्याही कार्याचे कारण साधारण कारण होते जसे ईश्वर. आपापल्या कार्याचे जे कारण असते ते असाधारण कारण जसे घटाचा कुलाल, पटाचा तंतुवाय. यांच्यात विश्वाचे कारण नित्य आहे. बाकी सर्व अनित्य आहेत. 4) ज्याची उत्पत्ती होते ते कार्य. 'यदुत्पद्यते तत्कार्यम्।'[147] ते द्विविध आहे. यात प्रथम प्रकृति—विकृती रूप व दुसरे म्हणजे केवळ विकृतिरूप या दोहोंमध्ये ज्याची उत्पत्ती झाली आहे आणि जो दुसऱ्याची उत्पत्ती करतो ते पहिले आणि केवळ ज्याची उत्पत्ती होते आणि जे दुसऱ्याला उत्पन्न करू शकत नाही ते दुसऱ्या प्रकारचे कार्य. जसे घट. यांच्यात जो आपल्यापेक्षा कमी अवयवांनी उत्पन्न होतो ते आरब्ध कार्य. जसे द्वयणुक.

जो आपल्या उपादान कारणासोबत नेहमी असतो आणि बदलत असतो तो 'परिणाम' आणि उपादानकारणाहून भिन्न सत्तेत दिसणारे विवर्त 'कार्य' आहे. हे विवर्त कार्य आहे. 'उपादानविषमसत्ताकोऽन्यथाभावः।'[148] हे विवर्त अध्यस्त आणि अनध्यस्त या भेदांनी दोन प्रकारचे आहे अध्यासाने होणारा अध्यस्त आणि अध्यासाशिवाय होणारा अनध्यस्त विवर्त. रज्जूला सर्प समजणे 'अध्यस्त विवर्त' आहे आणि सोन्याच्या विकाराला कुंडल समजणे 'अनध्यस्त विवर्त' आहे. मधुराद्वैत संप्रदायात श्रीकृष्णाचा अवतार 'अनध्यस्त विवर्त' आहे. त्यांचा अध्यस्त विवर्त अनित्य आहे. अनध्यस्त विवर्त नित्य आहे, याचे स्पष्ट विवरण गुलाबराव महाराजांनी 'श्रीधरोच्छिष्टपुष्टिः' आणि 'नारदीयभक्तिसूत्रभाष्यम्' यासारख्या ग्रंथांमध्ये केले आहे.

यानंतर धर्माचे लक्षण सांगताना महाराज म्हणतात, जो धर्मीवर आधारित आहे अथवा ज्याचा आधार धर्मी आहे तो 'धर्म' आहे. 'धर्म्यधिकरणवान् धर्म्याधेयो धर्म्याश्रितो धर्मः ।'[149] याचे दोन प्रकार आहेत. 1) आरोपित धर्म, 2) स्वगत धर्म व कोण्या वस्तूमध्ये उपाधीने आलेला धर्म आरोपित धर्म आहे आणि हा दोन प्रकारचा आहे, 1) आपेक्षिक व 2) अंगीकृत. अपेक्षेने होणारा आपेक्षिक धर्म. जसे कारकत्व, इ. बहिर्धर्मापेक्षा आंतरधर्म आणि आंतरधर्मापेक्षा वेगळा बहिर्धर्म समजायला हवा. अशाप्रकारे परत्व आणि अपरत्वादींचा अन्वय करायला हवा. काही काळापर्यंत स्वीकृत बौद्धिक धर्म अंगीकृत धर्म असतो. जसे सपक्षत्व, साध्यत्व, हेतुत्व इ. भेदांनी अनेक प्रकारचा असतो. सर्व आरोपित धर्म अनित्यच असतात. तो स्वगत धर्म जो कोणत्याही वस्तूमध्ये राहतो. परंतु उपाधिहून संपादित केलेला नसतो. याचे अनेक प्रकार शक्य असूनही लाघवामुळे 18 भेद सांगितले जात आहेत.

1), जाति, 2) व्यक्ती, 3) आकृती, 4) शक्ती, 5) लक्षण, 6) उपलक्षण, 7) विशेष, 8) गुण, 9) क्रिया, 10) प्रकार, 11) विकार, 12) अधिकार, 13) स्वत्व, 14) स्वामित्व, 15) संबंध, 16) संख्या, 17) अवस्था, 18) अपेक्षा

1) जाति – 'एकत्वे सत्यनेकानुगत्वं जातिः ।'[150] एक असून जी अनेकात राहते ती जाति. तिचे दोन प्रकार आहेत. घटत्वादि व्याप्त जाति, द्रव्यत्वादि व्यापक जाति. वेदान्ती सोडून सगळ्यांच्या मतानुसार ही नित्य आहे.

2) व्यक्ती – 'जातिमत्त्वे सति जातिपरिच्छिन्ना व्यक्तिः ।'[151] जिच्यात जाति राहते आणि जातिपासून परिच्छिन्न आहे ती व्यक्ती किंवा जातीचा आश्रय. ती अनेक प्रकारची आहे. नित्य पदार्थात ती नित्य असते तर अनित्य पदार्थात ती अनित्य असते.

3) आकृती – 'जातिलिंगाविशेषज्ञापका आकृतिः ।'[152] जाति, लिङ्ग, इ. विशेषांना ज्ञापित करणारी ती आकृती किंवा अवयवांची रचना म्हणजे आकृती. ही अनित्य आहे.



4) शक्ती – जी आपल्या कार्याहून भिन्न असते, कारणात राहते आणि कार्य उत्पादन करण्याचे सामर्थ्य म्हणजे शक्ती. कार्याने हिचे अनुमान केल्या जाते. 'कार्यभिन्नत्वे सति कार्यानुमेयं कारणाधिकरणवत् कार्यजननसामर्थ्यं शक्तिः ।'[153] वेदान्ती हिला माया म्हणतात. सांख्य 'प्रकृती' म्हणतात ही नित्य आहे.

5) लक्षण – जे एका पदार्थाला इतर पदार्थांपासून वेगळे करते किंवा लक्ष्यात राहणाऱ्या धर्मात राहते ते लक्षण. 'व्यावर्तकधर्मविशेषो लक्ष्यतावच्छेदकसमनियतत्वं वा लक्षणम् ।'[154] हे अव्याप्ती इ. दोषांनी रहित असल्याने दोन प्रकारचे असते. 1)स्वरूप लक्षण आणि 2) तटस्थ लक्षण. जे नित्य असून पदार्थाला वेगळे करते ते स्वरूप लक्षण. तर कधी कधी असणारे पदार्थाला वेगळे करणारे ते तटस्थ लक्षण. जसे छत्रवान् राजा.

6) उपलक्षण – याव्यतिरिक्त अजहल्लक्षणेने पदार्थाचे ज्ञान करून देणारे व कार्यात न राहणारे ते उपलक्षण. 'अजहल्लक्षणया ग्राहकं वा कार्येऽसंबद्धं व्यावर्तकमुपलक्षणम् ।'[155]

7) विशेषण – 'स्वरूपे प्रविष्टं वर्तमानव्यावर्तकं विशेषणम् ।'[156] स्वरूपात राहून वर्तमान काळात व्यावर्तक असते ते विशेषण. हे नित्यात नित्य तर अनित्यात अनित्य असते.

8) गुण – 'धर्म्यधिकरणकस्वगतधर्मव्याप्यगुणत्वजातिमत्त्वे सति गुणानधिकरणवान् गुणः ।'[157] धर्मीत राहून स्वगत धर्माहून व्याप्ती राखून गुणत्व जातीचा आश्रय, गुणांचा अनाश्रय म्हणजे गुण. गुण दहा प्रकारचे असते.

1) रूप – 'चक्षुर्मात्रग्राह्यो गुणो रूपम् ।' केवळ चक्षुरिन्द्रियाने ग्राह्य गुण म्हणजे रूप. हा शुक्ल, नील, पीत, रक्त, हरित, कपिश व चित्र अशा

भेदांनी सात प्रकारचा असतो. सांख्य हे द्रव्य मानतात. वेदान्तात व न्यायशास्त्रात हा गुण आहे.

2) रस –'रसनाग्राह्यो गुणो रसः ।' रसनेन्द्रियाने ग्राह्य 'रस' आहे. हा मधुर्रा, कटुलवण, आम्लतिक्त व कषाय असा सहा प्रकारचा आहे. सांख्यामध्ये हे द्रव्य तर न्यायशास्त्रात गुण आहे.

3) गंध – ज्ञानेन्द्रियग्राह्य 'गंध' आहे. गंध द्विविध आहे. 1) सुरभी व असुरभी. नित्यात नित्य, अनित्य मतात अनित्य. सांख्य व वेदान्तात अनित्य आहे. सांख्य व वेदान्तात अनित्य न्यायशास्त्रांत नित्यात नित्य, अनित्यात अनित्य असतो.

4) स्पर्श – त्वगिन्द्रियाने ज्याचे 'ज्ञान' होते तो तीन प्रकारचा. 1) शीत 2) उष्ण 3) अनुष्णाशीत

5) परिमाण –'मानव्यवहारासाधारणकारणं परिमाणम् ।'[158] मापन करण्याचे असाधारण कारण. हा सर्वधर्मीत राहतो. हा तीन प्रकारचा असतो 1) अणू 2) विभू, 3) मध्यम.

6) गुरुत्व – कोणत्याही पदार्थाचे खाली पडण्याचे असाधारण कारण. ज्याने आकर्षण होते. आकर्षणसुद्धा आपेक्षिक धर्म आहे. लघुतवाची भिन्न गणना होत नाही.

7) द्रवत्व – कोणत्याही पदार्थाच्या पहिल्या स्पंदनाचे असाधारण कारण द्रवत्व आहे. ज्यामुळे आर्द्रता असते. हे दोन प्रकारचे 1) स्वाभाविक, 2) नैमित्तिक

8) स्नेह –'पदार्थावयवानां संबंधसंरक्षको गुणः स्नेहः ।'[159] पदार्थांच्या अवयवांच्या संबंधांना सुरक्षित ठेवणारा गुण म्हणजे स्नेह. हा दोन प्रकारचा असतो 1) बुद्धीने होणारा 2) पाण्याने होणारा.



9) अदृष्ट – जन्म, आयुष्य व भोगाचे असाधारण कारण म्हणजे 'अदृष्ट'. हा तीन प्रकारचा असतो 1) पुण्य, 2) पाप, 3) शुक्ल.

1) पुण्यकर्म – शास्त्रोक्त क्रियांनी जे उत्पन्न होते आणि जे अनुकूल जन्म, आयुष्य व भोग देते ते पुण्यकर्म.

2) पापकर्म – आपल्या इच्छेने आचरण करण्याने उत्पन्न होणारे आणि प्रतिकूल जन्म, इ. देणारे कर्म म्हणजे पापकर्म.

3) शुक्ल कर्म – ज्याने मोक्ष प्राप्त होतो, त्या ज्ञानाला उत्पन्न करणारे आणि शम, दम, उपासना, इ. ने उत्पन्न होणारे कर्म म्हणजे शुक्ल कर्म. सांख्य व वेदान्तात अदृष्ट अंतःकरणात राहते. जन्म = नवीन शरीराचे ग्रहण, आयुष्य = शरीर व आत्म्याचा संयोग, भोग = सुख/दुःखाचा अनुभव.

10) शब्द – श्रोत्रेन्द्रियाने ज्याचे ज्ञान होते तो गुण 'शब्द' आहे. तो दोन प्रकारचा असतो. 1) ध्वनिरूप व 2) वर्णरूप.

दोरीप्रमाणे जो पुरुषाच्या बंधनाचे कारण आहे. तो सांख्यानुसार गुण आहे. तो सत्व, रजस् व तमस्. तो धर्मी असल्याने येथे सांगितलेला नाही. या प्रबंधात धर्मासोबत व्याप्ती ठेवणारे गुण सांगितले आहेत.

9) क्रिया – क्रिया स्पंदन स्वरूपाची असते. क्रिया ही अनेक प्रकारची असून देखील लाघवाच्या दृष्टीने 10 प्रकारची सांगितली जाते.

1) चलन, 2) प्रसरण, 3) आकुंचन, 4) उत्क्षेपण, 5) अवक्षेपण, 6) योजन, 7) विभजन, 8) ग्रहण, 9) त्याग व 10) यत्न.

येथे 18 प्रकारच्या धर्मांमध्ये नववा धर्म जी क्रिया आहे तिच्या 10 प्रकारांचे विवेचन करण्याचा महाराजांचा मानस होता. परंतु यानंतर हा लघुनिबंध अपूर्ण स्वरूपात आढळतो.यानंतरच्या प्रकारादि 9 धर्मांचे स्वरूप ग्रंथाच्या दृष्टीने अपेक्षित

होते.

या ग्रंथाच्या स्वरूपावरून हे स्पष्ट होते की, अनेक दर्शनांचे मौलिक पदार्थ विभाजन डोळ्यापुढे ठेवून तर्कसंग्रहाच्या शैलीत हा ग्रंथ लिहिलेला आहे. अनेक पदार्थांची लक्षणे आणि भेद तर्कसंग्रहानुसारच असून अनेक वैलक्षण्ये या लघुग्रंथात दिसून येतात. ती खालीलप्रमाणे सांगता येतील.

1) सांख्य, योग, न्याय, वैशेषिक आणि वेदान्त दर्शनांच्या पदार्थांचा एकत्रा समावेश दिसतो.

2) यथार्थ ज्ञानाचे संस्कार, स्मृती , प्रत्यभिज्ञा व प्रमा असे चार प्रकार सांगितले आहेत.

3) सत्ता, धर्मी, धर्म, उपाधी व अभाव असे पाच प्रकारचे ज्ञेय किवा प्रमेय पदार्थ सांगितले आहेत.

4) धर्म व धर्मींचा विचार स्पष्ट केला आहे.

5) स्नेह, अदृष्ट, पुण्य, पाप, शुक्ल कर्म, क्रिया यांचे लक्षण सांगितले आहे.

6) वैशेषिक 24 गुण मानतात. गुलाबराव महाराजांनी 10 गुण मानले आहेत. वैशेषिक 4 प्रकारचे परिमाण मानतात. गुलाबराव महाराज 3 प्रकारचे परिमाण मानतात.

7) वैशेषिक दर्शनामध्ये स्नेहाचे प्रकार सांगितलेले नाहीत. गुलाबराव महाराजांनी त्याचे दोन प्रकार सांगितले आहेत.

8) वैशेषिक दर्शनात क्रिया / कर्म 5 प्रकारचे आहेत. गुलाबराव महाराजांनी 10 प्रकारचे सांगितले आहेत.

सर्व शास्त्रात प्रवेश होण्यासाठी युक्तिपूर्वक विचार करण्याची आवश्यकता आहे. ती पूर्ण करण्यासाठी या ग्रंथाचा आरंभ महाराजांनी केला होता.



या ग्रंथात छोटी छोटी वाक्ये असून थोडक्यात व सोप्या रीतीने विषयाची मांडणी केली आहे. नेमकेपणा, सुटसुटीतपणा आणि मुद्देसूदपणा ही या ग्रंथाची वैशिष्ट्ये आहेत. भाष्याप्रमाणेच खंडन–मंडन व स्वविषयाची मांडणी दिसून येते. परंतु ग्रंथारंभाचा लेखवजा उपोद्घात झाला आणि लेखन थांबले. हा ग्रंथ अपूर्ण स्वरूपात उपलब्ध आहे.

या ग्रंथात महाराजांनी जो तत्त्वविचार मांडला आहे, तो तक्त्याच्या स्वरूपात परिशिष्ट 3 मध्ये आपणास बघता येईल.

9. कान्तकान्तावाक्यपुष्पम्

26 श्लोकांच्या या लघुप्रकरणग्रंथात गद्यपद्यमय भाषेत गुलाबराव महाराजांनी वेदान्ताचे काही विचार मांडले आहेत. मंगलाचरणात ज्ञानेश्वर महाराजांना नमन करून त्यांच्याच प्रेरणेने या लघुग्रंथाचा आरंभ केला आहे, असा उल्लेख केला आहे. प्रारंभी जेव्हा विषयांप्रती इच्छा नष्ट होते तेव्हा आत्मज्ञानानेच अविद्या दूर झाल्याने ब्रह्माच्या सत् व चित् या दोन्ही अंशांचे ज्ञान होऊ शकते. तरीसुद्धा श्रुती, स्मृती, पुराणादींच्यानुसार भगवन्ताप्रती भक्तीच आनंदाने युक्त असल्याने सर्वश्रेष्ठ आहे. महेश्वराने भूमी, बीज, अंकुर, तरु आणि फळाच्या रूपात अनुक्रमे निरुपाधिचैतन्य, उपहितचैतन्य, सूत्र, विराट आणि विष्णू आविर्भूत होतात. त्यांच्यात ब्रह्मच आपल्या भक्तांच्या अनुग्रहाकरिता विष्णूच्या रूपात प्रगट होते. त्याचे प्रकट होणे भक्तांना नित्यसुख देण्याकरिता संकल्प मात्रच आहे. या संदर्भात महाराजांनी शंकराचार्यांचे काही श्लोक उद्धृत केले आहेत.

1) ईश्वर

2) माया

3) महत् (जीव)

4) संबंध

5) भेद. यांच्यात ईश्वर आदि अंतरहित आहे. त्यालाच वेदान्तात 'ब्रह्म' म्हणतात. माया, अज्ञानप्रधान, इ. शब्दांनी ओळखली जाते. — ईश्वरच माझे सोबत राहून जगताचे कारण होता. हिरण्यगर्भ, अपरेश्वर, शबलब्रह्म इ. त्या ईश्वराचे पर्यायी शब्द आहेत.

म्हणून श्वेताश्वतर उपनिषदात वर्णिले आहे. — प्रकृतीला माया समजा आणि ईश्वराला त्या मायेला चालविणारा मायावी समजा. कारण त्या ईश्वराच्या अवयवांनी सर्व जग व्याप्त आहे. स्मृतीतसुद्धा म्हटले आहे की, हे महान् ब्रह्म



माझी योनी आहे आणि मी त्याच्याच या विश्वरूपाचे गर्भधारण करतो. त्यातूनच सर्व प्राण्यांची सृष्टी होते, ईश्वर, माया, जीव या तीन शब्दांचे लक्षण 'भक्तिपदतीर्थामृत' नावाच्या ग्रंथातून जाणायला हवे. अनादि 'ाट्पदार्थ ब्रह्मसूत्रशांकरभाष्यात सांगितले आहेत. ग्रंथविस्ताराच्या भयाने त्यांना येथे सांगत नाही. विद्या ही दोन प्रकारची आहे.

1) परा—जी उपनिषद्, पुराण, इतिहासामध्ये सांगितली आहे.

2) अपरा — जी वेदवेदांगांमध्ये सांगितलेली आहे.

यानंतर शिष्य उवाच असे म्हणून तीन श्लोक दिले आहेत.

1) श्रुतीनुसार जो सर्वभेदरहित, निष्फळ ब्रह्म आहे. त्याच्यातच 'अतद्व्यावृत्ती' अर्थात् ब्रह्मभिन्न सर्वांचा निषेध केल्याने एकमात्र ज्ञान होते. त्या शुद्ध चैतन्यात अनादिजडरूप मायेचा प्रकाश कसा होईल? ती माया ब्रह्माहून भिन्न आहे. अभिन्न सुद्धा आहे. जर म्हटले की, त्या मायेने कोण बंधनात जातो आणि कुणाला बंधन राहत नाही? त्याच्या समाधानार्थ उत्तरात गुलाबराव महाराजांनी 'गुरुरुवाच' अशा शब्दांनी सुरवात करुन 16 श्लोक लिहिले आहेत.

साधन दशेत आणि सिद्ध दशेत जे गुरु आणि शास्त्राचे प्रयोजन आहे तेच तुमचे सर्व प्रकारचे भ्रम दूर करण्याकरिता सांगितले जात आहेत. प्रकृती व पुरुष हे अनादि आहेत. गुण प्रकृतीचे विकार आहेत. ज्याला जाणून मोक्ष प्राप्त होतो तो अनादि, परब्रह्म आहे. जे सत् नाही. असत् नाही.

'ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वामृतमश्नुते ।
अनादिमत्परं ब्रह्म न सत्तान्नासदुच्यते ।।'[160]

माया ब्रह्मरूप असल्याने ब्रह्माशिवाय कुठेही राहत नाही. जर भ्रमाला आदिसहित मानले तर मुक्त झालेल्यांनादेखील बंधन राहील. मायेला अनादि मानावे लागेल. जर भ्रम आदिसहित आहे तर साधनाची आवश्यकताच राहणार

नाही. म्हणून मायेला अनादि मानायला हवे. गुरुवाक्याने ज्याच्यात वैराग्य उत्पन्न होते तोही तत्त्वाचे दर्शन करू शकतो. जो ज्ञानाने मूढ आहे तो ब्रह्मात किंवा ब्रह्मज्ञानात आलस्याने तुला पाहत नाही. ज्याला केवळ 'अहं ब्रह्मास्मि' अभिमान आहे शरीरात 'ममकार' आहे, तो योगी नाही, भोगीही नाही, केवळ दुःखी आहे. हा अनादि काळापासून प्रवर्तित भ्रम शास्त्राच्या अध्ययनाशिवाय दूर होत नाही. तसाच गुरुवाक्याशिवाय भ्रम दूर होत नाही. जेवढी भक्ती ईश्वराच्या प्रती आहे तेवढीच जर गुरूच्या प्रती राहिली तर त्याला शास्त्रात सांगितलेले विषय स्वयं स्पष्ट होतात.

चक्रवाक पक्षी पाण्यासाठी तडफडतो तरी मृगजळ त्याच्यासाठी काय कामाचे? त्याचप्रमाणे जो परमेश्वराचा भक्त आहे त्याला अविद्या काय करेल? जसे मृगजळ राहिले तरीही चक्रवाकपक्षी त्याची उपेक्षा करतो, तसाच परमेश्वरभक्तसुद्धा मायेच्या सत्त्वाची उपेक्षा करतो. 'अज्ञानिभिः संप्रदृष्टा भक्तोऽविद्यां न पश्यति ।'[161] तो स्वतःच शक्तिरूप होऊन जातो. चक्रवाक पक्षाने पाहिले नाही तरी मृग अर्थात् हरिण मृगजळाला पाहतात तसाच भक्त मायेला पाहात नाही, अज्ञानीच पाहतो. अशाप्रकारे वेदान्ताचे काही विचार संक्षेपात मांडल्यानंतर ज्ञानेश्वराच्या कृपेने सांगितलेले हे तत्त्वज्ञान जो पहाटे वाचेल त्याला अत्यंत सुख मिळून परम पदाची प्राप्ती होईल असे निरूपित केले आहे.

या संस्कृत गद्यपद्यान्वित प्रकरण ग्रंथात शिवशक्तीचे स्वरूप थोडक्यात पण स्पष्ट रूपाने विशद केले आहे. जोपर्यंत अज्ञान आहे तोपर्यंत ब्रह्म व माया विसंवादी म्हणजे परस्पर विरोधी आहेत असे जीवाला वाटत असते, पण ज्ञानी होऊन तो भक्त झाला की अज्ञानरूपाने भासणारी मायाच शक्तिरूप होऊन जाते. म्हणजेच कांतकांतेचा विरोध नाहीसा होऊन त्यांचा संवाद होतो.अशाप्रकारे ''कांतकांतावाक्यपुष्पम्'' म्हणजे कांत श्रीकृष्ण व कांता शक्ती यांचा अर्थ सांगणारे हे वाक्यरूप पुष्प होय.

या वेदान्त प्रक्रियेचा अधिकारी तपाने पापनिर्मुक्त झालेला परमवैराग्यसंपन्न असा साधक आहे. त्याला आत्मज्ञानाने सच्चिदंशाचे ज्ञान होते



पण आनंदप्राप्तीसाठी त्याने भक्तीच केली पाहिजे. ही भक्ती कोणाची तर फलोपम अवतार श्रीकृष्णाची. नीलकंठाचार्यांनी ब्रह्मवृक्षाचे रूपक खालीलप्रमाणे वर्णन केले आहे.

1. भूरूप – शुद्धब्रह्म 2. बीजरूप – मायोपहित शबल ब्रह्म 3. अंकुर – ब्रह्मदेव 4. तरू – विराट 5. फल – शिवविष्णू किंवा श्रीकृष्ण. अशा फलोपम श्रीकृष्णाची भक्तीच आनंददायिनी असते. यात वृक्षाचे मूळ आणि फल दोनही शुद्ध परमब्रह्मरूप आहेत.

नंतर अनादि सहा पदार्थ कोणते ते सांगून पराविद्या व अपराविद्या यांचे वर्णन केले आहे. पण मायेची बाधा भक्ताला होत नाही. याला दृष्टांत दिला आहे की – चक्रवाकाला ज्याप्रमाणे मृगजल दिसत नाही तशी भक्ताला देखील माया मुळीच अनुभवाला येत नाही.'अज्ञानिभिः संप्रवृष्टा भक्तोऽविद्यां न पश्यति ।'[162] तो स्वतःच शक्तिरूप होऊन जातो.

या लघु प्रकरणग्रंथाद्वारे महाराजांनी ब्रह्मविद्येचे स्वरूप तर मांडलेच सोबत त्याच्या सगुणरूपातील करुणानिधीचेही वर्णन केले आहे. गुरुवाक्य आणि शास्त्रवचन हेच साधकाला या भवचक्रातून मुक्त करू शकते असा दृढ विश्वास या ग्रंथातून महाराजांनी मांडला आहे. सगुणाची भक्ती करणाऱ्या भक्ताकडून ही अविद्या सहजच उपेक्षिली जाते, तिच्या निराकरणासाठी त्याला अन्य प्रयत्न करावे लागत नाहीत, असा संदेश महाराजांनी या ग्रंथाद्वारे दिला आहे.

10. षड्दर्शनलेशसंग्रहः

हा ग्रंथ अत्यंत अल्पस्वरूपाचा आहे. त्यात प्रमाण व प्रमेयांच्या स्वरूपासोबतच सर्व आस्तिक दर्शनांचे सार देण्याचा गुलाबराव महाराजांचा संकल्प दिसून येतो. हा ग्रंथ अपूर्ण स्वरूपात उपलब्ध आहे. या ग्रंथारंभी गुलाबराव महाराजांनी ज्ञानेश्वर माऊलींना वंदन करून म्हटले आहे की, आपल्या बुद्धिशुद्धीकरिता लघुग्रंथाची रचना केलेली आहे.

'ज्ञानदेवं गुरुं नत्वा जननीं बोधवृद्धये ।
षण्णामपि दर्शनानां कुर्वेऽहं लेशसंग्रहम् ।।'[163]

या जगातील सर्वात श्रेष्ठ असलेल्या मनुष्य जन्मात असा विचार प्रवर्तित होतो की–

'कोऽहं कथमिदं जातं को वा कर्तास्य विद्यते ।
उपादानं किमस्तीह विचारः सोऽयमीदृशः ।।'[164]

षड्दर्शने जीवाच्या जिज्ञासेला शांत करण्याकरिता प्रवर्तित आहेत. ती जिज्ञासा प्राधान्याने या प्रकारची आहे –

प्रमाणनिर्णय –

1. हा जीव कोण?

2. ही सृष्टी कुठून आली?

3. या सृष्टीचा कर्ता कोण?

4. जीवाला संसार कसा होतो?

5. या संसारातून मोक्ष कसा मिळेल?

6. जीव आणि ईश्वर कोण आहे?

7. बंध व मोक्ष काय आहे?



या प्रश्नांचे समाधान करण्यासाठी दर्शने प्रवर्तितझाली आहेत. ती खालीलप्रमाणे–

| दर्शनाचे नांव | कर्ता |
|---|---|
| 1. न्यायदर्शन | गौतम महर्षी |
| 2. वैशेषिकदर्शन | कणाद महर्षी |
| 3. सांख्यदर्शन | कपिल महर्षी |
| 4. योगदर्शन | पतञ्जली महर्षी |
| 5. पूर्वमीमांसादर्शन | जैमिनी महर्षी |
| 6. उत्तरमीमांसादर्शन | बादरायण महर्षी |

या दर्शनांमध्ये प्राधान्याने प्रमाण, प्रमेय, परिग्रह या पदार्थांची चर्चा आलेली आहे.

1. प्रमाण – ज्ञानाचे साधन

2. प्रमेय – ज्ञानाचा विषय

3. परिग्रह – विशेषाचा निश्चय

प्रमाण – प्रत्यक्ष, अनुमान, शब्द, इ. प्रमाण आहेत.

प्रमेय – जगत्, जगत् कारण, ईश्वर, जीव, बंध, हेतू, बंधन आणि मोक्ष हे प्रमेय.

प्रमाण – नैयायिकांनुसार 4 प्रमाणे आहेत.

1. प्रत्यक्ष – 'इंद्रियविषयसामीप्यजन्यं ज्ञानं प्रत्यक्षम् ।'[165] इन्द्रिय आणि पदार्थाच्या संयोगाने होणारे ज्ञान.

2. अनुमान –'प्रत्यक्षपूर्वकम् अनुमानम् ।'[166] प्रत्यक्षाच्या आधाराने हेतु ज्ञानाने होणारे ज्ञान त्याचे 3 प्रकार आहेत.

(i) कारणलिङ्गक – कारणाहून कार्याचे अनुमान

उदाहरण – मेघयुक्त आकाश बघून वृष्टी होईल असे अनुमान.

(ii) कार्यलिङ्गक – कार्याहून कारणाचे अनुमान

उदाहरण – पूर बघून नदीच्या जवळ वृष्टी झाली असेल असे अनुमान.

(iii) सामान्यदृष्ट – सामान्यपणे दिसणारे अनुमान

उदाहरण – शांता तुझ्या घरातून येथे आली म्हणून ती गतिमती आहे. कारण गतिशिवाय जाणे शक्य नाही.

3. उपमान – लक्षण 'सादृश्यज्ञानम् उपमानम् ।'[167]– सादृश्य ज्ञान

4. शब्द – शब्द म्हणजे आप्तोपदेश. 'आप्तोपदेशः शब्दः ।'[168] आप्त म्हणजे जो हित करीत यथार्थ सांगतो तो किंवा केवळ हितचिंतकही आप्त आहे. तो दोन प्रकारचा – ईश्वर आणि जीव. ईश्वराचे शब्द 'वेद' आहेत. जीवाचे शब्द 'स्मृती', इ. आहेत.

वेद स्वतः प्रमाण आहेत. जीवाचे शब्द वेदावर आधारित असतील तर प्रमाण आहेत.

अन्य दर्शनानुसार प्रमाणे खालीलप्रमाणे –

| दर्शनाचे नांव | प्रमाण |
|---|---|
| 1. वैशेषिकदर्शन | प्रत्यक्ष व अनुमान |
| 2. सांख्य व योगदर्शन | प्रत्यक्ष, अनुमान व शब्द |
| 3. पूर्वमीमांसादर्शन | प्रत्यक्ष, अनुमान, उपमान, शब्द, अर्थापत्ती (प्राभाकर) प्रत्यक्ष, अनुमान, उपमान, शब्द, अर्थापत्ती, अनुपलब्धी (भाट्ट) |
| 4. उत्तरमीमांसादर्शन | प्रत्यक्ष, अनुमान, उपमान, शब्द, अर्थापत्ती, अनुपलब्धी (अद्वैतवेदान्त) |



या सर्व प्रमाणांचे स्वरूप शास्त्रग्रंथानुसार आहे.

अर्थापत्ती –'संपाद्यसंपादककल्पनम् अर्थापत्तिः ।'[169] जसे देवदत्त दिवसा जेवत नाही. लठ्ठ दिसतो. यामुळे रात्री अवश्य जेवत असला पाहिजे ही 'अर्थापत्ती'. ती द्विविध आहे. 1) दृष्टार्थापत्ति 2) श्रुतार्थापत्ति.

अनुपलब्धी – 'अभावज्ञानम् अनुपलब्धिः ।'[170] अभावाचे ज्ञान होणे म्हणजे 'अनुपलब्धि'.

जसे – 'यथा भूतले घटो नास्ति । नास्त्यत्र नव माता ।'

प्रमेयनिर्णय – गुलाबराव महाराजांनी प्रमेय निर्णयारंभी नैयायिकांच्या अनुसार 'जगत्' चे लक्षण घेतलेले आहे. ते असे –

पृथिवी, आप, तेज, वायु अशा महाभूतांच्या परमाणूंनी जे बनले आहे आणि घटपटादि आकृती धारण करणारे 'जगत्' आहे. याच्या सृष्टीचा क्रम असा – ईश्वराच्या अदृष्टाने अणूंमध्ये संयोग होतो. त्याने द्व्यणुक तयार होते. अशा तीन द्व्यणुकांनी त्र्यणुक तयार होते. चार त्र्यणुकांनी चतुरणकाची उत्पत्ती होते.

अशाप्रकारे महाभूतांची उत्पत्ती होते. हेच परमाणू विभागक्रमाने प्रलयाचे कारण आहेत. हे न्याय व वैशेषिक दर्शनानुसार आहे.

सांख्यदर्शनात हे जगत् प्रकृतीचा परिणाम आहे. यात 23 तत्त्वे परिणाम आहेत.

1. पञ्चतन्मात्र 2. पञ्चमहाभूते 3. एकादशइन्द्रिये 4. बुद्धी व 5. अहंकार. यांमध्ये 'निश्चयात्मिका बुद्धी' आणि 'अहमस्मि' अशाप्रकारचे जागृत व स्वप्नावस्थेत होणारे ज्ञान 'अहंकार' आहे. शब्द, इ तन्मात्र आहेत. त्यात शब्द ध्वन्यात्मक व वर्णात्मक आहेत. त्वगिन्द्रियग्राह्यगुणस्पर्श 3 प्रकारचा – 1. शीत 2. उष्ण व 3. अनुष्णाशीत.

शरीराच्या संकोचाचे कारण शीतस्पर्श आहे. अवयव प्रसाराचे कारण उष्णस्पर्श आहे. या दोहोंहून जो भिन्न तो अनुष्णाशीत.

या ग्रंथात गुलाबराव महाराजांनी सर्व दर्शनांचे सारभूत पदार्थस्वरूप सांगण्याच्या दृष्टीने या लघुप्रबंधाचा आरंभ केला आहे असे दिसते. या प्रबंधाचे स्वरूप गुलाबराव महाराजकृत 'युक्तितत्त्वानुशासन' या ग्रंथासारखे दिसते. अपूर्ण स्वरूपात असलेल्या या ग्रंथात 'प्रमाणविचार' सांगून झाल्यानंतर प्रमेयासंबंधी विवेचनाला सुरूवात केलेली होती. परंतु प्रमेयासंबंधीचे थोडेसेच विवेचन झाल्यानंतर हा ग्रंथ अपूर्ण राहिलेला आहे.



## 11. तत्त्वबोधः

'तत्त्वबोध' हा एक लहानसा प्रकरण ग्रंथ संस्कृत गद्यात असून सोपा आहे. यात वेदान्तातील बऱ्याच पारिभाषिक शब्दांच्या व्याख्या थोडक्यात व सुटसुटीतपणे आलेल्या आहेत. या ग्रंथात 4 प्रकरणे आहेत. 1. सत्तात्रयवादः 2. सत्ताद्वयवादः 3. अनेकजीववादे प्रपंचस्वरूपम् 4. अपवादः या प्रकरणांमध्ये वेदान्ताच्या दृष्टीने काही प्रमुख सिद्धान्तांचे समालोकन केले आहे.

सत्तात्रयवाद – विश्वात दोन पदार्थ आहेत. 1. चैतन्यस्वरूपी आत्मा 2. जडस्वरूपी अनात्मा. 'आत्मा चेतनः ।अनात्मा जडः ।'[171] चैतन्य तत्त्व हे ज्ञानमय आहे. एक व असंग आहे. दुसरे अचेतन तत्त्व हे जड, अज्ञानरूपी, अनेक प्रकारचे आहे. अज्ञान, माया, अविद्या, प्रकृती, अव्यक्त, प्रधान, शक्ती हे सर्व त्याचे पर्यायी शब्द आहेत. तसेच ब्रह्म, चैतन्य, चित्, सत्, सामान्य हे सर्व चैतन्यरूप आत्म्याचे पर्यायी शब्द आहेत. काही दार्शनिक अनेक प्रकारच्या चैतन्याला 'जीव' म्हणतात. एकच चैतन्य अज्ञानाच्या संबंधाने जीव असते.

काही लोक 'अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यन्ति जन्तवः ।'[172] या गीतावाक्यात 'जन्तवः' या बहुवचनाने जीव अनेक आहेत असे मानतात. काही लोक 'ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः ।'[173] या गीतावाक्यातील एकवचनामुळे एकच जीव आहे असे मानतात.

काही आचार्य जीव, ईश्वर व ब्रह्म या तीन पदार्थांना मानतात. शुद्ध सत्त्वाने युक्त ज्ञान जेथे आहे ते तत्त्व 'ईश्वर' व रजस्, तमोयुक्त अज्ञानाने युक्त असलेला 'जीव' होय. ब्रह्म नित्य, मुक्त आहे, हे ब्रह्म म्हणजे जगाची सुषुप्तावस्था आहे. व्यक्तीस 'व्यष्टी' म्हणतात. समुदायाला 'समष्टी' म्हणतात. व्यष्टिसुषुप्ती म्हणजे 'निद्रा' होय आणि समष्टिसुषुप्ती म्हणजे 'प्रलय' होय. जी एका वस्तूत भेद दाखविते ती 'उपाधी'. सुषुप्ती ज्याची उपाधी आहे ते चैतन्य 'जीव' आहे. जर प्रलय ही उपाधी असेल तर ते चैतन्य 'ईश्वर' होय. हेच 'कारणशरीर' होय. याचे

चैतन्य 'प्राज्ञ' म्हणविले जाते. प्रकृती ही कोणाचाच विकार नाही. ती निरवयव आहे. तिच्या विकारांमध्ये अवयव दिसून येतात. प्रकृतीचा पहिला विकार अन्तःकरण अर्थात् बुद्धी, मन, अहंकार व चित्त असे ते चार प्रकारचे आहे. त्याच्या समष्टी अभिमानाने 'हिरण्यगर्भ' होतो आणि व्यष्टिचैतन्याला 'तैजस्' म्हणतात. या हिरण्यगर्भाच्या सत्त्वाने देवता, रजोगुणाने इन्द्रिय उत्पन्न होतात. मन, ज्ञानेन्द्रिये व कर्मेन्द्रियेसुद्धा उत्पन्न होतात. तमोगुणाने पंचभूत उत्पन्न होतात. पहिले आकाश त्यापासून वायू, वायूपासून तेज, तेजापासून जल व जलापासून पृथिवी उत्पन्न होते व हे पुढे पञ्चतन्मात्रांना उत्पन्न करतात.

1. आकाश –– शब्दाला

2. वायू – शब्द व स्पर्शाला

3. तेजस् – शब्द, स्पर्श, रूपाला

4. आप – शब्द, स्पर्श, रूप, रसाला

5. पृथ्वी – शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंधाला उत्पन्न करतात.

हे सर्व 'लिंगशरीर' होय. याचे अभिमानी चैतन्य 'तैजस' आहे. सत्शब्दवाच्य आणि मायासहित ब्रह्मच 'प्राज्ञ' म्हणविले जाते. अव्यक्तापासून 'बुद्धी' संज्ञक महत् उत्पन्न होते. तिच्यापासून अहंकार उत्पन्न होतो. सात्त्विक अहंकाराद्वारे देवता, रजो अहंकाराने इन्द्रिय, तामस अहंकाराने पंचतन्मात्र उत्पन्न होतात. हे सर्व प्राचीन आचार्यांनी सांगितले आहे.

पञ्चीकरण –

प्रत्येक भूताचे दोन भाग करून दुसऱ्या भागाचे पुन्हा चार भाग करावे. असे प्रत्येक भूताचे आपले तन्मात्र अर्धभागात आणि बाकी चार भूतांचे धर्म 1/4 भागात राहते. असे 'पञ्चीकरण' होते. अशाप्रकारे पञ्चीकरण होऊन 'स्थूलशरीर' बनतात. हे पाच प्रकारचे आहे.



1. स्वेदज शरीर – उदा. कीडा, इ.

2. उद्भिज्ज शरीर – उदा. वृक्ष, इ.

3. अंडज शरीर – उदा. पक्षी, इ.

4. जरायुज शरीर – उदा. मनुष्य, इ.

5. मनोज शरीर – उदा. मानसपुत्र, इ. हे सर्व 'स्थूलशरीर' होय. याच्या समष्टी अभिमानी चैतन्याला 'वैश्वानर' म्हणतात तर व्यष्टी चैतन्य 'विश्व' होय. ईश्वर, हिरण्यगर्भ, विराट् हे तीन समान आहेत. प्राज्ञ, तैजस् व विश्व हे तीन समान आहेत. तत्त्वज्ञान होईपर्यंत ईश्वरापासून सारे विश्व आरोपित आहे ते तत्त्वज्ञानाने बाधित होते यांनाच क्रमाने 'अध्यारोप' आणि 'अपवाद' असे म्हणतात. आरोप म्हणजे भ्रम, अपवाद म्हणजे भ्रमाचा नाश. या दोहोंनी संपूर्ण विश्व प्रकटित होते. ब्रह्म सच्चिदानंद आहे. सत् म्हणजे जो तिन्ही काळात बाधित नाही. चित् म्हणजे ज्ञान, आनंद म्हणजे सुख. सुखाची प्राप्ती म्हणजेच मुक्ती. त्या ब्रह्माला न जाणल्याने ईश्वर, इ. प्रपंचाचे भान होते. ब्रह्माच्या सत्तेमुळेच अज्ञानाला सत्ता प्राप्त होते. सत्ता म्हणजे अस्तित्व. हे तीन प्रकारचे आहे. 1) जे ब्रह्मज्ञानाने बाधित होते ते व्यावहारिक अस्तित्व 2) जे ब्रह्मज्ञानाशिवायही बाधित होते ते प्रातिभासिक अस्तित्व 3) ब्रह्माची सत्ता पारमार्थिक आहे. ईश्वरापासून संपूर्ण जगताची सत्ता व्यावहारिक आहे. रज्जू–सर्प इ. सत्ता प्रातिभासिक आहे. ब्रह्म नित्य आहे, बाकी सर्व अनित्य आहे. ब्रह्म कधी बाधित होत नाही. उत्तमाधिकारी ब्रह्माला जाणले पाहिजे. मध्यमाधिकारी ध्यानाने अनुभव करायला पाहिजे. जे जसे आहे त्याला तसेच जाणणे ज्ञेयाचे लक्षण आहे. भावनेला उत्पन्न करणे ध्येयाचे लक्षण आहे. ज्ञान वस्तूवर आधारित आहे. भावना व्यक्तीवर आधारित आहे. हे ज्ञान प्राप्त होण्याकरिता उपासना करायला हवी. या उपासनेचे साधन म्हणजे 'कर्म' होय. ते कर्म सहा प्रकारचे आहे 1) नित्य 2) नैमित्तिक 3) काम्य 4) निष्काम 5) प्रायश्चित्त 6) निषिद्ध

1. जे कर्तव्याच्या रूपात वेदांमध्ये सांगितले आहे ते 'नित्यकर्म' होय.

2. जे कोणत्या निमित्त्याने केल्या जाते ते 'नैमित्तिक कर्म' होय. उदा. श्राद्ध, इ.

3. कुठल्यातरी कामनेने केल्या जाणाऱ्या कर्माला 'काम्य कर्म' म्हणतात. उदा. पुत्रकामेष्टि.

4. फळाच्या कामनेशिवाय केले जाणारे कर्म 'निष्काम कर्म' होय.

5. निषिद्ध कर्म केल्यावर दोष परिहारासाठी केले गेलेले कर्म 'प्रायश्चित' होय.

6. ज्या कर्मांचा वेदांमध्ये निषेध केलेला आहे ते 'निषिद्ध कर्म' होय.

मनाचे तीन दोष असतात 1) मल 2) विक्षेप 3) आवरण.

1) मल – पाप व पापप्रवृत्ती असणे. हा मल निष्काम कर्माने नष्ट होतो.

2) विक्षेप – मनाची चंचलता म्हणजे 'विक्षेप' होय. याने व्रत, इ. वासना होतात. हा दोष उपासनेने नष्ट होतो.

3) आवरण– ब्रह्माचे अज्ञान हेच 'आवरण' होय. ते दोन प्रकारचे आहे.

'ब्रह्म नाही' अशाप्रकारे असत्त्व आपादक आहे. दुसरे 'ब्रह्म न जानामि' अशाप्रकारे अभावाचे आपादक आहे. पहिले आवरण परोक्ष ज्ञानाने नष्ट होते. दुसरे आवरण अपरोक्ष ज्ञानाने नष्ट होते. 'अहं ब्रह्मास्मि' या अपरोक्ष ज्ञानाने अज्ञान दूर होऊन शुद्ध चैतन्य राहते. तेच 'ब्रह्म' होय. तोच अखंडानंद आहे. त्याला 'मोक्ष' असे म्हणतात.

सत्ताद्वयवाद

सहा अनादि पदार्थ आहेत. ब्रह्म, जीव, ईश्वर, अविद्या, जीव व ईश्वराचा भेद, अविद्या व चैतन्याचा संबंध. यांच्यात 'ब्रह्म' अबाधित असे एक सत्य आहे. अन्य सर्व ज्ञानाने बाधित होतात. याचे विवेचन पूर्वप्रकरणात केले आहे, असे महाराज म्हणतात. सत्ताद्वयवादात व्यावहारिक सत्ता राहत नाही. ती सत्ता 'ब्रह्म' आहे की ब्रह्माहून भिन्न आहे? जर ती 'ब्रह्म' आहे तर मग ती पारमार्थिक सत्ता होईल.



जर भिन्न आहे तर ती कशी सिद्ध होईल? म्हणूनच दोनच सत्ता आहेत. 1) पारमार्थिकी 2) प्रातिभासिकी. अज्ञानरूपी अविद्येत अखंड ज्ञानरूपी ब्रह्माचा आभासच 'जीव' म्हणविल्या जातो. ब्रह्मच जीवाच्या दृष्टीने 'ईश्वर' आहे. वाच्य, उपाधी आणि शरीराभिमानाच्या दृष्टीने ईश्वरच 'जीव' आहे. अविद्येचा चैतन्यासोबत संबंध कल्पित आहे. सत्पदार्थ असलेल्या ब्रह्मातच सर्व प्रपंच कल्पित आहे. ही कल्पनाच 'अध्यारोप' होय. अपवादाने तिचा बाध होतो. अविद्येपासून निर्मित अन्तःकरणात वृत्तीला उपाधी बनवून राहणारे चैतन्य 'जीव' होय. हिलाच 'दृष्टी' म्हणतात. ज्या पदार्थाला जाणतो तीच अस्तित्वात आहे. दुसरी नाही. अशा या सिद्धान्ताला 'दृष्टिसृष्टिवाद' असे म्हणतात. ब्रह्माहून भिन्न अन्य पाच अनादि पदार्थ ज्ञानाच्या वेळी स्थायी आहेत आणि कारणसामग्री आहेत. कार्यसृष्टी स्थूलजगत् असून ते अनित्य आहे. या सिद्धान्तात कारणसामग्रीला स्थिर मानल्याने व ब्रह्मचैतन्याला अधिष्ठान मानल्याने आमचा हा सिद्धान्त बौद्धमताहून भिन्न आहे. ज्याठिकाणी भ्रम होतो ते 'अधिष्ठान' होय. जसे दोरीवर सर्पाचा भ्रम होतो. म्हणून दोरी 'अधिष्ठान' होय. त्या अधिष्ठानाच्या ज्ञानाने भ्रम दूर होतो. या पक्षात अविद्या एक असल्याने जीव सुद्धा एक आहे. सृष्टी गुरु–शिष्य भाव, इ. स्वप्नासारखे भ्रम आहेत.

जर जीव एकच आहे. तर त्याच्या मोक्षाने सर्वांचाच मोक्ष होईल. या शंकेचे उत्तर देतांना गुलाबराव महाराज म्हणतात – अज्ञानाला ज्ञानाने दूर केले पाहिजे. ज्याला अज्ञान नाही तो मुक्त आहे. शुक, वामदेव, इत्यादींची मुक्ती स्वप्नातल्या पुरुषाच्या मुक्तीसारखी आहे. स्वप्नदृष्टान्ताने सर्व शंकांचे निराकरण होते. काही लोकांच्या मतानुसार हिरण्यगर्भच 'जीव' आहे. बाकी सर्व जीवाभास आहे. आणखी काहींच्या मते ब्रह्मच अविद्येच्या कारणामुळे संसारात असल्याने तोच मुख्य जीव आहे. बाकी त्याचे आभास आहेत.

या प्रकरणाला आचार्यांनी 'अद्वैतबोधनम्' असे नाव दिलेले आहे.

अनेकजीववादे प्रपंचस्वरूपम्

जीव अनेक आहेत असे मानणाऱ्यांनुसार प्रत्येक जीवाला सामान्य ज्ञान होते, जसे उष्णतेने पोळल्याने दुःख होते, इ. त्या प्रपंचाचा कर्ता ईश्वरही एकच आहे. तो विभू, सर्वज्ञ, सर्वशक्तिमान् आहे, त्याचेच अंश जीव आहेत. तो अविद्येत ब्रह्माचे प्रतिबिंब आहे, तर काही लोकांच्या मतानुसार अन्तःकरणात ईश्वराचे प्रतिबिंब आहे.

काहींच्या मते अन्तःकरण अवच्छिन्न चैतन्य 'जीव' होय. अनवच्छिन्न चैतन्य 'ईश्वर' होय. यालाच काही लोक 'आभासवाद' म्हणतात आणि काही लोक जसे विवरणकार प्रतिबिंबरूपी जीव सत्यच आहे असे मानतात. त्याला 'प्रतिबिंबवाद' म्हणतात. प्रत्येक जीवाकरिता ईश्वराने बनविलेला प्रपंच समान आहे. परंतु जीवाने बनविलेला प्रपंच वेगळा असतो. जसे ईश्वराने मांसमय स्त्रीशरीर बनविले हे समान आहे. यालाच काही जीव माता मानतात, काही भार्या तर काही मुलगी मानतात. म्हणून भौतिक निर्माण एक असूनही मनोनिर्माण अनेक आहेत. ईश्वराच्या प्रपंचास सुख–दुःख नाही. जीवाच्या प्रपंचास सुख– दुःख आहे. जीवाला प्रपंच सोडायला हवा. काही अन्य दार्शनिकांच्या मते, प्रत्येक जीवाला प्रपंच, पंचमहाभूत, ईश्वर इ. भिन्न आहे. हे वाचस्पती मिश्रांचे मत आहे. हे सर्व अनेकजीववाद्यांच्यानुसार प्रपंचाचे स्वरूप आहे.

अपवाद – यानंतर 'अपवाद' या चतुर्थ प्रकरणाचा प्रारंभ होतो. जे अपूर्ण स्वरूपात उपलब्ध आहे. अपवादाचा अर्थ 'बाध' आहे. श्रुतिसिद्धान्तांनी होणारा बाध आणि युक्तीने होणारा बाध असे बाधाचे दोन प्रकार आहेत. श्रवण, मनन, निदिध्यासन अशी तीन साधने आहेत. श्रवणाने श्रौतबाध दूर होतो, मननाने यौक्तिकबाध दूर होतो. श्रवणसुद्धा दोन प्रकारचे आहे–

1. अवांतरवाक्यश्रवण – जे परोक्ष ज्ञान उत्पन्न करतात.

2. महावाक्यश्रवण – जे अपरोक्ष ज्ञान उत्पन्न करतात.

समन्वयपूर्वक जे श्रवण होते ते सांप्रदायिकांचे आहे. उत्तमाधिकाऱ्याला



एका श्लोकाने, अर्ध्या श्लोकाने किंवा कोणाला एका पादानेही ज्ञान होते. एकावेळी उपदेशाने ज्यांना ज्ञान होत नाही त्यांच्याकरिता समन्वयाने श्रवण करणे आवश्यक आहे. ते श्रवणसुद्धा एकवेळ नाही, तर अनेकवेळा करण्याला हवे. कारण 'आवृत्तिरसकृदुपदेशात् ।'[174] या ब्रह्मसूत्राने अनेक वेळा श्रवण करण्याचे विधान सांगितले आहे.

अभिमत –या ग्रंथात वेदान्ताच्या पारिभाषिक शब्दांच्या लक्षणांसोबत प्रमुख सिद्धान्तांचा आढावा घेतला आहे. वेदान्ताचे प्राथमिक विचार यात क्रमाने सांगितले आहेत. 'जगात आत्मा व अनात्मा हे दोनच पदार्थ आहेत. त्यापैकी आत्मा चेतन व ज्ञानरूप आणि अनात्मा जड व अज्ञानरूप. तसेच अज्ञान, माया, अविद्या, प्रकृती, प्रधान, अव्यक्त हे सर्व पर्यायी शब्द आहेत, असे सांगितले जाते.

कोणी अनेक जीववाद मानतात, तर कोणी एकजीववाद मानतात, तर कोणी जीव, ईश्वर व ब्रह्म असे तीन पदार्थ मानतात. परंतु ज्या योगाने जीवाला आत्मज्ञान होईल ती प्रक्रिया घेऊन साधकाने पूर्ण व्हावे हेच या प्रक्रियाभेदांचे महत्त्व सांगितले आहे. पुढे सृष्टीची उत्पत्ती सांगताना थोडक्यात पञ्चीकरण, ब्रह्म, जीव, ईश्वर, जीवेश्वरभेद, अविद्याचैतन्याचा संबंध असे 'ाट् अनादिपदार्थ, अध्यारोप, अपवाद दृष्टिसृष्टिवाद, अवच्छेदवाद, प्रतिबिम्बवाद इ. चे सुद्धा स्वरूप स्पष्ट केले आहे. ईश्वरकृत प्रपंच सुख–दुःखाला कारणीभूत नसून जीवनकृत प्रपंचासंबंधीची भावना दुःखाला कारण आहे. प्रपंचापासून जीवाला सुख–दुःखे भोगावी लागतात. म्हणून सत्तात्रयवादापेक्षा सत्ताद्वयवादाने जीवन लवकर ब्रह्मरूप होऊ शकते असे उत्कृष्ट रीतीने मांडले आहे. सत्तात्रयवाद व सत्ताद्वयवाद/दृष्टिसृष्टिवाद या क्लिष्ट विषयांचे प्रतिपादन महाराजांनी सोप्या भाषेत, लघु लघु वाक्याद्वारे व व्यावहारिक उदाहरणांद्वारे केल्याने हा ग्रंथ वेदान्त जिज्ञासूंसाठी अत्यंत उपकारक आहे.

12. श्रीधरोच्छिष्टपुष्टिः

भागवताच्या कपिल गीतेवर गुलाबराव महाराजांनी 'श्रीधरोच्छिष्टपुष्टिः' नावाची टीका लिहिली आहे. या ग्रंथारंभी त्यांनी स्पष्ट केले आहे की ही टीका आपले ज्ञान शुद्ध करून ब्रह्मज्ञानाच्या निकषावर त्याला परखण्याकरिता लिहिलेली आहे, कोणत्याच प्रसिद्धीकरिता नाही.

'पञ्चविंशे जनन्या तु पृष्टो बन्धविमोचनम् ।
आदावाह परं भक्तिलक्षणं कपिलः सुतः ।।'[175]

प्रथम श्लोकात आपल्या मातेच्या विचारण्यावरून कपिल महर्षींनी बंधनाने मोक्ष कसा प्राप्त होतो याचे वर्णन केले आहे. हे स्पष्ट करतांना गुलाबराव महाराज म्हणतात की, पिता–पुत्र, माता–पुत्र, पती–पत्नी इ. अनेक प्रसंग आहेत. येथे ब्रह्मविद्येचा उपदेश केलेला आहे. गुलाबराव महाराजांनी महाभारत, मार्कंडेय पुराण, बृहद्वासिष्ठ, कौषीतकी श्रुती, छांदोग्य उपनिषद् इ ग्रंथातील उदाहरणे दिली आहेत.

''कपिलेनार्पिता मात्रे गूढभावनियन्त्रिता ।
योगमाणिक्यमञ्जूषा स्फुटमुद्घाट्यतेऽधुना ।।'[176]

द्वितीय श्लोकात आपल्या मातेला कपिल महर्षींनी जी अत्यंत गूढ योगमाणिक्याची पेटी दिलेली आहे, तिला मी उघडीत आहे असा कपिल गीतेचा दुसरा श्लोक आहे.

यावर व्याख्या करतांना गुलाबराव महाराज म्हणतात, येथे कपिल म्हणजे मायारूपी शरीर धारण केलेले कपिलऋषी होय.

'यद्यद्विधत्ते भगवान् स्वच्छन्दात्माऽत्ममायया ।
तानि मे श्रद्दधानस्य कीर्तनान्यनुकीर्तय ।।'[177]

तृतीय श्लोकात शौनक महर्षींचे वचन दिलेले आहे.



यात 'तत्त्वसंख्याता' या शब्दाचे विश्लेषण करतांना गुलाबराव महाराजांनी हे स्पष्ट केले आहे की, येथे 'संख्याता' शब्दाचा अर्थ 'सांख्यप्रवर्तक' असा आहे आणि याच्या समर्थनार्थ शंकराचार्यांचे भाष्य उद्धृत केलेले आहे. ज्ञान उत्पन्न होईपर्यंत चतुर्विंशतितत्त्व अनादि मानली जातात हे त्याचे तात्पर्य आहे. 'संख्या' आणि 'सांख्य' शब्दांवर गुलाबराव महाराजांनी स्पष्टीकरण दिलेले आहे. त्यांच्यानुसार 'सम्+ख्या' या विभाजनात 'सम्' शब्दाचा अर्थ एक ब्रह्म, त्याचेच ज्ञान 'सांख्य' आहे. परंतु प्रचलित सांख्यदर्शनात ब्रह्माचा उल्लेख मिळत नाही.

तर गुलाबराव महाराजांच्या मतानुसार जे सांख्य कपिल महर्षींनी प्रवर्तित केले ते उपनिषद् अनुकूल सांख्य आहे. तसेच 'भगवान्' शब्दाची व्याख्या करतांना म्हणतात, 'भग' शब्दाचा अर्थ कीर्ती, औदार्य, ज्ञान, वैराग्य आणि ऐश्वर्य असा होतो. महाराजांनी सांख्यांना श्रुतिविरूद्ध म्हणणाऱ्यांचे खंडन केले आहे. कारण गुलाबराव महाराजांच्या मतानुसार सांख्यांचेही तात्पर्य ब्रह्मज्ञानच आहे. त्यांच्या समर्थनार्थ गुलाबराव महाराज लिहितात की, सृष्टी सांगणाऱ्या वेदवाक्यांचे तात्पर्य ब्रह्मच आहे. यासाठी प्रमाण 'मांडूक्य उपनिषद् भाष्य' गुलाबराव महाराजांनी लिहिले आहे.

या श्लोकावर श्रीधरीय व्याख्येचे विवेचन करतांना गुलाबराव महाराज म्हणतात की भगवद्भक्ती हीच अलौकिक आनंद देते.

भागवताच्या तिसऱ्या श्लोकावर व्याख्या करतांना श्रीधर व्याख्येत म्हटले आहे की, जीवांच्या इच्छेने शरीर धारण करणारा ईश्वर आणि त्याचे सर्व कर्म कीर्तन करण्यायोग्य आहे. यावर व्याख्या करतांना गुलाबराव महाराज म्हणतात की हे जग ब्रह्माचा विवर्त आहे. हा विवर्त दोन प्रकारचा असतो. 1) अध्यस्त 2) अनध्यस्त.

अध्यस्त विवर्त ज्ञानाने बाधित होतो. मात्र अनध्यस्त विवर्त ज्ञान झाल्यावरही विवर्तित होत नाही. हेच शंकराचार्यांनी देखील मान्य केले आहे.

तसेच 'ईश्वराच्या सर्व कर्मांचे अनुकरण करायला हवे' असे वाक्य असले तरी लोकधर्मांच्या विरूद्ध नसलेल्या कर्मांचेच अनुकरण करायला पाहिजे. जसे श्रीकृष्णाने स्वयं गोपीरमण असूनसुद्धा भगवद्गीतेत कुठेही परस्त्रीगमनाचा उपदेश केला नाही.

'निर्विण्णा नितरां भूमन्नसदिन्द्रियतर्षणात् ।
येन संभाव्यमानेन प्रपन्नांऽन्धतमः प्रभो ।।'[178]

सातव्या श्लोकाच्या शब्दांवर व्याख्या करतांना गुलाबराव महाराज म्हणतात की, 'असदिन्द्रिय' शब्दाने श्रीधराचार्यांनी ज्या इंद्रियांना 'असत्' म्हटले ते इन्द्रिय गुणांचा परिणाम नसून अविद्येचे कार्य आहे. अर्थात्; हे जग ब्रह्माचा विवर्त आहे, परिणाम नाही असे स्पष्ट केले आहे. तसेच मूळ श्लोकातील 'निर्विण्ण' या शब्दाचा अर्थ 'श्रान्त' असा श्रीधराचार्यांनी घेतला आहे. त्याला आणखी स्पष्ट करतांना गुलाबराव महाराज म्हणतात की, या शब्दाने 'वशीकार' नावाचे अपर वैराग्य येथे सांगितले आहे. योगशास्त्रानुसार वैराग्य चार प्रकारचे असते

1) यतमान 2) व्यतिरेक 3) एकेन्द्रिय 4) वशीकार. यांच्यात अंतिम वैराग्याचे लक्षण योगसूत्रात सांगितले आहे. –

"दृष्टानुश्रविकविषयवितृष्णस्य वशीकारसंज्ञा वैराग्यम् ।'[179]

गुलाबराव महाराजांच्यानुसार देवहूतीचे वैराग्य 'वशीकार' नावाचे होते.

'तस्य त्वं तमसोऽन्धस्य दुष्पारस्याद्य पारगम् ।
सच्चक्षुर्जन्मतामन्ते लब्धं मे त्वदनुग्रहात् ।।'[180]

आठव्या श्लोकावर व्याख्यान करतांना श्रीधराचार्यांनी 'पारग' शब्दाचा समास सांगितला आहे. येथे 'पार' म्हणजे आध्यात्मिक, आधिदैविक आणि आधिभौतिक या तीन प्रकारच्या दुःखांचा नाश. त्रिविधदुःखाची निवृत्ती करणारे कपिल महर्षी आहेत. येथे गुलाबराव महाराज स्पष्ट करतात की, ज्ञानाने संचित



कर्म नष्ट होते. वर्तमान व भविष्यत् कर्मांचा लेश (लोप) होतो. यासाठी प्रमाणादाखल गुलाबराव महाराजांनी ब्रह्मसूत्राचे उद्धरण दिले आहे.

'तद् अधिगम उत्तरपूर्वाघयोरश्लेषविनाशौ तद् व्यपदेशात् ।'[181]

येथे अधिगम अर्थात् ज्ञान झाल्यानंतर उत्तर–पूर्व अर्थात् भविष्यत् आणि भूतकालिक पापांचा लोप अर्थात विनाश होतो. यात 'तस्य तावदेव चिरम्' हे वेदवाक्य प्रमाण आहे.

याप्रकारे श्रुतिस्मृतिन्याय वाक्यांच्या आधारे गुलाबराव महाराजांनी कर्मनाशाचा विषय स्पष्ट करून शास्त्रांमध्ये बहुचर्चित एक विषय सांगितला आहे तो म्हणजे जन्माचे कारण हे अनेक कर्म आहे की एक कर्म आहे.

गुलाबराव महाराजांनुसार एक कर्म एका जन्माचे कारण आहे. योगाने किंवा भगवद्भक्तीने प्रारब्धाचा नाश होतो आणि हाच पक्ष योग्य आहे.

'अथ मे देव संमोहमपाक्रष्टुं त्वमर्हसि ।
योऽवग्रहोऽहं ममेतीत्येतस्मिन् योजितस्त्वया ।।'[182]

दहाव्या श्लोकावर व्याख्यानात कार्यविद्येचे स्वरूप स्पष्ट केलेले आहे. माया किंवा अविद्येचे स्वरूप खालीलप्रमाणे वर्णिले आहे.

1) सत् किंवा असत् रूपाने सांगितली जाऊ शकत नाही.

2) अनादि भावरूप आहे.

3) आवरण, विक्षेप स्वरूपाची आहे.

4) त्रिगुणात्मक आहे.

5) तिचे अनुमान कार्यावरूनच केले जाते.

6) प्रकृती, शक्ती हिचेच पर्यायी शब्द आहेत.

7) या जगाचे परिणामि–उपादान कारण आहे.

ही कार्याविद्या विक्षेपासोबत क्लेशरूप होते. हे क्लेश योगदर्शनानुसार 5 प्रकारचे आहेत. 'अविद्याऽस्मितारागद्वेषाभिनिवेशाः क्लेशाः।'[183] येथे गुलाबराव महाराज स्पष्ट करतात की, आवरण दोन प्रकारचे असते. 1) 'असत्त्व' देणारे व 2) अज्ञान देणारे. यांनीच क्लेश उत्पन्न होतात. यांच्या ज्ञानाने कारणविद्येचा नाश होतो. योगाने क्लेशांची निवृत्ती होते व भक्तीने प्रारब्धनाश व अविद्यानाश होतो.

'तं त्वागताऽहं शरणं शरण्यं स्वभृत्यसंसारतरोः कुठारम् ।
जिज्ञासयाऽहं प्रकृतेः पुरुषस्य नमामि सद्धर्मविदां वरिष्ठम् ।।'[184]

अकराव्या श्लोकाच्या व्याख्येमध्ये गुलाबराव महाराज म्हणतात की, ब्रह्मज्ञानात सांख्य व वेदान्त प्रमाण आहेत.

यांच्यात सांख्याने सामान्य आत्मविवेक, सद्‌चिद्‌रूप अनुभव व 'त्वम्' पदाचे शोधन होते. वेदान्ताने ब्रह्मानंद प्राप्त होतो.

'योग आध्यात्मिकः पुंसां मतो निःश्रेयसाय मे ।
अत्यन्तोपरतिर्यत्र दुःखस्य च सुखस्य च ।।'[185]

तेराव्या श्लोकाच्या व्याख्यानामध्ये गुलाबराव महाराजांनी, श्रीधरीय व्याख्येत ज्याला स्पर्श केलेला नाही त्या विषयाचे विवेचन केलेले आहे. त्यानुसार जो पुरुषार्थाकरिता प्रयत्न करतो तोच पुरुष आहे. इतर लोक 'ंढ आहेत. त्रिगुणात्मक मायेच्या बंधनातून सुटका करवून घेणे म्हणजेच मोक्ष होय.

'तमिमं ते प्रवक्ष्यामि यमवोचं पुराऽनघे।
ऋषीणां श्रोतुकामानां योगं सर्वांगनैपुणम् ।।'[186]

चौदाव्या श्लोकाच्या व्याख्येत प्रमाणांच्या मर्यादेचे विवेचन केले आहे. त्यात गुलाबराव महाराजांनी स्पष्ट केले आहे की, अनुमानप्रमाण सामान्य ज्ञान देते. तर विशेषज्ञान हे शब्दांनी होते. तसेच ब्रह्मज्ञानात अनुमानापेक्षा शब्दच प्रमाण आहे. तो शब्ददेखील ईश्वरप्रोक्त वैदिक शब्द होय.



'चेतः खल्वस्य बन्धाय मुक्तये चात्मनो मतम् ।
गुणेषु सक्तं बन्धाय रतं वा पुंसि मुक्तये ।।'[187]

पंधराव्या श्लोकाच्या व्याख्येत गुलाबराव महाराज 'संयम' शब्दाचे योगशास्त्रानुसार स्पष्टीकरण देतांना म्हणतात की धारणा, ध्यान व समाधी हे तीनही 'संयम' आहेत.

योगसूत्र म्हणते —"त्रयमेकत्रसंयमः।"[188]

यावर गुलाबराव महाराज म्हणतात की, जेव्हा संवेग मृदू असतो तेव्हा धारणा, मध्य संवेगाने ध्यान व तीव्र संवेगाने समाधी होते. त्यांनी समाधीचे एक स्पष्ट लक्षण दिलेले आहे. 'भ्रान्तिरहिता, मनोरथऐक्यरूपा साक्षिनिष्ठा समाधिः।'[189] हे लक्षण वेदान्तानुसार आहे.

यानंतर बंधमोक्षाचे विवेचन करतांना गुलाबराव महाराजांनी म्हटले आहे की, जीवाला देशाचे, काळाचे किंवा स्वभावाचे बंधन नसते.वस्तुतः आत्म्याचे बंधन नसते, बंधन मनाचेच असते. यासाठी अनुभवच प्रमाण आहे. म्हणून श्रुती सुद्धा ब्रह्मज्ञानाकरिताच बंधनाचा अनुवाद करते. जीव आत्म्याचेच प्रतिबिंब आहे. बुद्धीत जेव्हा जीवाचे प्रतिबिंब असते त्यालाच बंधमोक्ष असतात. हा विषय गुलाबराव महाराजांनी शतश्लोकी, ऋक्संहिता, इ. ग्रंथांच्या प्रमाणांनी स्पष्ट केला आहे.

मनाचेच बंधमोक्ष असल्यामुळे तो केवळ अध्यास आहे आणि जेव्हा गुणांचा नाश होतो तेव्हा चित्ताचा नाश होतो. 'भक्ती म्हणजे चित्तात आत्मारूपाचा अनुभव' असे गुलाबराव महाराजांनी योगसूत्राच्या आधारे स्पष्ट केले आहे.

'अहंममाभिमानोत्थैः कामलोभादिभिर्मलैः।
वीतं यदा मनः शुद्धमदुःखमसुखं समम् ।।'[190]

सोळावा श्लोक स्पष्ट करतांना गुलाबराव महाराज म्हणतात की, वेदान्तानुसार चित्तशुद्धीच्या दशेत विक्षेप व आवरण दूर होत नाहीत. ही चित्तशुद्धी

दोन प्रकारची आहे.

1) अपर वैराग्याने होणारी 2) पर वैराग्याने होणारी. जेव्हा पर वैराग्याने चित्तशुद्धी होते तेव्हा आवरण व विक्षेप होत नाहीत असे स्पष्ट केले आहे.

'तदा पुरुषमात्मानं केवलं प्रकृतेः परम् ।
निरन्तरं स्वयंज्योतिरणिमानमखण्डितम् ।।
ज्ञानवैराग्ययुक्तेन भक्तियुक्तेन चात्मना ।
परिपश्यस्युदासीनं प्रकृतिं च हतौजसम् ।।'[191]

सतराव्या व अठराव्या श्लोकांच्या व्याख्यानात गुलाबराव महाराजांनी आत्म्याच्या परमाणू स्वरूपाचे खंडन केले आहे. त्यांनी असे म्हटले आहे की, शैव, पाशुपत, रामानुज, माध्व, निम्बार्क, वल्लभ इ. सर्व आत्म्याला परमाणू स्वरूप मानतात हे चुकीचे आहे. कारण आत्मा 'अणू' कसा असू शकतो? जातीने की व्यक्तीने? जातीने आत्मा अणू होऊ शकत नाही कारण व्यक्तीशिवाय जाति राहू शकत नाही आणि व्यक्तीरूप आत्मा परमाणू नसतो. कारण अवयवाशिवाय व्यक्ती राहू शकत नाही. आत्म्याचे अवयव मानले तर आत्म्याचा नाश प्रसक्त होईल. तसेच जर आत्म्याला अणुस्वरूप मानले तरीसुद्धा तो परमाणू स्वयं सावयव की निरवयव? सावयव असू शकत नाही. निरवयव मानला तर तो केवळ जडपदार्थाविषयी, चैतन्याविषयी नाही. जर आत्म्याचे निरवयव स्वरूप कोणाद्वारे कल्पित आहे तर ते प्रामाणिक नाही. म्हणून आत्मा परमाणुस्वरूप नाही.

याच संदर्भात आत्म्याच्या विभु स्वरूपाचे विवेचन केलेले आहे. नैयायिक आत्म्याला विभु मानतात. त्यांच्यानुसार सर्व देश संयोगी विभू पदार्थ आहे. गुलाबराव महाराज यावर विचारतात — जर चार पदार्थ विभू असतील तर परस्पर सांकर्य होईल. तेव्हा पदार्थाच्या रूपात त्यांचे निर्वचन होणार नाही. तसेच आत्मा, दिक् व काल पदार्थांचे जे नैयायिकांनी निरवयव स्वरूप मानले तेही संभव नाही.



जीव जर विभू असता तर नैय्यायिकांनी जे स्वरूप सांगितले की, जीव प्रतिशरीर भिन्न आहे ते संभव होणार नाही. जर जीवाला अंश म्हटले तर त्याचे निरवयव व विभू स्वरूप नष्ट होईल. या दोषांमुळे नैय्यायिकांचे मत मान्य नाही. वेदान्तात यांना 'औपाधिक' म्हटल्याने सर्व दोष दूर होतात. तसे तर ब्रह्मज्ञान ब्रह्माला होत नाही; परंतु आभासाला होते.

'तितिक्षवः कारुणिकाः सुहृदः सर्वदेहिनाम् ।
अजातशत्रवः शान्ताः साधवः साधुभूषणाः ।।'[192]

एकविसाव्या श्लोकाच्या व्याख्यानात 'साधवः शास्त्रानुवर्तिनः' या शब्दांची व्याख्या करतांना गुलाबराव महाराजांनी तीन प्रकारची श्रद्धा भगवद्गीतेनुसार स्पष्ट केली आहे. शास्त्रानुसार जे कर्म करतात तेच 'साधू' होत. तसे तर मोक्षापूर्वी शास्त्रानुसरण झाले असले तरी मुक्त दशेत शास्त्रानुसरण राहत नाही. तर शास्त्रोपदेश व्यर्थ आहे काय? यावर गुलाबराव महाराज म्हणतात की, जगत् कल्याणाकरिता सत्पुरुष शास्त्रानुसार कर्म करतात आणि सत्पुरुष करुणापूर्णच असतात. ते जसा आग्रह करतात तशीच दयादेखील करतात. हा विषय स्पष्ट करतांना गुलाबराव महाराज म्हणतात, श्री नारदमहर्षींनी नलकुबरांना शापही दिला आणि श्रीकृष्णाद्वारा वरसुद्धा दिला. म्हणून साधुपुरुष करूणापूर्ण असतात. या संदर्भात गुलाबराव महाराजांनी नारदीयभक्तिसूत्रांचा उल्लेख करून आत्मनिवेदन, लोकनिवेदन व वेदनिवेदन या तिघांचे लक्षण दिले आहे.

अभिमत —श्रीमदभागवतान्तर्गतकपिलगीतेच्या श्रीधरी टीकेवर ही 'श्रीधरोच्छिष्टपुष्टिः' नावाची टीका आहे. वेदान्ताचे सार यांत प्रतिपादित केले आहे. कपिलमुनींनी देवहूती मातेला जो सांख्याचा उपदेश केला तो उपदेश म्हणजे 'कपिलगीता' होय. यात पंचवीस तत्त्वे सांगितली असल्यामुळे सांख्य म्हटले गेले आहे, असा नेहमीचा अर्थ न करता महाराजांनी ''एका आत्मपुरुषाविषयी सांगितलेले तत्त्वज्ञान म्हणजे सांख्य'' असा नवीन अर्थ दाखविला आहे.

''सम्यक् एकं ब्रह्म तस्य ख्या कथनं संख्या ।
तस्या भावः सांख्यम् ।।'[193]

हे कपिलमुनी विष्णूचे अवतार आहेत. पहिल्या ब्रह्मनंदनजन्मात त्यांनी आसुरीला उपदेश केला व दुसऱ्या जन्मात देवहूती मातेला उपदेश केला, असा निर्णय देऊन दोन–कपिल वादाचा समन्वय केला. येथे सेश्वरसांख्य सांगितले असून सांख्यदर्शनाच्या अभ्यासाने ब्रह्मज्ञान होते व त्यानंतर भगवंताची भक्ती करावी असा विधी दाखविला.

''भगवद्भक्तौ अतृप्तिरेव आनंदकरी'' असे वियोगोपलालनातील आनंदाचे स्वरूप सांगितले आहे. पुढे भगवद्विग्रहाचे उपादान कारण भगवत्संकल्प असतो आणि निमित्तकारण भक्ताची इच्छा असते असे मांडले आहे आणि शेवटी अनध्यस्तविवर्ताची सिद्धी केली आहे. ज्ञान झाल्यानंतर प्रारब्धाचा भोगूनच क्षय होत असतो पण अनध्यस्तविवर्ताची भक्ती केली म्हणजे प्रारब्धाचा अभिभाव होतो, प्रारब्धफलाची दुःखरूपता आनंदमय होऊन जाते व अविद्यालेश नाहीसा होतो, हे भक्तीचे वैशिष्ट्य. हा प्रकरण ग्रंथ कपिल गीतेच्या फक्त 22 श्लोकांवर उपलब्ध आहे.

श्रीधरीय व्याख्येनुसार याला स्पष्ट करतांना गुलाबराव महाराजांनी ही जी व्याख्या लिहिली आहे. त्यात सांख्य, योग, वेदान्त, भक्ती, न्यायदर्शनांचा सूक्ष्म विमर्श केलेला आहे. विशेषत्वाने आत्म्याच्या अणुत्वखंडन, विभुत्वखंडनाद्वारा नैयायिकांचे मत कसे अमान्य आहे हे स्पष्ट केले आहे. या व्याख्येमध्ये गुलाबराव महाराजांची सर्वंकष प्रतिभा, अनेकशास्त्रज्ञान यासोबतच वेदान्तनिष्ठा व भक्तिनिष्ठा स्पष्ट होते.

13. उच्छिष्टपुष्टिलेशः

'उच्छिष्टपुष्टिलेशः' या ग्रंथात गुलाबराव महाराजांनी श्रीधरीय व्याख्येसहित भागवताचे विश्लेषण करतांना श्रीधरीय व्याख्येच्या पाच श्लोकांना



व्याख्याविषय बनविला आहे. त्यात पहिल्या चार श्लोकांचे व्याख्यान 'चतुःश्लोकी व्याख्यान' या नावाने चम्पूशैलीत एकूण 112 श्लोकांमध्ये केलेले आहे, तर पाचव्या श्लोकावर चम्पूशैलीतच वेगळे व्याख्यान केले आहे, ज्यात 25 श्लोक आहेत. या ग्रंथामध्ये ज्या श्लोकांवर गुलाबराव महाराजांनी व्याख्यान केले आहे ते याप्रकारे –

1. 'नमः श्रीपरमहंसास्वादितचरणकमलचिन्मकरन्दाय ।
   भक्तजनमानसनिवासाय श्रीरामचन्द्राय ।।'[194]
2. 'वागीशा यस्य वदने लक्ष्मीर्यस्य च वक्षसि ।
   यस्यास्ते हृदये संवित्तं नृसिंहमहं भजे ।।'[195]
3. 'विश्वसर्गविसर्गादिनवलक्षणलक्षितम् ।
   श्रीकृष्णाख्यं परं धाम जगद्धाम नमामि तम् ।।'[196]
4. 'माधवो माधवावीशौ सर्वसिद्धिविधायिनौ ।
   वन्दे परस्परात्मानौ परस्परनु तिप्रियौ ।।'[197]
5. 'संप्रदायानुरोधेन पौर्वापर्यानुसारतः ।
   श्रीभागवतभावार्थदीपिकेयं प्रतन्यते ।।'[198]

मंगल श्लोकांमध्ये पंचायतनाला नमस्कार करून गुलाबराव महाराजांनी ग्रंथनिर्मितीचे प्रयोजन सांगितले आहे. 'स्वज्ञानशुद्धये' (आपले ज्ञान शुद्ध करण्याकरिता) येथे गुलाबराव महाराज म्हणतात 'श्रीमद्भागवत' सूत्रग्रंथ आहे. तर श्रीधरीयव्याख्या त्याचे भाष्य आहे आणि स्वयं गुलाबराव महाराजांची टीका 'बालबोधिनी' आहे. ते म्हणतात द्वैत मार्गाचे अवलंबन करणाऱ्या आणि शंकराद्वैताचा द्वेष करणाऱ्या अनेक मूर्खांनी गर्वाने श्रीधरीय व्याख्येची व्याख्या केली आहे. मी माझ्या युक्तीने त्याचे निराकरण करून श्रीधरीय व्याख्येचे गुण यात सर्वांसाठी

प्रकट करीन.

पहिल्या श्लोकाच्या व्याख्यानात गुलाबराव महाराज म्हणतात की, मर्यादापालनाशिवाय पुष्टिमार्गाचे ज्ञान होणार नाही आणि मर्यादापालनाने श्रीरामचंद्रावर भक्ती होते. श्रीकृष्णावर पुष्टिमार्गाने होणारी भक्ती शंकराचार्यांच्या मतानुसार व्हायला हवी. वल्लभाचार्यांच्या मतानुसार येथे सुख होणार नाही. ''श्रीरामचंद्रांना सोडून जो कृष्णभक्ती करतो तो पापात्मा आहे. म्हणून कृष्णभक्तीपूर्वी मी श्रीरामाची स्तुती करीत आहे. कारण श्रीरामाप्रती भक्तीने श्रीकृष्णावर भक्ती होईल,'' असे गुलाबराव महाराज म्हणतात किंवा दंडकारण्यात सुंदर श्रीरामचंद्रांना पाहून सर्व मुनी मोहित होऊन त्यांचे आलिंगन करण्याची इच्छा प्रकट करतात. तेव्हा 'मी जेव्हा श्रीकृष्ण बनेन तेव्हा तुम्ही सर्व गोपिका बनून माझे आलिंगन कराल' असे श्रीराम म्हणतात. हे कृष्णोपनिषदात प्रसिद्ध आहे.

प्रथम श्लोकाच्या व्याख्यानात गुलाबराव महाराज म्हणतात, परमहंस श्रीरामाच्या चरणकमलांची थोडी सेवा केली. परंतु त्याच लोकांनी श्रीकृष्णाची सर्व प्रकारची सेवा केली. या संदर्भात वंशीधर आणि त्यांचे अनुयायी टीकाकार अशी व्याख्या करतात – 'परमहंस' या शब्दाचा अर्थ प्रकृती व पुरुषाचा विवेक करणारे भक्त आणि तेच लिहितात की, हे भक्त चिंतनाने प्रकृतीला सोडून कधीच त्यांचे स्मरण करीत नाहीत. ते लोक प्रकृतीला भगवानाहून भिन्न मानत नाहीत, परंतु भगवंताची शक्तीच मानतात. यांच्या या विचारावर गुलाबराव महाराज विचारतात की, जे भगवंताला व प्रकृतीला भिन्न मानणार नाहीत, ते लोक विचारांनी त्याला कसे सोडतील? सूर्याच्या प्रकाशाला सोडून सूर्याचे ग्रहण कुणी कसे करू शकतो? जर या दोन्ही प्रकृतींना वेगळे म्हटले तर त्यासाठी प्रमाण नाही. वेदाहून विरुद्ध असलेला परमतसमन्वय महात्म्याने करायला नको. या व्याख्याकारांना एवढा मोह होण्याचे कारण अनेक जन्मांपासून श्रीशंकराचार्याप्रती त्यांच्या मनातील असलेला द्वेषच या मोहाचे कारण आहे आणि मनुष्यजातीमध्ये पक्षिविशेषाचे ग्रहण कोणत्या प्रयोजनाने घेतले? हेही स्पष्ट नाही. तसे जर श्रुती स्मृतींमध्ये कुटीचक,



बहूदक, हंस व परमहंस या नावांनी संन्याशाचे चार प्रकार सांगितले आहेत. अपूर्ण यामध्ये ज्याचे सर्व पाप निवृत्त झाले आहे तो 'परमहंस'.

यानंतर गुलाबराव महाराज म्हणतात, श्रीरामचन्द्राच्या पादसेवेचा गंध 2 प्रकारचा आहे. 1) चित् गंध, 2) आनंद गंध. त्यात चित्द्‌गंध श्रीरामभक्तीने तर आनंदगंध कृष्णभक्तीने होतो. अर्थात् रामभक्तीने ज्ञान व श्रीकृष्ण भक्तीने आनंद होतो. रामायणात श्रीरामाने स्वयं भक्तीला ज्ञानाचे साधन सांगितले आहे.

'यावन्न पश्येदखिलं मदात्मकं तावन्मदाराधनतत्परो भवेत् ।'[199]

परंतु श्रीकृष्णाने गीतेत ज्ञानाला भक्तीचे साधन सांगितले आहे.

'ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न कांक्षति ।
समः सर्वेषु भूतेषु मद्‌भक्तिं लभते पराम् ।।'[200]

यासाठी सौषुप्तश्रुती, सात्त्वती श्रुती, शांडिल्यभक्तिसूत्र ग्रन्थ हे प्रमाण आहेत.

'यं सर्वे देवा नमन्ति मुमुक्षवो ब्रह्मवादिनश्च ।' (सौषुप्तश्रुती)

'आत्मारामाश्च मुनयो निर्ग्रन्था अप्युरुक्रमे ।

कुर्वन्त्यहैतुकीं भक्ति'मित्याह सात्वती श्रुतिः ।।' (सात्त्वतीश्रुती)

भक्त दोन प्रकारचे असतात– 1) जन 2) कान्त. पहिल्या प्रकारचे भक्त मर्यादा मार्गाचे आलंबन करतात आणि त्यांच्या मनात श्रीराम वास करतात. दुसऱ्या प्रकारच्या भक्ताच्या मनात श्रीरामच कृष्णरूपात त्यांच्या मनात राहून चंद्र होतो. म्हणून श्रीराम व श्रीकृष्ण एकच आहे. या संदर्भात 'श्रीरामचंद्र' शब्दाचा अर्थ स्पष्ट करतांना गुलाबराव महाराज म्हणतात की, 'श्री' शब्द बहुमानाकरिता आहे 'श्री' संप्रदाय दर्शविण्यासाठी नाही आणि 'राम' शब्दाची व्युत्पत्ती अशी आहे –

'राति =(गृह्णाति) विश्वं निजोदरे ।'

साक्षि अभ्यते प्राप्यते = जे साक्षी प्रकाशक चैतन्य प्राप्त केल्या जाते ते

'आम' आणि विश्वाचा संहार करणारा 'र' या दोन शब्दांनी 'राम' शब्द बनतो. हेच याचे तटस्थ लक्षण आहे. राम आणि कृष्ण शब्दांमध्ये एवढा फरक आहे की, मुक्तिनंतर जे स्थान प्राप्त करतात ते 'राम' आहे. तर भक्त जे प्राप्त करतात ते 'कृष्ण' आहे. येथे गुलाबराव महाराज म्हणतात, रामाच्या अन्वयाने श्रीकृष्णाला येथे नमस्कारच अभिप्रेत आहे. या श्लोकाची व्याख्या करताना वंशीधराने जे म्हटले की, संपूर्ण भागवतात श्रीकृष्णाची स्तुती केली आहे. म्हणून श्रीकृष्णाला नमन करणे योग्य असूनही श्रीरामस्तुतीचे रहस्य हे आहे की, सर्व अवतारांमध्ये श्रीरामचन्द्र भागवतसमुद्रतरण करण्यास मला सहायक ठरतील. या दृष्टीने येथे श्रीरामचंद्राची स्तुती केलेली आहे. यावर गुलाबराव महाराज त्यांना विचारतात की, हे वंशीधर रामानुज संप्रदायाचे आहेत की चैतन्य संप्रदायाचे आहेत की शंकराचार्यांच्या सम्प्रदायाचे आहेत? ते कधी श्रीरामाची, कधी कृष्णाची, कधी गणपतीची स्तुती करतात. कधी शंकराचार्यांची निंदा करतात, तर कधी 'भाष्यकाराः' या बहुवचनी प्रयोगाने त्यांच्या प्रती आदर दर्शवितात. यामुळे ते उन्मत्त भासतात. संस्कृत भाषा जाणणारा विद्वान असून देखील सिद्धान्तावर संशय ठेवतात. श्रीराम स्मरणानेच संत भवसागर पार करतात, मग श्रीकृष्णाच्या स्मरणाने काय होते? जर श्रीरामाच्या चरणानेच भागवत समुद्र पार होत असेल तर मग गणेशाच्या स्मरणाने निर्विघ्न ग्रंथसमाप्ती होत नाही की काय? अथवा रामाच्या स्मरणाने भागवतसमुद्रात सेतुनिबंधन केले तर अरेरे संसारसागराप्रमाणेच भागवतसमुद्र आहे. त्याच्यात जो आप्लुत झाला त्याला नक्कीच दुःखप्राप्ती होईल. असो. भागवताला समुद्र म्हणणे याचा अर्थ 'भागवत' या अर्थास स्पष्ट करण्याचे सामर्थ्य दर्शविते. या शब्दांनी गुलाबराव महाराजांनी वंशीधराचे खंडन केले आहे.

यानंतर नमन, भजन, गाढालिङ्गन हे भक्तीच्या उद्रेकाने होणारे प्रेमाचे प्रकार आहेत. पहिला प्रकार 'नमन' आहे. ज्यात इन्द्रिय व विषय निवृत्त होतात. दुसरा प्रकार 'भजन' ते इष्टदेवतेच्या प्रती भक्तीने होते.

यानंतर नरसिंह मूर्तीची स्तुती करतांना श्रीधर व्याख्येत हा श्लोक आलेला



आहे.

'वागीशा यस्य वदने लक्ष्मीर्यस्य च वक्षसि ।
यस्यास्ते हृदये संवित्तं नृसिंहमहं भजे ।।'[201]

ज्याच्या मुखात वाणी, ज्याच्या हृदयावर लक्ष्मी आणि ज्याच्या हृदयात ज्ञान राहते त्या नृसिंहाचा आश्रय मी होतो. यावर व्याख्या करताना गुलाबराव महाराज म्हणतात की, श्रीरामचंद्राचे नमन, नरसिंह स्वामींचे सेवन आणि श्रीकृष्णाचे गाढ आलिंगन हीच प्रेमाची स्थिती आहे आणि दास्य, लालन, माधुर्य या प्रकारांनी भक्तीचे तीन भेद आहेत. त्यात श्रीरामाप्रती दास्य, नृसिंहाच्या प्रती लालन आणि श्रीकृष्णाप्रती माधुर्य भक्ती अशीच व्यवस्था आहे. तसे तर दास्य पक्व होते तेव्हा ते लालन होते व त्याने व्यक्तीरूप प्रेम होते. 'हनुमन्नाटकात' म्हटले आहे की शरीराच्या बुद्धीने मी दास आहे. जीवाच्या बुद्धीने मी तुमचाच अंश आहे आणि आपल्याच बुद्धीने आम्हा दोघांत कोणताच भेद नाही, असे हनुमान रामाला म्हणतो. इतिहासाच्या प्रमाणांनी गुह्यक, इ. दास्याचे, प्रह्लाद, इ. लालनाचे, राधिका, इ. माधुर्याचे उदाहरण आहे. येथे श्रीधरस्वामींनी दास्याच्या भावनेने श्रीरामाच्या प्रती नमन सांगितले. त्यानंतर नृसिंहाप्रती लालन प्रगट केले आणि त्यापुढील श्लोकापासून त्यांनी श्रीकृष्णाप्रती असलेल्या भक्तीचे वर्णन केलेले आहे. विष्णुप्रमाणे या श्रीधरालादेखील आपण नमस्कार करायला हवा.

'नरः' चा अर्थ आहे जीव व नारः = जीवसमूह. त्यांच्यात जो सिंहासारखा श्रेष्ठ आहे. तोच नित्य मुक्त, सर्वज्ञ, सर्वशक्तिमान्, एक, सर्वज्ञानसाक्षी नृसिंह आहे. तोच आपल्या अंशाच्या अर्थात् जीवाच्या उद्धाराकरिता आपल्याच लीलेने अवतार घेतो. वंशीधराच्या व्याख्येतून काही अंश ग्राह्य सुद्धा आहेत. 'मी प्रह्लादासारखाच ज्याचा अंश आहे त्या नृसिंहाचा आश्रय घेतो' या मूर्तीच्या खालच्या भागात मनुष्यरूप व ऊर्ध्व भागात सिंहरूप आहे. अर्थात् जीवच ईश्वर आहे. ही भावना यावरून प्रकट होते. ईश्वराच्या बुद्धीने 'लालन' करून त्याद्वारे भक्तीला एक एक उत्तम स्तरावर घेऊन जायला हवे. नाहीतर अनेक विघ्ने उत्पन्न

होण्याची शक्यता आहे, असे आचार्य मधुसूदन सरस्वतींचे म्हणणे आहे. त्यांच्यानुसार यात मधुराभक्तीने श्रीकृष्णासोबत ऐक्य सांगितले आहे.

यानंतर श्रीधरस्वामींच्या तिसऱ्या श्लोकावर गुलाबराव महाराजांचे व्याख्यान आहे. या श्लोकात श्रीधर स्वामी म्हणतात, जगत्, सृष्टी, इ. 9 लक्षणांनी युक्त श्रीकृष्णरूपी परमपदाला नमस्कार करतात. यावर व्याख्या करताना गुलाबराव महाराज म्हणतात, या श्लोकात श्रीधराने कृष्णाला सर्वफल मानलेले आहे. श्रीकृष्णाच्या स्वभावाचे स्फुरणच लीला म्हटली जाते. ती दोन प्रकारची असते, एक लोकलीला, जी भुक्ती आहे आणि दुसरी अलोकलीला, जी ज्ञानाच्या रूपात असते. हे ज्ञान सविशेष, निर्विशेष भेदाने दोन प्रकारचे असते. त्यापैकी सविशेषज्ञान ईश्वराच्या स्वरूपाचे असते तर निर्विशेष ब्रह्मस्वरूपाचे असते. ब्रह्माचे लक्षण तटस्थ आणि स्वरूप अशा दोन प्रकारचे असते. सृष्टीचे कारण असणे म्हणजे ब्रह्माचे तटस्थ लक्षण आणि सच्चिदानंद म्हणजे ब्रह्माचे स्वरूप लक्षण होय.

पहिल्या आठ सर्गांच्या माध्यमातून तटस्थ लक्षणाचे व अन्तिम दोन सर्गांच्या माध्यमाने स्वरूप लक्षणाचे वर्णन केले आहे. अनध्यस्त, आनंदरूपी कृष्ण आश्रय आहे. बन्ध, मोक्ष कल्पितच आहेत. परमपद विदेह मुक्तीत प्राप्य असते, तर जीवनन्मुक्तावस्थेत सेव्य असते.

नंतर गुलाबराव महाराजांनी भागवतव्याख्याता वोपदेवांचे मत दाखवून त्याचे खंडन केलेले आहे. वोपदेवांच्या मते विष्णुभक्तांना प्रपंचभान नसणे 'निरोध' होय आणि त्या अवस्थेत स्वरूप स्थितीच 'मोक्ष' म्हटली जाते. मुक्त झालेले लोक ब्रह्मस्वरूपात राहणे म्हणजे 'आश्रय' असे त्यांचे मत आहे. वोपदेवांचे शिष्य हेमाद्री हेच मान्य करतात.

गुलाबराव महाराजांच्या मतानुसार या दोन्ही व्याख्यात्यांनी भागवताचे प्रामाणिक अवलोकन केले नाही. ''निरोधस्यानुशयनमात्मनः सह शक्तिभिः''202



या श्लोकामध्ये 'निरोध' म्हणजे 'प्रलय' असे म्हटले आहे. श्रीधरीयव्याख्येत तसे स्वीकारले आहे. शास्त्र आणि युक्तीने हे असंगत आहे. प्रपंचाचा अभाव, निष्प्रपंच, स्वरूपलाभ आणि ब्रह्मरूपात राहणे हे सर्व पर्यायवाची शब्द आहेत.

हेमाद्री नावाच्या टीकाकाराने लीला आणि लीलावान् यांच्या अभेदाची आशंका करून रज्जुसर्पदृष्टान्ताने त्याचे समाधान केले आहे. पण गुलाबराव महाराजांच्या मते ते अयोग्य आहे. आश्रय रज्जुसर्पाप्रमाणे कल्पित झाला तर ब्रह्मही कल्पित होईल. मग शून्यवाद येण्याचा प्रसंग आहे. अन्यथा श्रीकृष्णाची लीला दहा प्रकारची आहे या प्रतिज्ञेला हानी पोहोचेल.

यदुनाथ आणि व्रजेश्वर या नावांनी श्रीकृष्ण दोन प्रकारचा आहे. यासाठी 'पद्मपुराण' आणि 'यामलतन्त्र' प्रमाण आहेत. यदुनाथ जगाचा आश्रय आहे तर व्रजेश्वर परम स्थान आहे. श्रीकृष्ण या समासाचे विग्रहवाक्य करताना ''श्रीः श्रीः श्रीः श्रीः'' असे करून यांचा एकशेष केल्याने 'श्रीसहितः कृष्णः' असा अर्थ निघतो किंवा 'श्री' शब्दाचा अर्थ राधा असा आहे. म्हणून कृष्णाला 'श्रीकृष्ण' म्हणतात. वृन्दावनात सतत जी श्रीकृष्णाची सेवा करते ती 'राधा' होय– हे नारदीय वाक्य आहे. वंशीरवाने गोपींचे हृदय आकृष्ट करतो म्हणून 'कृष्ण' म्हटला जातो. अशाप्रकारे 'राधा' आणि 'कृष्ण' शब्दांचे व्याख्यान दिलेले आहे.

गुलाबराव महाराज म्हणतात की, श्रीकृष्ण स्वयं भगवंताच्या रूपात राहतो. त्याला नमस्कार केला पाहिजे. या श्लोकात 'यत्' शब्द नसताना सुद्धा तत् शब्दाने केलेला प्रयोग चुकीचा नाही. कारण 'तत्त्वमसि', 'तत्सत्', इत्यादी श्रुति–स्मृतिंमध्ये 'तत्' शब्दाचा अर्थ 'ब्रह्मच' स्वीकारलेला आहे. म्हणून 'यत्' शब्दाची अपेक्षा नाही.

'असमर्थ यत् तदर्थं कथ्यते न च तत्र अस्य शक्तिः ।'[202अ] 'जेव्हा तत् शब्दाने प्रसिद्धार्थाचा उल्लेख केला जातो तेव्हा यत् शब्दाची अपेक्षा नसते', असे काव्यप्रकाशात म्हटलेले आहे. कुमारसंभवातही 'कला च सा कान्तिमती कलावतः ।' म्हणून केलेला प्रयोग यासाठी प्रमाण आहे.[202ब]

पुराणाची दहा लक्षणे सांगितलेली आहेत आणि येथे श्रीकृष्णाची नऊ लक्षणे सांगितलेली आहेत. ते कसे योग्य आहे? या प्रश्नाला उत्तर देताना गुलाबराव महाराज म्हणतात, त्या ग्रंथानुसार 10 लक्षणे असूनसुद्धा 10 वे तर स्वयं श्रीकृष्ण लक्ष्याच्या रूपात आहे. म्हणून भागवताच्या दुसऱ्या स्कंधाच्या दहाव्या अध्यायात,

'दशमस्य विशुद्ध्यर्थं नवानामिह लक्षणम् ।
वर्णयन्ति महात्मानः श्रुतेनार्थेन चांजसा ।।'[203]

असे म्हटले आहे. पत्नी धर्माचरणात दासीप्रमाणे असली पाहिजे, अर्थसंपादनात सखी प्रमाणे असली पाहिजे, कामभोगात त्याच्या समान असली पाहिजे, असे म्हणून येथे श्रीधरस्वामींनी नमस्कार केलेला आहे. भार्या मुग्धा, मध्या, प्रौढा अशी तीन प्रकारची असते. त्यात मुग्धा प्रणाम करते, मध्या सेवा करते तर प्रौढा आलिंगन करते. या श्लोकात श्रीधरमुनी मुग्धभावाने आपल्या प्रिय श्रीकृष्णाला नमस्कार करीत आहे.

यानंतर श्रीधरस्वामींच्या चतुर्थ श्लोकावर गुलाबराव महाराज व्याख्या करतात. श्रीकृष्णाच्या मधुरप्रेमात आनंदाचा विलास होण्याची शक्यता आहे. त्यात वैराग्याची हानी होऊ नये या दृष्टीने शंकराचा आश्रय घ्यावयास हवा. परंतु केवळ वैराग्याने 'रसास्वाद' नावाचे विघ्न उत्पन्न होईल. म्हणून श्रीकृष्णाचा आश्रय घ्यावयास हवा कारण हे दोघे वस्तुतः एकच आहेत. यानंतर गुलाबराव महाराज म्हणतात की, मधुवंशात जन्म घेतला म्हणून 'माधव' आहे किंवा मा – अर्थात् प्रकृती पासून 'धुनोति' अर्थात् दूर करतो म्हणून 'माधव'. शिव आणि कृष्ण दोघेही ईश्वरच आहेत. कोणीच जीव नाही. याला जीव मानणे पाप आहे. म्हणून पुराणांच्या आधारे शिवकेशवांमध्ये अभेद मानणे योग्य आहे. वैष्णव विष्णूत, शैव शिवात तोच धर्म पाहतात. सांख्यदर्शनात आणि योगदर्शनात सांगितलेल्या सिद्धींचे निर्माता हे दोघे आहेत. एकच परमेश्वर दोन रूपे धारण करतो. काही आगमांमध्ये शिवाला कृष्णपत्नी म्हटले आहे आणि काही भागांमध्ये कृष्णाला शिवपत्नी म्हटले आहे.



म्हणून शिवकेशव परस्पर भक्ती करतात. एकाच्या भक्तीने दुसरा अनुग्रह करतो. शैवांमध्ये विष्णूला नमस्कार, वैष्णवांमध्ये शिवाला नमस्कार करायला हवा. जर कुणी असे म्हटले की, शिव व विष्णू समान आहेत किंवा त्यात विष्णू श्रेष्ठ आहे, तर ते अप्रामाणिक आहे. शिव पिता आहे तर श्रीकृष्ण पती आहे. श्रीकृष्ण माता आहे तर शिव पती आहे. हा पूर्वजांचा विचार श्रेष्ठ आहे. कृष्णभक्तीत शिव गुरु आहे. शिवभक्तीत कृष्ण गुरु आहे. अशाप्रकारे परमेश्वराच्या प्रती भक्ती करणारा मोक्षमार्गात पुढे जातो. म्हणून मी ज्ञानेश्वराला स्वामी मानले. शंकराला पिता मानले, श्रीकृष्णाला पती मानले या व्याख्येसोबत मधुराद्वैतानुसार ज्ञानेश्वराच्या कृपेने लिहिलेली चतुःश्लोकी व्याख्या समाप्त झाली आहे.

श्रीधरस्वामींनी आरंभी चार मंगल श्लोकांद्वारे जे परमेश्वराचे नमन केले आहे, त्यावर आपल्या व्याख्येला गुलाबराव महाराज ती 'चतुःश्लोकीव्याख्यान' असे म्हटले आहे. त्यानंतर पाचव्या श्लोकापासून पुढचे व्याख्यान केले आहे. आरंभी श्रीधरस्वामींनी म्हटले आहे की, संप्रदायानुसार पूर्वापार विमर्शासोबत श्रीभागवतावर 'भावार्थदीपिका' नामक व्याख्या रचलेली आहे. यावर गुलाबराव महाराज म्हणतात की, जर नशिबाने मत्स्येन्द्र, इ. शिष्यांना जे सांगितले आणि जे महाविष्णूने ब्रह्माला सांगितले आहे, तेच शंकराचार्य व इतर आचार्यांनी परंपरेने प्राप्त करून मधुराभक्तीने युक्त ज्ञानाला स्पष्ट केले आहे. हेच 'भावार्थदीपिका' व्याख्येत आहे. बाकी टीका केवळ शब्दांचा विग्रह करणारी आहे. परंतु श्रीधरस्वामींची व्याख्या भक्तांनी हृदयात ठेवली पाहिजे. त्यानंतर वंशीधर व्याख्यानाचे खंडन केले आहे. त्यांनी म्हटले आहे की, संप्रदायानुसार अर्थात भक्तिमार्गाचा उपदेश करणाऱ्यांचे भागवतव्याख्यान परंपरेनुसार, श्रीशंकराचार्यासारखे केवळ ज्ञाननिरूपणानुसार नाही. अर्थात् श्रीशंकराचार्यांच्या संप्रदायानुसार श्रीधर स्वामींचे व्याख्यान राहणार नाही. यावर गुलाबराव महाराज म्हणतात की, जसे जो रसिक नाही अशा व्यक्तीला कवित्व ऐकविण्याचे कष्ट माझ्या भाळी लिहू नका. तसेच मूर्खांच्या मताचे परीक्षण माझ्या गळी टाकले आहे, अशी वंशीधर

नामक कोणी मूर्ख व्यक्ती आहे ज्यांनी श्रीशंकराचार्यांच्या सिद्धांताला व्यवस्थित जाणलेले नाही. श्रीशंकराचार्यांनी ज्ञानोत्तर भक्तीचे वर्णन केलेले आहे. 1) देवी अपराधक्षमापनस्तुती 2) शिवभुजंगस्तोत्र 3) षट्पदीस्तोत्र ही काही उदाहरणे आहेत, ज्यांच्यात श्रीशंकरायार्चांनी ज्ञानोत्तर भक्तीचे निरूपण केले आहे. हे ग्रंथ असतांना शंकराचार्यांचा संप्रदाय केवळ ज्ञानमात्र आहे असे म्हणणे हास्यास्पद आहे आणि वंशीधराने स्वयं 'वेदस्तुती' टीकेत यालाच प्रमाण मानले, तरीसुद्धा शंकराचार्यांच्या भक्तीचा निषेध करणे हास्यास्पद आहे. तसे तर श्रीधरस्वामींच्या पाचव्या श्लोकात जो 'संप्रदाय' शब्द आहे तो भक्तिज्ञानयुक्त 'भागवत संप्रदाय' आहे.

समाधिस्थितीत मीच ईश्वर असल्याने या जगावर अनुग्रह करण्यास मी समर्थ आहे. व्युत्थान अवस्थेत ही रचना करण्याचा प्रयत्न केल्याने माझ्यात कर्तृत्वबुद्धी येते. तसे तर समाधीचा अनुभव व्युत्थानात सांगितला जाऊ शकत नाही. हे भागवतावर समाधीच्या अर्थासारखा आहे. समाधी स्थितीचा अर्थ 'वेद' असा होतो. तर व्युत्थान दशेत त्याचे स्मरण हीच स्मृती आहे. म्हणून श्रुतीचा समन्वय श्रुतीने करणे योग्य आहे, स्मृतीने नव्हे आणि समाधीस्थितीत हा 'अहम्', 'ब्रह्म' बनतो. व्युत्थान दशेत निरंहकार होतो. येथे भगवानच समाधीच्या अर्थाचा प्रकाशक आहे. हे दर्शविताना श्रीधरस्वामींनी भक्तीचे वैभव प्रदर्शित केले आहे. व्युत्थान दशेत जीव परमेश्वराचा दास असतो. हा उत्तम अभिप्राय आहे. भगवान परमेश्वर स्फोटरूपी असोत अथवा अक्षररूपी असोत शब्दांद्वारा उत्तम शिष्याला अर्थाचे ज्ञान करवून देतो. त्यात जीवाचा स्वतःचा कोणता उपाय राहत नाही. स्वयं प्यायलेल्या दुधाचे माधुर्य श्रीकृष्ण स्वयं सांगू शकत नाही. म्हणून उत्तम शिष्यात अर्थाचे ज्ञान तेच वाढवितात. भौतिक वाणी समाधीच्या अनुभवातून उत्पन्न अर्थाला सांगू शकत नाही. म्हणून परमेश्वर आपल्या शक्तीने स्वतः त्यांना सांगतात. त्या परमार्थाच्या ज्ञानाबाबत जीव असमर्थ आहे. म्हणून योग्य गुरू त्याला ज्ञान देतात. प्रमाद, इ. जे काव्यात दिसतात ते जीवाचे दोष आहेत, ईश्वराचे नाही



आणि जे ज्ञान, इ. गुण काव्यात दिसतात ते ईश्वराचे आहेत, जीवाचे नाहीत. त्या समाधीच्या अर्थाची प्राप्ती व्हावी यास्तव सरस्वती माझ्या वाणीत त्या अर्थाला स्थापित करो आणि परमेश्वर दयाळू होऊन माझी क्षुधा, पिपासा दूर करो. तेव्हा मी निर्विघ्न होऊन, चिंतारहित होऊन त्या परमेश्वराला नमन करीन. त्यांच्या कृपेने ज्ञानरूपी समुद्राचे मंथन सहजरीत्या संपन्न होईल, जसे त्याच्या अनुग्रहाने वानरांनी समुद्रावर सेतु निर्माण केला व त्यानंतर त्याच सेतूवरून प्रभू रामचंद्राने समुद्र पार केला. तसेच माझ्या या वाक्‌रूपी यज्ञाने कृपाळू परमेश्वर प्रसन्न होवो.

अभिमत –

श्रीमद्‌भागवतावर अनेक व्याख्या लिहिल्या गेल्यात. त्यात 'श्रीधरीयव्याख्या' प्रामाणिक मानली जाते. बाकी व्याख्यांमध्ये वंशीधर, हेमाद्री इ. च्या व्याख्याही प्रकाशित आहेत. या ग्रंथात गुलाबराव महाराजांनी जे विचार सांगितले आहेत. त्यावरून हे स्पष्ट होते की, त्यांना श्रीधरस्वामींप्रती अत्यंत आदर आहे आणि भागवतासारख्या परमप्रामाणिक ग्रंथावर भक्तिज्ञान संप्रदायानुसार प्रामाणिक व्याख्या लिहिल्याने श्रीधरस्वामी धन्य आहेत. भागवत ही व्यासांची समाधिभाषा असल्याने वाच्यार्थ देखील समजणे अवघड आहे. पण श्रीधराचार्यांनी गूढार्थ देखील सोपा करून आपल्या भावार्थदीपिकेने प्रकाशित केला आहे. या टीकेचे वैशिष्ट्य असे आहे की, शंकराचार्यांचे केवलाद्वैत यत्किंचितही न सोडता भक्तांच्या परमप्रेमरूपा भक्तीचे प्रतिपादन यात केले गेले आहे. महाराज म्हणतात, ''स्वज्ञानशुद्धये'' मी श्रीधराचार्यांचे उच्छिष्ट भक्षण करतो. त्याने मला जे बळ मिळेल त्याच्या जोरावर द्वैतवाद्यांच्या मतांचे युक्तिपूर्वक आणि पूर्णपणे मी निराकरण करीन.

गुलाबराव महाराज म्हणतात की, श्रीरामचंद्राच्या सेवेने भक्ती उत्पन्न होते आणि श्रीरामभक्तीनेच श्रीकृष्णाप्रती भक्ती वाढविली पाहिजे. याच दृष्टीने श्रीधरस्वामींनी आपल्या व्याख्येच्या आरंभी श्रीरामचंद्राना नमन केले आहे. श्रीरामभक्तीने ज्ञान, श्रीकृष्णभक्तीने आनंद प्राप्त होतो. नमन, भजन, गाढालिंगन

अशा प्रेमाच्या प्रकारात श्रीधरस्वामींनी स्वयं दास होऊन श्रीरामांना नमन केले आहे. तेथे 'आस्वादित' या शब्दाचा प्रयोग आहे. आ म्हणजे ईषत् म्हणजेच थोडा, असा अर्थ करून महाराजांनी रामावताराची मर्यादा व कृष्णावताराचे पूर्णत्व सूचित करून रामचंद्राचे पूर्ण सेवन कृष्णावतारातच पूर्णरूपाने होऊ शकते असा अर्थ विशद केला आहे.

श्रीधराचार्यांनी प्रथम रामाला, नंतर नरसिंहाला व शेवटी श्रीकृष्णाला नमन केले आहे. त्यात नमन रामाला, भजन म्हणजे सेवा नरसिंहाची व गाढ आलिंगन श्रीकृष्णाला अशी भक्तीची चढती पायरी दाखविली आहे.

यानंतर गुलाबराव महाराजांनी 'नृसिंहतत्त्व' स्पष्ट केले आहे आणि हे ही सांगितले की, भागवताच्या आरंभीच्या 8 सर्गांमध्ये परमेश्वराचे तटस्थ लक्षण व त्यानंतरच्या 2 सर्गांमध्ये स्वरूप लक्षण सांगितले आहे. प्रसंगावशात राम, कृष्ण, श्री, इ. शब्दांची व्युत्पत्ती त्यांनी दर्शविली आहे. जशी मुग्धा पत्नी आपल्या पतीला नमस्कार करते तसे श्रीधरस्वामी मुग्धभावाने श्रीकृष्णाला नमस्कार करतात.

'भार्या धर्मे भवेत् दासी सखी चार्थे सुखे समा ।

माधुर्ये दास्यभावाच्च नमनं कृतवान्मुनिः ।।

मुग्धा मध्या तथा प्रौढा भेदाद् भार्या त्रिधाऽथवा ।

तत्र मुग्धा प्रणमति मध्या वै भजते प्रियम् ।।

गाढमालिंगति प्रौढा माधुर्येऽत्र मुनिस्त्वतः ।'[204]

असे रसपूर्ण काव्यात्मक वर्णन महाराजांनी रेखाटले आहे. पण यासोबतच ज्ञानवैराग्यासाठी शंकराची सेवा करावी व रसास्वाद उठू नये म्हणून कृष्णभक्ती करावी असा निर्णय दिला आहे.

चतुर्थ श्लोकाच्या व्याख्येत गुलाबराव महाराजांचे विचार अत्यंत ग्राह्य आहेत. या श्लोकात श्रीधरस्वामींनी विष्णू व शिव या दोघांना वंदन केले आहे.



गुलाबराव महाराज म्हणतात, केवळ भक्तीत आनंदाचा विलास असल्याने वैराग्य नष्ट होऊ शकते म्हणून शिवापासून वैराग्य प्राप्त करायला हवे. परंतु केवळ वैराग्याने रसास्वाद होणार नाही. श्रीकृष्णाचा आश्रय घ्यायला हवा. यथार्थाने शिव व विष्णू एकच आहेत. त्यांच्यात भेद करू नये. शैवांनी विष्णूची वैष्णवांनी शिवाची पूजा करण्याला हवी. काही आगमांमध्ये म्हटले आहे की, शिव श्रीकृष्णाची पत्नी आहे, तर काही आगमानुसार श्रीकृष्ण शिवाची पत्नी आहे. म्हणून गुलाबराव महाराजांनी स्वयं परमेश्वराला पिता मानले व श्रीकृष्णाला पती मानले.

या व्याख्येने प्रमाण व तर्काच्या आधारे गुलाबराव महाराजांनी शिवकेशवांचा अभेद स्थापित केला आहे. पाचव्या श्लोकात 'संप्रदाय' शब्दावर व्याख्या करताना वंशीधराने श्रीशंकराचार्यांवर जे व्याख्यान केले आहे, त्याचे खंडन करतांना गुलाबराव महाराजांनी शंकराचार्यांप्रती आपला आदर प्रकट करीत श्रीधरीय हृदयाचा आविष्कार केला आहे. याप्रसंगी 'संप्रदाय' याचा अर्थ भागवत संप्रदायच आहे. जो भक्ती व ज्ञानाने समन्वित आहे, असे महाराज म्हणतात.

'भागवत' समाधीचा अर्थ असल्याने जागृतावस्थेत त्याचा अर्थ सांगणे शक्य नाही. समाधीत अनुभव केलेला अर्थ म्हणजे वेद. जागृतावस्थेत त्याचे स्मरण केवळ स्मृती आहे. तरी सुद्धा परमेश्वरच उत्तम शिष्यांमध्ये ते सामर्थ्य देतो ज्यामुळे ते भागवताचा अर्थ समजू शकतात. भौतिक वाणीत ते सामर्थ्य नसल्याने भागवत समजण्याचे सामर्थ्य ईश्वरानेच दिले आहे असे गुलाबराव महाराज म्हणतात.

14. बालवासिष्ठम्

'बालवासिष्ठम्' नावाच्या या ग्रंथाच्या सर्गान्त गद्यावरून कळते की, हा ग्रंथ चम्पूशैलीत लिहिलेला आहे. या ग्रंथाच्या आरंभी दोन प्रकरणे आहेत. त्यानंतर तिसऱ्या प्रकरणात आठ सर्ग आहेत. अशा रूपात हा ग्रंथ संपूर्ण उपलब्ध आहे. यात आलेल्या तीन प्रकरणांची नांवे व तृतीय प्रकरणातील आठ सर्गांची नावे खालीलप्रमाणे आहेत.

| | | |
|---|---|---|
| प्रथम प्रकरण | – | संक्षेप |
| द्वितीय प्रकरण | – | वैराग्यम् |
| तृतीय प्रकरण | – | मुमुक्षुव्यवहार |
| प्रथम सर्ग | – | कौशिकवाक्य |
| द्वितीय सर्ग | – | भयोभूयः सर्गकथनम् |
| तृतीय सर्ग | – | प्रयत्नापेक्षावर्णनम् |
| चतुर्थ सर्ग | – | स्वभाव – यदृच्छानिराकरणपूर्वकं पौरुष्योपदेशः |
| पंचम सर्ग | – | कालखण्डनपूर्वकपौरुष्योपदेशः |
| षष्ठ सर्ग – | | दैवनिराकरणपूर्वकपौरुषोपदेशः |
| सप्तम सर्ग | – | पौरुषस्थापनम् |
| अष्टम सर्ग | – | दैवीसंपन्निरूपणपूर्वकमनुबन्धचतुष्टयकथनम् |

गुलाबराव महाराज सर्गान्ती लिहितात,

"श्रीमत् सद्‌गुरुज्ञानेश्वरकृपाप्रसादेचम्पूबद्धे श्रीरामगुरोश्चरणरजःसेवायां दैवीसम्पन्निरूपणपूर्वकं अनुबन्धचतुष्टयकथननाम–अष्टमः सर्गः ।"[205]

'उमा माता पिता शंभुर्गुरुर्ज्ञानेश्वरो महान् ।



पतिः कृष्णो राधिकाद्या भगिन्यो गोपिका मम ।।'

'पञ्चायतनमित्येतद् हृद्यास्थाप्य प्रपूज्य च ।

वसिष्ठादीन् गुरून्नत्वा मधुरं किंचिदुच्यते ।।'[206]

या मंगलाचरणानंतर वसिष्ठादि गुरुंना नमस्कार करून "ब्रह्मसत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नापरः"[207] या प्रसिद्ध वेदान्तवाक्याच्या विवेचनाला गुलाबराव महाराजांनी सुरूवात केली आहे.

संक्षेपप्रकरण –ष्संक्षेपप्रकरण' नावाच्या पहिल्या प्रकरणात ब्रह्मच अविद्येने जीव बनतो. यात ही अविद्या अनादि असून ज्ञानाने नष्ट होणारी आहे. ती अविद्या चित्ताच्या रूपात बदलून जगताच्या रूपात भासमान होते. म्हणून मन हीच अविद्या असे 'विवेकचूडामणि' या ग्रंथात म्हटले आहे. "नह्यस्त्यविद्या मनसोऽतिरिक्ता मनो ह्यविद्याभवबंधहेतुः"[208] अशाप्रकारे पिंडाच्या दृष्टीने शरीर, मन, आत्मा तर ब्रह्मांडाच्या दृष्टीने दृश्य, अविद्या व ब्रह्म असे तीन पदार्थ ब्रह्मज्ञानाकरिता घेतले जातात. या तिघांमध्ये शरीरादींचा विचार योग्य नाही. तो परिणामी जड आणि तुच्छ आहे. तसेच आत्मा किंवा ब्रह्माचाही विचार योग्य नाही. कारण ते सर्व विचारांचे फळ आहे. म्हणून प्रथम मायारूपी चित्ताचाच विचार करणे योग्य आहे. यानंतर गुलाबराव महाराज चित्ताचे स्वरूप स्पष्ट करतात.

1. अशुद्ध चित्ताचा परिणाम दृश्यप्रपंच.

2. अन्तःसुख, शुद्ध आणि आत्मगोचर चित्ताचा परिणाम ज्ञान.

मनाचा पहिला परिणाम दुःख देतो तर दुसरा परिणाम मोक्ष देतो. 'मन एव मनुष्याणां कारणं बन्धमोक्षयोः ।'[209] इ. श्रुतिवाक्ये आहेत. तेव्हा पहिल्याचा नाश, दुसऱ्याची वृद्धी करण्याकरिता योगवासिष्ठानुसार उपाय या ग्रंथात सांगितलेले आहेत.

प्रकरणाचा संक्षेप खालीलप्रमाणे आहे.

1.जेव्हा मन प्रसन्न होते तेव्हा दुःख, शोक, इ. ला दूर करू इच्छिते हे गुरुशिवायही होते. हा सर्व 'वैराग्य' प्रकरणाचा विषय आहे.

2.वैराग्य प्राप्त झाल्यावरसुद्धा मनाचे वैकल्य नष्ट करण्याकरिता आणि ब्रह्मज्ञानासाठी प्रयत्न वाढवितांना गुरुमुखातून उपदेश घेणे हा 'मुमुक्षु व्यवहार' प्रकरणाचा विषय आहे.

3. शिष्याच्या विचारण्यावरून 'हे सर्व विश्व तुमच्या मनाचा परिणाम आहे. मनोनाशाने हा सुद्धा नष्ट होतो.' असा गुरुचा उपदेश हे 'संक्षेप' प्रकरण आहे.

4. सर्व प्रकरणाचा सारांश असा आहे की, वृत्ती ज्याची उपाधी आहे तेच चैतन्य हे विश्व आहे. जोपर्यन्त वृत्ती आहे तोपर्यन्त विश्व आहे. वृत्तीच्या नाशाने विश्व नष्ट होते. असा सर्व प्रकरणाचा सारांश पहिल्या प्रकरणात सांगून पुढे एकेका प्रकरणाचे विवेचन महाराज करतात.

वैराग्यप्रकरण –दुसऱ्या प्रकरणाचे नाव 'वैराग्य' प्रकरण आहे. यात चित्ताचे अनेक प्रकार, शुद्ध व अशुद्ध चित्ताचे लक्षण, त्यांच्या नाशाचे साधन इ. चे विवेचन आहे. या प्रकरणारंभी परमात्म्याचे नमस्काररूप मंगलाचरण केले आहे. तर यावर गुलाबराव महाराज विचार मांडतात की, 'येथे परमात्मा शब्दाचा कोणता अर्थ घ्यायला पाहिजे? ब्रह्म, जीव की सृष्टी. ब्रह्म शुद्ध असल्याने, जीव अविद्या बंधनात असल्याने आणि सृष्टी जड असल्याने त्यांना नमस्कार करणे सुसंगत होणार नाही म्हणून येथे परमात्मा शब्दाने 'गुरु' हाच अर्थ योग्य आहे. यद्यपि ज्ञान प्राप्त झाल्यानंतर गुरूची अपेक्षा नाही असे म्हणतात, तरीसुद्धा दृष्टिसृष्टिवादातही गुरूची अपेक्षा असणे हे अमृतानुभवामध्ये ज्ञानेश्वरांचेही मत आहे म्हणून सद्गुरुच या शास्त्रामध्ये परमात्मा आहे.'

'तातास्तु ब्रह्मज्ञानानन्तरमपि गुरोरपेक्षास्तीति अमृतानुभवे वदन्ति ।'[210]

श्रीरामचन्द्र दुःख आणि क्लेश पाहून विरक्त होऊन एकान्तात राहण्याची इच्छा करीत होते, तेव्हा राजा दशरथ ते पाहून चिन्ता व्यक्त करतात. तेव्हाच



यज्ञरक्षणासाठी श्रीरामांना घेऊन जाण्याकरिता विश्वामित्र त्यांच्याजवळ येतात. तेव्हा श्रीरामाचे वैराग्य बघून विश्वामित्र श्री रामाजवळ जाऊन त्यांच्या वैराग्याचे कारण विचारतात. तेव्हा श्रीराम म्हणतात, ''बाल्य, इ. अवस्थांमध्ये भोग म्हणून सुखाकरिता लोक जे काही करतात त्यात दुःखच आहे. कुणीसुद्धा यथार्थ सुखाला जाणत नाही. अज्ञान हेच सर्व दुःखांचे कारण आहे आणि ज्ञानानेच अज्ञान दूर होते. तर हे अज्ञान कशाने दूर होईल ज्ञानाने की भक्तीने?'' असे विचारल्यावर विश्वामित्र महर्षी श्रीरामचन्द्रांना शुकमहर्षींच्या कथेच्या माध्यमातून मुमुक्षुव्यवहार सांगतात. शुकमहर्षी अत्यंत विरागी होऊन व्यासमहर्षींना जेव्हा विचारतात की, ''ब्रह्मज्ञान म्हणजे काय? आणि जे मी प्राप्त केले तेच ब्रह्मज्ञान आहे काय?'' तेव्हा व्यासमहर्षी त्यांना जनक राजाजवळ पाठवितात. तेव्हा जनक महाराजसुद्धा 'तेच ब्रह्मज्ञान आहे' असा निश्चय करतात आणि 'ज्ञानच अज्ञानाचे नाशक आहे', असे स्पष्ट करतात. हे सांगितल्यानंतर, अज्ञानानेच ही सृष्टी वारंवार होते. त्यात व्यास, इ. अनेक महर्षी होत असतात असे सांगतात.

हे ऐकून श्रीरामचन्द्र विचारतात की, 'आपल्याला आपल्या कर्मांनी सुखदुःख मिळतात किंवा परमेश्वरापासून की स्वभावाने?' यावर व्यासमहर्षी त्यांना सत्य सांगतांना म्हणतात की, 'अज्ञानानेच सुखदुःख होतात आणि त्याच अज्ञानाने ईश्वरावर अनेक गुणांचा आरोप होतो. जेव्हा जीव प्रयत्न करतो तेव्हा ईश्वर केवळ अनुमोदन करतो म्हणून ईश्वर जीवाच्या प्रयत्नापेक्षा विश्वव्यवहार चालवितो. जीवात मिथ्याज्ञानातच तंत्राला प्रेरित करतो.'

हे सांगून वसिष्ठ महर्षी जीवाच्या सुखदुःखाचे कारण स्वभाव किंवा यदृच्छा नाही, तर जीवाचे आपले यत्नही आहेत असे म्हणतात.

चतुर्थ सर्गात तर्कदृष्टीने स्वभाव किंवा यदृच्छा यांचे खंडन करून प्राचीनांच्या जडवादाचेही निराकरण करतात. प्रयत्नाचे महत्त्व प्रतिपादित करतात.

पंचम सर्गाच्या आरंभी आपल्या फलाचे कारण काल हे नसून स्वयं केलेला

प्रयत्नच कारण आहे हे स्पष्ट केलेले आहे येथे गुलाबराव महाराज तर्कसंग्रहात दिलेले कालाचे लक्षण 'अतीतादिव्यवहारहेतुः कालः ।'[211] याचे खंडन करून काळाचे लक्षणही होऊ शकत नाही हे दर्शवितात. ज्ञानरूपी ब्रह्मालासुद्धा 'काळ' म्हणू शकत नाही. कारण ब्रह्मात तीनही काल बाधित होतात. गुलाबराव महाराज म्हणतात, जोपर्यंत जीवभावना आहे तोपर्यंत काल व दिशेचे भान असते. काळाच्या अस्तित्वासाठी कोणतेच प्रमाण नाही. 1. शब्दादिगुण न राहिल्याने प्रत्यक्ष प्रमाण नाही. 2. कार्याहून काळाचा अनुमान करण्याचा क्रमसुद्धा चुकीचा आहे. कारण कार्य व काळ या दोघांमध्ये अन्योन्याश्रय दोष आहे. अशाप्रकारे लक्षण आणि प्रमाण दोघांनीही काळाचे निरूपण होऊ शकत नाही.

जर काळरूपी पदार्थाला मानले तरीसुद्धा तो जड आहे की चेतन असा प्रश्न निर्माण होईल? तो जड होणार नाही आणि जर त्याला चेतन म्हटले तर तो ईश्वराहून भिन्न उपलब्ध नसल्याकारणाने तेही शक्य नाही. अनुभवातसुद्धा काळ सापेक्ष दिसून येतो. ज्योतिषशास्त्रातदेखील ग्रहशांती, इ. करिता काळाचा व्यवहार आहे. योगदर्शनातदेखील प्राणायाम, इ. ने आयुष्य वाढविण्याचा क्रम आहे. अशाप्रकारे काल सापेक्षिक आहे.

चरकसंहितेत आयुष्याच्या स्पष्टीकरणासंदर्भात सांगितले आहे की, आयुष्य नियत नसते. चांगल्या उपचारांनी जीवन बनते आणि त्याच्या विपरीत आचरणांने मृत्यू येतो. युगानुसार काळाचे स्वरूप बदलत असते. कृतयुगात दीर्घायुषी महर्षी होते. त्रेतायुगात लोभ, इ. वाढल्यामुळे आयुष्य कमी झाले. पुढे व्याधी, इ. वाढल्यामुळे आयुष्य आणखी कमी कमी होत गेले. हे चरकसंहितेतच सांगितलेले आहे. याच्या समर्थनार्थ गुलाबराव महाराजांनी चरकसंहिता, महाभारत, इ. ग्रंथांमधील श्लोक उद्धृत केले आहेत. काळाच्या खंडनासाठी गुलाबराव महाराज म्हणतात, कर्म कालसापेक्ष नसून, चैतन्यावर आधारित आहे. म्हणून मनुष्याला आपल्या प्रयत्नांनी काळाला जिंकून शांत, परमसुख प्राप्त करायचे आहे.



यानंतर 'दैवनिराकरणपूर्वकपौरुष–उपदेश' नावाच्या सहाव्या सर्गात केवळ दैवावर आधारित न राहता मनुष्याला आपले प्रयत्न करायला हवेत असे प्रतिपादित केले आहे. काही लोक भाग्यानेच सर्व काही होते. तोच भगवान आम्हाला मोक्ष प्रदान करतो, इ. म्हणतात. याच्या समर्थनार्थ गुलाबराव महाराज म्हणतात की, प्रत्येक विषयात भाग्य हेच फळ देत असल्याने ज्ञानाने किंवा मनुष्याच्या प्रयत्नाने फळ मिळत नाही. समुद्रमंथनातून विष्णूला लक्ष्मी प्राप्त झाली. हे सर्व भाग्यानेच होते. त्या भाग्यानेच ब्रह्माला ब्रह्मांडरूपी भांड्याचा कुंभार बनविले आहे. विष्णूला दशावतार घ्यावे लागले, परमशिवाला भिक्षाटन करावे लागले आणि सूर्य नेहमी भ्रमण करीत असतो.[211अ] म्हणून भाग्यच सर्वश्रेष्ठ आहे, असे म्हणणाऱ्यांचा विचार न स्वीकारता गुलाबराव महाराज या सहाव्या सर्गात यावर विचार करतात.

भाग्य म्हणजे काय?

1. ती ईश्वराची रचना आहे काय?

2. देवतांचे कर्म आहे काय?

3. आपल्या पूर्वजन्मीचे संचित कर्म आहे काय?

भाग्य ही ईश्वराची रचना असू शकत नाही. कारण यांत सर्व दोष येतात आणि देवता सात्त्विक असल्याने द्वितीय पर्यायसुद्धा योग्य नाही आणि पूर्वजन्म कर्मांना भाग्य म्हणू शकत नाही. कारण पूर्वजन्माचे कर्म अपरजन्मात दूर केले जाऊ शकते. म्हणून जेव्हा महर्षी भाग्याची प्रशंसा करतात तेव्हा 'मिथ्या विषयांमध्ये आसक्ती ठेऊ नका' एवढेच त्याचे तात्पर्य आहे.

कर्मात कोणते कर्म भाग्य शब्दांनी सांगितले जाते?

1. संचित की 2. आगामी किंवा 3. प्रारब्ध

संचित कर्माला भाग्य म्हणू शकत नाही, कारण ज्ञानाने संचित कर्माचा नाश होतो. आगामी कर्मांचाही ज्ञानाने नाश होतो. ज्ञान झाल्यानंतरही संचित,

आगामी कर्मांचा स्पर्श होणे असंभव आहे. तिसरे जे प्रारब्ध आहे त्याविषयी हे म्हटले जाते की, हे प्रारब्ध हे प्रयत्नांनी नष्ट केले जाऊ शकते. विवेकचूडामणिमध्ये सुद्धा आचार्यांनी हे सांगितले की, ज्ञानानंतर प्रारब्ध राहत नाही.[211ब]

जरी मुक्त अवस्थेत प्रारब्ध नाही तरीसुद्धा मुमुक्षुदशेत प्रारब्ध दूर करण्याकरिता प्रयत्न करावा लागतो. विद्यारण्य स्वामींनीदेखील हेच विचार प्रतिपादित केले आहेत. यत्न सोडून भाग्याचे आलंबन करण्याचा विचार युक्तिसिद्ध नाही. कारण ते भाग्यसुद्धा प्रयत्नाशिवाय फल देत नाही. जर प्रयत्नाला सोडून भाग्यालाच सर्वांचे कारण केले तर त्यात अनेक विकल्प होऊ शकतात. ब्रह्मसूत्रांमध्येही 'जगद्व्यापारवर्जं प्रकरणादसन्निहितत्वाच्च ।'[212] या सूत्रात मुक्त जीवांचे स्वरूप सांगताना म्हटले आहे की, मुक्तीच्या अवस्थेत ते जरी ईश्वरासमान असतात, तरीसुद्धा त्यांच्यात जगताचे निर्माण, इ. करण्याचे सामर्थ्य नसते. सृष्टी, स्थिती, संहार करणे ईश्वरात जास्त आहे आणि श्रुतींमध्येसुद्धा प्रयत्नांची प्रशंसा केली आहे. प्रयत्न चैतन्यावर आधारित असल्याने जडावर आधारित भाग्यापेक्षा श्रेष्ठ आहे असे शास्त्र सांगते. देवता फळ देते. दृष्टिसृष्टिवादातही जीव स्वतंत्र राहून प्रयत्न करू शकतो. बृहदारण्यकभाष्यात सांगितले आहे की, अज्ञानी पुरुषाप्रती देवता विघ्न उत्पन्न करतात. ते मुमुक्षू लोकांमध्ये देवताराधन वाढविण्याच्या दृष्टीने म्हटलेले आहे. ज्याचा उद्धार इच्छितात त्याला श्रद्धा, इ. देतात आणि ज्याचे बंधन इच्छितात त्याला अश्रद्ध, इ. देतात. म्हणून मुमुक्षुव्यक्तीने देवताराधन, इ. करायला हवे, हेच अनुगीतेंमध्येही सांगितले आहे. बृहद्वासिष्ठाच्या टीकेतसुद्धा म्हटले आहे की, भाग्याने येणारे विघ्न आपल्या प्रयत्नांनी दूर करायला हवे. याच ग्रंथात असे म्हटले आहे की, जीव हाच आपल्या प्रयत्नांनी ब्रह्मा, विष्णू, शिव, इ. होतो तर त्यांच्या शक्तीने प्रयत्नाने लक्ष्मी, वाणी, गौरी, इ. पत्नी होतात. म्हणून भाग्यापेक्षा प्रयत्नच समर्थ आहेत, असे योगवासिष्ठामध्ये सांगितलेले आहे.

येथे गुलाबराव महाराज अनेक उदाहरणांनी याचे समर्थन करतात. असे सांगितले जाते की, अंतिम जन्मात होणारे ज्ञान जीवनाला सार्थक बनविते. त्यापेक्षा



भाग्यच प्रबळ आहे. तर ते सुद्धा योग्य नाही. कारण अंतिम जन्माचा अर्थ काय? ज्या जन्मात ज्ञान होते तोच अंतिम जन्म आहे. म्हणून ज्ञानानेच जन्म अंतिम होण्याचा निर्णय होतो. जोपर्यंत ज्ञान होणार नाही तोपर्यंत जन्माचा अंत होणार नाही. त्या ज्ञानाकरिता प्रयत्न करणे आवश्यक आहे. म्हणून योगशास्त्रातसुद्धा आपापल्या प्रयत्नांनी योगी समाधिरूपी फळ शीघ्र प्राप्त करून घेईल असे सांगितले आहे.

ब्रह्मसूत्रशांकरभाष्यातदेखील हेच स्पष्ट केले आहे. ज्याचे वैराग्य तीव्र आहे त्यालाच समाधिरूप फळ शीघ्र प्राप्त होते. सर्व योग साहित्यात याचेच समर्थन केलेले आहे, असे सांगून वसिष्ठांनी श्रीरामचंद्रांना पुरुषप्रयत्नांचे महत्त्व सांगितले, असे प्रतिपादित करून गुलाबराव महाराजांनी हा सर्ग समाप्त केलेला आहे. यानंतर पुरुषप्रयत्नाचे समर्थन सातव्या सर्गात केले आहे.

ष्पौरुषस्थापन' या सातव्या सर्गारंभी पौरुष किंवा पुरुषयत्न अत्यंत श्रेष्ठ आहे, असे महाराजांनी प्रतिपादित केले आहे. वसिष्ठ महर्षी श्रीरामचंद्रांना म्हणतात की, भाग्य सोडून पुरुषयत्नावर विश्वास ठेव. पुरुषयत्न स्पंदनावर आधारित आहे आणि हे स्पंदन प्रकृतीचे अनुसरण करते. जेव्हा प्रयत्न स्पंदनानुसार होतो तेव्हा तो श्रेष्ठ होतो आणि रजोगुणामुळे प्रकृतीत जो स्पंद होतो त्यामुळे दुःख होते. निर्विकार आत्म्यात त्याच्याच सत्तेने जी माया राहते ती सत्य असते. ज्याच्या अज्ञानाला आपण 'माया' म्हणतो त्याच्याच विशेष ज्ञानाने ती नष्ट होते. परब्रह्मात कर्तृत्व औपाधिक असते हे सत्य आहे. तरीसुद्धा शास्त्रानुसार यत्न करणे श्रेष्ठ आहे.

तीनही गुण कधी कधी समानता व विषमता प्राप्त करतात. त्यांच्यात ब्रह्मध्यानाच्या रूपाची चित्तवृत्ती सात्त्विक असते. याविषयी भगवद्गीता इ. प्रमाण आहे. आपल्या बुद्धीने मनाला स्थिर ठेवून सात्त्विक प्रयत्न करणे आवश्यक आहे. असे म्हटल्या जाते की, राजस यत्न वासना वाढविल्यामुळे उपकारी नसतात. जेव्हा मनांत सत्त्वगुण वाढतो तेव्हा यत्न निष्पन्न होतात हे प्रत्यक्ष आहे. मूर्ख त्यालाच

'दैव' म्हणतात आणि त्यानेच अशुभ कर्म वाढू शकते. म्हणून हे श्रीरामा, शुभ प्रयत्नांनी पापकर्मांचा नाश कर. कारण शास्त्रानुसार प्रयत्न केल्याने वासना नष्ट होऊन मुक्ती मिळते. तेच शास्त्रसोडून प्रयत्न केल्याने वासना वाढते. हा प्रयत्न तीन प्रकारचा असतो 1. शरीराने 2. वाणीने आणि 3. मनाने केलेला प्रयत्न.यात तीर्थाटन, इ. शारीरिक प्रयत्न, प्रणव, जप, इ. वाचिक प्रयत्न, तर ध्यान, इ. मानसिक प्रयत्न आहेत, असे वसिष्ठ महर्षी श्रीरामचंद्रांना म्हणतात.

यावर एक शंका स्वयं उपस्थित करून गुलाबराव महाराज उत्तर देतात. शंका अशी आहे की, भाग्य सोडून केवळ प्रयत्नांवर अवलंबून राहिल्याने आपला जन्म चार्वाक्जन्म होईल. या शंकेचे निरसन करतांना गुलाबराव महाराज म्हणतात की, चार्वाकांमध्ये जन्मापासूनच प्रयत्नांची अपेक्षा राहत नाही. पूर्वजन्मात केलेला यत्न वर्तमान जन्मात 'भाग्य' म्हणविले जाते. याविषयी एक प्रश्न उपस्थित होऊ शकतो की, अनेक जन्मांपासून केलेले भाग्य एकाच जन्माच्या प्रयत्नांनी कसे जिंकले जाईल? यावर गुलाबराव महाराज याचे उत्तर अशाप्रकारे देतात की, अनुकूल दैवच शुभप्रयत्नांनी वाढून लगेचच फळ देते. याचा विचार योगभाष्याच्या साधनपादात केलेला आहे.

1. एक कर्म एकाच जन्माचे कारण आहे.

2. एक कर्म अनेक जन्माचे कारण आहे.

3. अनेक कर्मे अनेक जन्माची कारणे आहेत.

4. अनेक कर्मे एका जन्माची कारणे आहेत.

या पर्यायांमध्ये योगशास्त्रात निर्णय केलेला आहे की, अनेक कर्मे मिळून एकाच जन्माचे कारण होतात.

जेव्हा गंगास्नान, भगवन्ताचा नामजप, इ. सबळ कर्मांसोबत कोणतेही एक मंदकर्म जोडले जाते तेव्हा ते तीव्र होते आणि आपले फळ देण्यास आरंभ



करते. येथे दोन प्रकारचे कर्म असते. 1. पुण्य व 2. पाप. पुण्य कर्माने पाप कर्म नष्ट होते. तेच आम्हाला करायला पाहिजे. हा विचारही योगभाष्यात केला गेला आहे.

प्रयत्नाच्या समर्थनार्थ गुलाबराव महाराज म्हणतात की, ज्याप्रकारे रज्जुरूपाच्या अधिष्ठानाच्या ज्ञानाने अनंत काळाचा भ्रम नष्ट होतो. तसेच ब्रह्मज्ञानाने अनादि संसाराचाही नाश होतो. म्हणून ब्रह्मज्ञानासाठी प्रयत्न करणे नेहमी सफल आहे.

यानंतर आठव्या सर्गात दैवीसम्पत् निरूपण व अनुबन्ध चतुष्टयाचे प्रतिपादन केलेले आहे. जगात दैवीसम्पत् व आसुरीसम्पत् असे दोन प्रकारचे गुण आहेत. यामध्ये दैवी सम्पत्तीने मोक्ष मिळतो व आसुरी सम्पत्तीने बंधन होते. हा विषय भगवान् श्रीकृष्णाने गीतेत सांगितला आहे. जर पूर्वपुण्याने दैवीसम्पत्ती, पापाने आसुरीसंपत्ती वाढते आणि कर्माने ज्ञान होते तेव्हा प्रयत्न निष्फळ होतील. अशी शंका आली असता गुलाबराव महाराज म्हणतात, आसक्तीने जी चांगली वाईट कर्मे केले जाते. ती आपले फळ देतात. हे सर्व सांख्यदर्शनात सांगितलेले आहे. योगसूत्राच्या कैवल्यपादात सांगितले आहे की, धर्माने प्राण्याला भिन्न–भिन्न शरीर प्राप्त होते. हा धर्म त्या शरीरग्रहणाकरिता आवश्यक आवरणांना दूर करतो. त्यामुळे ते–ते शरीर प्राप्त होते. जसे कुणी शेतकरी आपल्या शेतात पाण्याच्या प्रवाहाला थांबविणाऱ्या आवरणाला दूर करून त्याद्वारे त्या शेतात पाण्याचा प्रवाह आणतो. तसेच धर्म आवरणाला नष्ट केल्याने शरीराचे कारण बनतो. त्यासाठी महाभारताच्या शांतिपर्वातील वाक्य प्रमाण आहे. म्हणून मनुष्याने शास्त्रीय कर्माने आपल्या स्वभावाला जिंकून आपल्या लक्षाप्रती जावयास हवे. याविषयी शास्त्रीय कर्म करणे ब्राह्मणांना सुलभ आणि इतरांना कठिण होऊ शकते. परंतु हे केवळ कर्मकाण्डाविषयी. कर्मकांडात ब्राह्मणांचा अधिकार असून देखील भक्तीचा सर्वांना अधिकार आहे. मग उच्चवर्णीयांचा गर्व दूर करण्याकरिता ब्राह्मणईर्षा, इ. दूर करण्यासाठी इतर वर्णांच्या लोकांनी आपले कर्म करायला हवे. ते कर्म निष्काम कर्म असेल तर चित्तशुद्धी देते. त्याने ईश्वराची कृपा होते. यालाच भगवंताची कृपा

समजतात. त्यानेच ईश्वरात वेद, इ. उपायांचे निर्माण केले. ईश्वराच्या कृपेने चांगली बुद्धी, सत्–शास्त्र, सत्संग आणि योग उत्पन्न होतात. त्याने मनुष्याला साधनचतुष्टय प्राप्त होतात.

साधनचतुष्ट्य – 1. विवेक 2. वैराग्य 3. शमादिषट्कसंपत्ती 3. मुमुक्षुत्व

1. विवेक – 'कोणतातरी एक नित्य पदार्थ आहे. बाकी सर्व अनित्य' असा सामान्य विवेक झाल्यानंतर गुरुमुखातून सर्व पदार्थ अनित्य आहेत व ब्रह्मच नित्य आहे हे विशेष ज्ञान प्राप्त करून अपरोक्ष ज्ञान मिळविणे म्हणजे 'विवेक'. साधनसंपत्तीमध्ये सामान्य विवेकाचा उल्लेख आहे.

2. वैराग्य – कर्माचे फल आणि त्याचा भोग यांच्यात तृष्णा नसणे हे 'वैराग्य' आहे. हे मंद, तीव्र आणि तीव्रतर या भेदांनी तीन प्रकारचे असते. यांमध्ये कुटुम्बामधील कुणाचा नाश झाल्यावर होणारे तात्कालिक वैराग्य मंद आहे. 'मला पुन्हा जन्म नको' ही बुद्धी 'तीव्र वैराग्य' आहे यामुळे विविदिषा नावाच्या संन्यासात अधिकार प्राप्त होतो. क्षुद्रांचाही यात अधिकार आहे. योगशास्त्रात सांगितलेले यतमान, व्यतिरेक, एकेन्द्रिय नावाच्या वैराग्यभूमिका यातच अंतर्भूत होतात. तसेच ब्रह्मलोकापर्यंत संसारही मला नको ही बुद्धी 'तीव्रतर' वैराग्य आहे. यालाच 'वशीकार' म्हणतात.

3. शमादिषट्कसंपत्ती – या सर्व वैराग्य दशा शम, इ. सहा साधनांनी सुरक्षित ठेवल्या जातात. ही शमादिषट्कसंपत्ती अर्थात् शम, दम, उपरम, तितिक्षा, श्रद्धा व समाधी प्राप्त झाल्यावर बुद्धीच्या परिपाकाने मुमुक्षा होते.

4. मुमुक्षुत्व – दुःखापासून निवृत्ती व आनंदप्राप्ती 'मोक्ष' म्हणविली जाते. हा मोक्ष प्राप्त करण्याची इच्छा म्हणजे 'मुमुक्षा'. हा मोक्ष ज्ञानानेच मिळतो. कारण कर्म अविद्येने होत असल्याने त्याने मोक्ष मिळणार नाही. ज्ञानकर्मसमुच्चयानेदेखील मोक्ष मिळत नाही. कारण हे परस्पर विरुद्ध आहेत. हे सर्व तैत्तिरीयभाष्यात श्रीशंकराचार्यांनी स्पष्ट केले आहे. येथे गुलाबराव महाराजांनी तैत्तिरीय



उपनिषदाच्या शांकरभाष्याचे ते भाष्य मूळरूपात प्रस्तुत करून याचा निष्कर्ष सांगितला आहे की, ज्ञानानेच मोक्ष प्राप्त होत असल्याने साधकाने ज्ञानाकरिता गुरूंचा आश्रय घ्यावयास हवा. हा क्रम मंद प्रयत्न करणाऱ्यांसाठी आहे. जे उत्तमाधिकारी आहेत त्यांच्यासाठी हा क्रम नाही. हे रामचन्द्रा, संन्यास, इ. शिवायही तुझ्यात अत्यंत विवेकाने हे जे सात्त्विक वैराग्य आले आहे, ते अनंत पुण्याचे फळ आहे. म्हणून तू मोक्षासाठी प्रयत्न कर. त्यासाठी माझे आशीर्वाद नेहमीच राहतील, असे महर्षी वसिष्ठांनी श्रीरामांनी म्हटले. इतक्या प्रसंगांनी गुलाबराव महाराजांनी या 'बालवासिष्ठ' नावाच्या ग्रंथाची समाप्ती केली आहे.

या ग्रंथात संस्कृतमध्ये आठ सर्गापर्यंतच योगवासिष्ठाची रचना उपलब्ध आहे. शंकराचार्यांच्या ब्रह्मसूत्रभाष्याप्रमाणेच पूर्वपक्ष, उत्तरपक्ष व सिद्धांत पक्ष या पद्धतीची मांडणी यात केलेली आहे. समग्र योगवासिष्ठाचे सार देत अत्यंत आवश्यक आध्यात्मिक विषयावर महाराजांनी या ग्रंथात प्रकाश टाकलेला आहे. मूळ योगवासिष्ठातील तात्त्विक सिद्धांत अगदी सोप्या संस्कृतात पण मार्मिक शब्दात विशद करुन सांगितले आहेत. त्यामुळे ते सिद्धांत सुभाषिताप्रमाणे लक्षात राहतात.

'तातास्तु ब्रह्मज्ञानानन्तरमपि गुरोरपेक्षास्ति–इति अमृतानुभवे वदन्ति ।'[213]

याप्रमाणे संतवचनांनी योगवासिष्ठातील सिद्धांत सोप्या रीतीने सांगितले आहेत. वेदान्तातील अनेक सूक्ष्म सिद्धांतांचे सरल भाषेत प्रतिपादन या ग्रंथाच्या निमित्ताने महाराजांनी केले आहे. भाग्य, स्वभाव, इ. बाबींवर प्रयत्नांनी मात करुन अभीष्टप्राप्ती शक्य आहे, असा विश्वास महाराजांनी अनेक दाखले देऊन व्यक्त केला आहे. या ग्रंथाच्या विवेचनावरुन महाराज हे प्रयत्नवादाचे पुरस्कर्ते होते असे म्हणणे वावगे ठरणार नाही, असे वाटते. महाराजांचा हा ग्रंथ अपूर्ण स्वरूपात उपलब्ध आहे.

## 15. स्वमतनिर्णयः

'स्वमतनिर्णयः' या गुलाबराव महाराज विरचित ग्रंथामध्ये 112 श्लोक असून हा एक संग्रहात्मक प्रकरण ग्रंथ आहे. यामध्ये महाराजांनी वेदांत, भक्ती, व्यवहार, आयुर्वेद, धर्मशास्त्र, तीर्थक्षेत्रे, सण, संप्रदाय, ब्रह्मचर्य, संन्यास, दैव, प्रयत्न, वगैरे पारमार्थिक, धार्मिक आणि व्यावहारिक विषयांवर स्वतःची महत्त्वपूर्ण निर्णायक मते व्यक्त केली आहेत. म्हणूनच याला 'स्वमतनिर्णयः' असे यथार्थ नाव दिले आहे. महाराजांचे सिद्धांत आणि विचारसरणी सूत्ररूपाने जाणण्यासाठी या ग्रंथाचा आधार अत्यंत महत्त्वपूर्ण आहे.

महाराजांनी नेहमीच्या शैलीप्रमाणे त्यांच्या आराध्यपंचायतनाला नमस्कार करून ग्रंथाची सुरूवात केली आहे. ग्रंथारंभी महाराज म्हणतात,

'श्रीमान् ज्ञानेश्वराचार्य उमा माता शिवः पिता ।
पतिः कृष्णो राधिकाद्या भगिन्यो गोपिका मम ।।

पञ्चायतनमित्येतत् हृद्यास्थाप्य प्रपूज्य च ।
दण्डवत्प्रणिपत्याथ वक्ष्ये स्वमतनिर्णयम् ।।'[214]

त्यानंतर प्रमाण काय मानावे याबद्दल ते म्हणतात की, सगुण भगवद्भक्तीने सुशोभित झालेल्या भगवत्पूज्यपाद श्री शंकराचार्यांचे वचन प्रमाण आहे, असे माझे मत आहे.

'शांकरज्ञानसंयुक्तं भगवद्भक्त्यलंकृतम् ।
यद्वाक्यं तत्प्रमाणं स्यादिति स्वमतनिर्णयः ।।'[215]

स्वधर्म, अद्वैतज्ञान व सगुण भगवंताची भक्ती या तीन गोष्टींचे सर्वदा पालन करावे. नीतीचे आचरण कालानुसार असावे. धर्म म्हणजे काय? हे सांगताना महाराज म्हणतात, ज्या मार्गाने सत्त्वगुणाची वाढ होईल म्हणजे तमोगुणातून रजोगुणात व रजोगुणातून सत्त्वगुणात वाटचाल होईल तो 'धर्म' होय. पण याच्या



उलट होत असेल किंवा सत्त्वगुणाकडे प्रवृत्ती होत नसेल, सत्त्व गुण वाढत नसेल, तर तो मात्र अधर्म होय.

'सत्त्ववृद्धिर्भवेद्येन अन्यगुणद्वयघातिनी ।
स हि धर्मो न चान्यः स्यादितिस्वमतनिर्णयः ।।'[216]

परधर्मासंबंधी महत्त्वाचा संकेत महाराज सांगतात, 'स्वधर्मातील असो की परधर्मातील असो, ज्याने सत्त्वगुण वाढेल तेच फक्त 'परमधर्म्य' समजावे, इतर नव्हे.'

'स्वधर्मे परधर्मे वा यत् सत्त्वफलसाधकम् ।
तत्तदस्तु परं धर्म्यमिति स्वमतनिर्णयः ।।'[217]

वेद हे सुषुप्तीत असलेल्या पुरुषांच्या मुखातून निघणाऱ्या शब्दांप्रमाणे अस्पष्टार्थबोधक असून, भगवान् श्रीकृष्णांनी अर्जुनाला सांगितलेली गीता ही जागृतीत बोलणाऱ्या पुरुषाच्या शब्दाप्रमाणे स्पष्टार्थबोध करणारी आहे. वेद व गीता ह्या दोघांचे प्रामाण्य समान आहे, असे माझे मत आहे, असे गुलाबराव महाराज म्हणतात.

व्यावहारिक नीतिविषयी गुलाबराव महाराज म्हणतात, 'मूर्खांना शासन करणे, लहान मुलांविषयी मौन धारण करणे, शठाशी शठाप्रमाणे वागणे, निर्मळ व सरळ अंतःकरण असलेल्यांवर प्रेम करणे व सभ्य पुरुषांशी सभ्यतेने वागणे, हीच व्यावहारिक नीती आहे.'

श्रुती व शास्त्र यांची एकवाक्यता करून अध्यात्मज्ञान श्रवण करावे. श्रुतिशास्त्राला विरोध येणार नाही अशा युक्तीने श्रवण केलेल्या सिद्धान्ताचे चिन्तन करावे व ध्यान आणि अनुभव ह्यांच्या साहाय्याने अपरोक्ष आत्मसाक्षात्कार करून घ्यावा किंवा जीवब्रह्माचे ऐक्य अनुभवावे. ज्ञानी पुरुषांनी ब्रह्मबुद्धीने सर्वत्र समदृष्टी ठेवावी. पण जगाशी वागताना जगात दिसून येणाऱ्या विषमतेकडे लक्ष राहतच असल्यामुळे आपल्या धर्मात जसे आचरण करण्यास सांगितले असेल तसेच

आचरण केले पाहिजे. आपत्काल नसतांना धर्मज्ञान व अध्यात्मज्ञान उच्च वर्णापासून नीच वर्णांनी संपादन करावे व आपत्काली नीचवर्णापासूनही उच्च वर्णांनी ते संपादन करण्यास हरकत नाही. भक्ती मात्र कोणालाही कोणापासूनही ग्रहण करता येते, असा महाराजांचा स्वमतनिर्णय आहे.

शास्त्रनिषिद्ध वागणे हा महान् दोष आहे. शास्त्रविहित आचारावर सदैव भर देणे, हा अविचार होय व विचाराने सत्त्वगुणवर्धक जो आचार असेल त्याचे आचरण करणे योग्य आहे. अत्यंत श्रद्धापूर्वक कर्माचे आचरण करावे. आत्मविवेक युक्तीने करावा. ज्ञान व भक्ती अनुभव प्रधान असते, असे महाराज म्हणतात.

'श्रद्धयैव आचरेत् कर्म युक्त्या तत्त्वविवेचनम् ।
भक्तिज्ञाने प्रतीत्यैवेत्येवं स्वमतनिर्णयः ।।'[218]

अनादि कालापासून आपल्या स्वरूपाला विसरलेल्या जीवाला त्याच्या स्वरूपाचे ज्ञान करून देणारी श्रुती मुमुक्षूला मातेप्रमाणे आहे, म्हणून श्रुतीच्या सर्व निरूपणाचे तात्पर्य जीवाला आत्मस्वरूपाचे ज्ञान करून देण्यात आहे. सृष्टीचे सत्यत्व प्रतिपादन करण्यात नाही. कोठे श्रुतीत पंचभूतांच्या मिश्रणापासून सृष्टी उत्पन्न झाली, असे सांगितले आहे, तर कोठे तीन भूतांच्या मिश्रणापासून तिची उत्पत्ति झाली आहे असे सांगितले आहे. यावरून सृष्टीच्या उत्पत्तीचा संपूर्ण विचार समूळ खोटा आहे, असे वेदावरून सिद्ध होते, असा महाराजांचा निर्णय आहे.

'पञ्चीकरणवाक्याच्च त्रिवृत्करणवाक्यतः ।
मिथ्यैव सृष्टिमीमांसा इत्येवं स्वमतनिर्णयः ।।'[219]

आजही सृष्टिनिर्मितीच्या संदर्भात अनेक सिद्धांत मांडले जातात. परंतु अजूनही वैज्ञानिकांचे एकमत होत नाही. हे गुलाबराव महाराजांच्या वरील वाक्याचेच द्योतक आहे.

मनाच्या कल्पनेचा तीव्र वेग म्हणजे जागृत जगत् स्थिती, मध्य वेग म्हणजे



स्वाप्निक जगत् स्थिति व मृदु कल्पना म्हणजे काल्पनिक जगत् स्थिती. जगत् हे कल्पनेचा भास असून ब्रह्म हीच सत्यवस्तु आहे, काल्पनिक व सत्य अशा ह्या दोन अस्तित्वांवाचून जगात तिसरे अस्तित्व मुळीच नाही.

आत्मा व अनात्मा यांचा निवाडा करण्याकरिता सांख्यशास्त्राचा विचार करावा. वृत्तीचा निरोध करण्याकरिता योगशास्त्राचा उपयोग करावा व जीवब्रह्मैक्य साधण्याकरिता वेदान्तशास्त्राचा उपयोग करावा. ईश्वर स्वामी, जीव सेवक अशा स्वामिसेवक संबंधाने भगवंताची भक्ती करण्याकरिता माध्वशास्त्र उपयोगी आहे. परमेश्वराची भक्ती करतांना शंकराची भक्ती करणाऱ्यांनी शंकराच्या पूजेचा प्रकार पाशुपत मतांतून घेण्यासारखा आहे व विष्णूच्या पूजेचा प्रकार पंचरात्र आगमातून घेण्यायोग्य आहे. जीव व परमेश्वर यांचा अंश—अंशीभाव दाखविण्यापुरते विशिष्टाद्वैत मत ग्राह्य आहे. जीव व परमेश्वर यांचे अत्यंत ऐक्य आहे, हे दाखविण्याकरिता शंकराचार्यांचे अद्वैतमत अत्यंत उपयुक्त आहे, पण त्या अद्वैतानंतरही सगुण परमेश्वराची भक्ती सोडू नये, असा महाराजांचा स्वमतनिर्णय आहे.

आत्मज्ञानप्रक्रियेविषयी महाराज म्हणतात, ज्याला ज्याला ज्या ज्या प्रक्रियेने जीवब्रह्मैक्यज्ञान होईल, ती ती 'आत्मज्ञानप्रक्रिया' होय.

'यया यया भवेत्पुंसां व्युत्पत्तिर्प्रत्यगात्मानि ।
वेदान्तप्रक्रिया सा सैवेति स्वमतनिर्णयः ।।'[220]

सत्पुरुषांचे शास्त्रानुसार असलेले उत्तमाचरण ग्रहण करण्यास योग्य असून प्रारब्धानुसार होणाऱ्या असदाचरणाचे अनुकरण करू नये व तेवढ्यावरून त्यांच्यावर अश्रद्धाही करू नये. श्रुती व स्मृतीमध्ये मुख्य आणि वैकल्पिक असे दोन प्रकारचे धर्म सांगितले असून मुख्य धर्म सर्वदा अनुष्ठेय आहे आणि आपत्काली वैकल्पिक धर्माचे अनुष्ठान करावे.

श्री गुरू कसा असावा, हे सांगताना महाराज म्हणतात,

'श्रोत्रियो ब्रह्मनिष्ठश्च महाभागवतो गुरुः ।
श्रुतिस्मृतिपुराणानि शास्त्रं स्वमतनिर्णयः ।।[221]

विद्वान्, आत्मानुभवी व भगवद्भक्त अशाच पुरुषाला गुरू म्हणावे आणि श्रुती, स्मृती व पुराणे हीच विचार करण्यासारखी शास्त्रे आहेत.

दृश्य जगत् नाही, असे तत्त्वविचाराने जाणून घेऊन जगताविषयी संकल्प—विकल्प करणें सोडून द्यावे आणि अद्वैतस्थिती प्राप्त झाल्यावर देखील श्रीकृष्णाचे भजन करावे.जगत् हे अज्ञानरूपी भ्रमांचे परिणामरूप कार्य असून परब्रह्मावर भासणारे ब्रह्माचे विवर्त कार्य आहे. त्या जगाचा नाश ब्रह्मज्ञानानेच होऊ शकतो, कर्माने होत नाही. निष्काम पुण्यकर्माने चित्तशुद्धी होऊन, उपासनेने चित्त स्थिर होते. ज्ञानाने पुरुष सर्व दुःखापासून मुक्त होऊन ज्ञानानंतरच्या सगुण भक्तीने प्रारब्धाचा भासहीनाही. कालाचे महत्त्व सांगणे, दैववादाची महती गाणे किंवा भगवंताची इच्छा म्हणणे, हे सर्व जीवाला झालेल्या शोकाच्या निवारणार्थ आहे. पुढे येणारे दुःख मात्र नाहीसे करण्याकरिता प्रयत्न करावा. विवर्त दोन प्रकारचा आहे. एकाला 'अध्यस्त' व दुसऱ्याला 'अनध्यस्त' म्हणतात. मायेच्या त्रिगुणापासून उत्पन्न झालेला नामरूपात्मक सगुण प्रपंच 'अध्यस्तविवर्त' असून श्रीकृष्ण परमात्मा 'अनध्यस्तविवर्त' होय. (भ्रमाने भासणाऱ्या सगुणाला 'अध्यस्तविवर्त' म्हणतात व भ्रमावाचून भासणाऱ्या सगुणाला 'अनध्यस्तविवर्त' म्हणतात.)

'विवर्तो द्विविधः प्रोक्तो अध्यस्तानध्यस्तभेदतः ।
भवोऽध्यस्तो ह्यनध्यस्तः कृष्णः स्वमतनिर्णयः ।।'[222]

त्यानंतर मुक्ती आणि भक्ती म्हणजे काय? हे सांगताना महाराज म्हणतात, आपले मन म्हणजे संसार असून मनाचा नाश म्हणजे 'मुक्ती' होय आणि दृष्टपरमानंद देणारी 'भक्ती' आहे.

'चित्तमेव हि संसारस्तन्नाशो मुक्तिरात्मनः ।
दृष्टसौख्यप्रदा भक्तिरिति स्वमतनिर्णयः ।।'[223]



व्यतिरेक समाधिमध्ये ब्रह्म ज्ञानगम्य असून अन्वयांत तेच पुनः भक्तीने प्राप्त होते. वैराग्य दृढ होण्याकरिता पार्वतीपति जो भगवान् शंकर त्याची भक्ती करावी व रसास्वादरूपी विघ्न नाहीसे करण्याकरिता श्रीकृष्णाचे भजन करावे. श्रीकृष्णाची भक्ती करावयाची ती लक्ष्मीसह, रुक्मिणीसह, राधेसह किंवा गोपिकेसह असलेल्या श्रीकृष्णाची करावी. त्याचप्रमाणे श्रीशंकराची भक्ती करावयाची ती पार्वती किंवा गंगा यांसह करावी. जीव प्रतिबिम्बरूप असून परमेश्वर बिम्बरूप आहे आणि ह्या संबंधानुसार दृष्टिसृष्टिवाद्यांनाही भक्ती करता येते, असे महाराज म्हणतात.

'श्रुत्या युक्त्या स्वानुभूत्या मंडनीयं स्वकं मतम् ।
अन्यत् केवलतर्केण घात्यं स्वमतनिर्णयः ।।'[224]

आपले स्वतःचे मत सिद्ध करावयाचे असल्यास ते श्रुती, युक्ती, अनुभव ह्या तीन प्रमाणांच्या साहाय्याने सिद्ध करीत जावे आणि दुसऱ्याचे मत केवळ तर्काने खंडन करावे, असा महाराजांचा निर्णय आहे.

महाराजांनी ज्ञानोत्तर पराभक्तीचे विवेचन करताना ''तत्त्वमसि'' या महावाक्याचा भक्तीच्या अंगाने अन्वयार्थ लावून भक्तिदर्शनात अद्वैताप्रमाणेच मोलाची भर घातली आहे, हे त्यांच्या तत्त्वज्ञानाचे वैशिष्ट्य होय. या संबंधातील महाराजांचा स्वमतनिर्णय आहे —

'धारावाही रसो भक्तिरीशे तत्पदगोचरे ।
त्वंपदज्ञो परो भक्त इति स्वमतनिर्णयः ।।'[225]

याचा अर्थ असा की, 'तत्' पदाचा लक्ष्यांश 'ाड्गुणैश्वर्यसंपन्न अनध्यस्तविवर्त असा भगवान श्रीकृष्ण आहे आणि त्याची भक्ती करणारा आत्मज्ञान संपन्न भक्त हा 'त्वं' पदाचा लक्ष्यांश होय. 'असि' हे पद पराभक्तीचे वाचक आहे. व्युत्थानकाळी उद्भवणाऱ्या सर्व वृत्ती भगवंताच्या ठिकाणी समर्पित केल्या जातात. त्यामुळे 'अद्वैत'(भज्य—भक्ताचे) कायम राहून जीवन्मुक्ती शक्य होते. ज्ञानी भक्त

हा अखंडपणे सहज–समाधीची अनुभूती घेत असतो आणि 'भक्ती'मुळे आनंद साम्राज्याचा तो चक्रवर्ती होतो. कारण भक्ती म्हणजे ईश्वराविषयीचे परम प्रेम, अखंड हरि–प्रीती. या प्रेमरसाचा आस्वाद म्हणजेच 'परमानंद'.

सत्त्व, रज, तम ह्या तीन गुणानुसार लोकांत तीन प्रकारची स्वाभाविक श्रद्धा दिसून येते, पण ज्ञानी पुरुष या स्वाभाविक श्रद्धेला जिंकून एका अद्वैत परब्रह्माला ग्रहण करणारी शास्त्रीय श्रद्धाच ठेवतो. ज्याला शास्त्राचा मुळीच गंध नाही पण श्रद्धावान् आहे असा पुरुष तरून जातो, पण शास्त्र पाहून शास्त्रांतील एक अंश ग्रहण करून दुसरा अंश सोडून देणारा पुरुष मात्र पातकी होय, असे महाराज म्हणतात.

'मूर्तीच्या ठिकाणी ब्रह्मभावना करावी पण ब्रह्माचे ठिकाणी मूर्तिदृष्टि करू नये' हे उपासनेचे तत्त्व आहे. श्रीकृष्णाचा देह पूर्ण ब्रह्मस्वरूप असल्यामुळे तेथे ब्रह्मभावना करण्याची आवश्यकता नाही, पण श्रीकृष्णाची भक्ती करीत असतांना भक्ती अनुसार संबंध मात्र दृढ करावा, असे गुलाबराव महाराजांचे मत आहे.

ब्रह्मसूत्रांतील (शांकरभाष्य) समन्वयाच्या प्रथमाध्यायांत लिहिलेल्या एकवाक्यतेनुसार वेदान्ताचे श्रवण करावे. दुसऱ्या अध्यायानुसार मनन करावे. साधनांचा विचार तिसऱ्या अध्यायातून घेऊन शेवटी चवथ्या अध्यायांतून मोक्षरूपी साध्याचा विचार करावा. गीतेच्या प्रामाण्यावरून उपासनेत दोन श्रीकृष्णाचा निर्देश दिसतो पण ब्रह्मज्ञानदृष्टीने दोघांचे ऐक्य आहे. श्लोकाने, श्लोकार्धाने किंवा एका चरणाने देखील ब्रह्मज्ञान झाल्यास त्याला इतर कोणत्याही साधनाचे प्रयोजन उरत नाही, असे महाराज म्हणतात.

वेद हे ईश्वराने निर्माण केले असले तरी वस्तुतः वेद हे श्रीगुरुने निर्माण केले आहेत, कारण गुरूपदेशाने आपले पारमार्थिक अस्तित्व कळून 'मी ब्रह्म आहे' अशी ज्ञानवृत्ती उत्पन्न झाली असता ते वेद अपरोक्ष होतात. श्रीगुरु, शास्त्र व देव ह्यांचे देह किंवा विग्रह कल्पित असले तरी ते अनादरणीय नाहीत. कारण ते



विद्येने कल्पित आहेत अविद्येने नाहीत. उलट ते देह किंवा विग्रह शुद्धसात्त्विक असून ब्रह्मज्ञानानेही निवृत्त होत नाहीत म्हणून आदरणीय आहेत.

उच्चारिलेले वाक्य, उच्चारणाऱ्याने विषयसुखाचे ध्येय ठेवून उच्चारिले नसल्यास व त्या वाक्यांतून उच्चारणाऱ्याच्या अंतःकरणांतील भाव स्पष्टपणे समजण्यासारखा असल्यास, ते वाक्य अहितकारक आहे असे कधी समजू नये. त्या वाक्यावर विश्वास ठेवला असता धोका नाही. श्रीगुरु व श्रीगुरुचे वचन हे दोन्ही आपल्याच अस्तित्वावर भासत असल्यामुळे श्रद्धेने सिद्धी होते म्हणजे 'जशी श्रद्धा तशी कार्यसिद्धी' होते, असे महाराज म्हणतात. एकादशी, सोमवार, शिवरात्री ही व्रते करावीत. ती कधीही भंगू देऊ नयेत. आळंदी, हिमालय (केदारादि), काशी, प्रयाग, वृन्दावन आणि पंढरपूर ही सहा तीर्थे सर्व तीर्थांत मला प्रिय आहेत.

प्राणाचे ठिकाणी गुरुमंत्र ठेवून, जिह्वेच्या ठिकाणी शिवविष्णूचे नाम ठेवावे किंवा सर्वत्र गुरूमंत्रच स्मरावा. हृदयाचे ठिकाणी उजव्या बाजूला विष्णूचे व डाव्या बाजूला शिवाचें ध्यान करावे व सहस्त्रदलाचे ठिकाणी श्रीगुरुचें ध्यान करावे. अंतःकुंभकाच्या साहाय्याने मन समाधीत न्यावे व बहिःकुंभकाच्या साहाय्याने मृत्यूला जिंकावे, असे महाराज म्हणतात.

'शुद्धनिष्कामभक्तेस्तु न फलं हरिदर्शनम् ।
फलं हरिमयं चित्तमिति स्वमतनिर्णयः ।।'[226]

शुद्धनिष्काम भक्तीचे फळ श्रीहरीचे दर्शन नसून प्रेमाने चित्त हरिमय होणे हे आहे. प्रेमवृत्तीने चित्त हरिमय होते व शेवटी सर्वच हरिमय व प्रेममय आहे, असे अनुभवास येते. अद्वैताच्या अर्थात चिद्द्वैताच्या दार्शनिक बैठकीवर महाराज ज्ञानोत्तर भक्तीचा विचार मांडतात व मधुराभक्तीचे प्रतिपादन करतात.

व्यवहारामध्ये गुरु व शिष्य या दोघांनी बरोबरीच्या मित्राप्रमाणे परस्परांस सल्लामसलत विचारावी पण परमार्थात मात्र शिष्याने श्रीगुरुच्या सर्वस्वी अधीन असावे, असे महाराजांचे मत आहे.

कोणाचीही भक्ती किंवा अनुभव प्रबल अथवा दुर्बल नाही. आपला दंभच भक्तीला व अनुभवाला दुर्बल करतो. वादामध्ये श्रुती, युक्ती, अनुभव ह्या तीन प्रमाणापेक्षां कोणतेही दुसरे प्रमाण बलवान् नाही. कारण अद्वैत हे स्वतःच बलवान् आहे, असे महाराज म्हणतात.

प्रतिबिम्बाच्या अपेक्षेनेच बिम्बत्वाचा आरोप होतो म्हणून प्रतिबिंबरूप जीवाच्या अपेक्षेने ब्रह्मच बिम्बरूप परमेश्वर होय. तो बिम्बभूत परमेश्वराचा देह अनध्यस्तविवर्त आहे, भ्रमाने कल्पिलेला नव्हे. म्हणून ब्रह्मज्ञानाने नाश पावत नाही. ती साकार मूर्ती जगताच्या उत्पत्ति, स्थिती, लय याकरिता मानलेल्या ब्रह्मा, विष्णु, महेश्वर या तीन मूर्तींहून चवथी आहे. तीच मूर्ती सृष्टिकाली रज, तम, सत्त्व या तीन गुणांच्या आश्रयाने ब्रह्म, शंकर, विष्णुस्वरूप भासते.श्रीशिवकृष्णांचे देह अनध्यस्तविवर्त म्हणून पूर्ण ब्रह्मस्वरूप असल्यामुळे अनन्यभक्तीने त्यांचे सेवन करावे.

श्रीगुरुमाहात्म्य सांगताना महाराज म्हणतात, प्रथम, भ्रमाने सृष्टी कशी उत्पन्न झाली हे श्रीगुरु सांगतात म्हणून ते ब्रह्मदेवस्वरूप आहेत. विघ्ननिवारण करून व आत्मप्राप्ती करून देऊन जन्ममृत्यू परंपरेपासून शिष्याचे संरक्षण करतात म्हणून श्रीगुरु श्रीकृष्णस्वरूप आहेत. ब्रह्मज्ञान देऊन मृत्युरूप संसाराचा नाश करतात म्हणून श्रीगुरू शंकररूप आहेत. सर्वांचा आद्यगुरू परमेश्वर होय, त्या गुरूच्या वचनानेच संसार प्रत्ययाला येतो आणि तोच आद्य गुरू परमेश्वर मुमुक्षूकरिता श्रीगुरुरूपाने प्रगट होऊन आपल्या आत्मज्ञानबोधक वाक्याने सर्व प्रपंचाचा नाश करतो, म्हणून ब्रह्मज्ञानापूर्वी श्रीगुरू ब्रह्मा—विष्णु—शिवस्वरूप आहेत. आत्मज्ञानानंतरही त्या आत्मज्ञानाने सद्गुरूंचा संसाराप्रमाणे अत्यंताभावरूप नाश होत नाही म्हणून सद्गुरू अनध्यस्तविवर्त आहेत, असे महाराज म्हणतात.

'ज्ञानोत्तरमपि ज्ञानान्न नाशः सद्गुरोर्यतः ।
अनध्यस्तविवर्तः स इति स्वमतनिर्णयः ।।'[227]



गुलाबराव महाराजांचा हा ग्रंथ लघुशरीरकसद्ग्रंथ असला तरी ज्याप्रमाणे विशाल वटवृक्ष वटबीजांच्या मध्ये सूक्ष्मरूपात वर्तमान असतो त्याप्रमाणे या छोट्या ग्रंथात अनेक विषयांचे मर्म प्रकट झाले आहे.

'स्वमत' चा अर्थ 'स्वतःचे मत' असा संकुचित अर्थ न घेता 'स्वेषां मतं स्वमतम् ।' असा विग्रह करून 'स्वेषाम्' म्हणजे सम्प्रदायप्रवर्तक म्हणजेच 'पूर्वसूरींचे' असा संबंध प्रदर्शित केला पाहिजे. 'स्वेषाम्' म्हणजे गुरू ज्ञानेश्वराचार्य आणि गुलाबराव महाराजांचे गुरू अर्थात् निवृत्तीनाथ, इ. तात्पर्य जे स्वमत मी प्रतिपादित करीत आहे ते केवळ माझे नसून आमच्या सम्प्रदायाचे प्रवर्तक असणाऱ्या सर्व गुरूंचे आहे हे सिद्ध होते, असा महाराजांचा आशय असावा.

महाराजांनी या ग्रंथाची रचना वेदान्त, भक्ती, व्यवहार, आयुर्वेद, तीर्थ, संप्रदाय, शास्त्र, इ. विविध विषयांवर केवळ स्वमत प्रदर्शित करण्यासाठी केली आहे. गुलाबराव महाराजांचे स्वतःचे सिद्धान्त, तत्त्वज्ञान समजून घेण्यासाठी श्लोकरूपात असलेला हा ग्रंथ फार महत्त्वाचा आहे. पद्यरूप असलेल्या या ग्रंथाची भाषा सोपी व प्रासादिक असल्याने आणि ग्रंथ वाचल्यानंतर सहज लक्षात राहतील असे श्लोक यात असल्याने या ग्रंथाला सुभाषितसंग्रहाचे स्वरूप आले आहे. महाराजांचे सिद्धांत आणि विचारसरणी सूत्ररूपाने लक्षात येण्यासाठी या ग्रंथाचे महत्त्व अनन्यसाधारण आहे.

## 16. संप्रदायकुसुममधु

'संप्रदायमधु' हा महाराजांचा 21 श्लोकात्मक लघुग्रंथ असून यात कोणत्या संप्रदायापासून कोणती भावना महाराजांनी घेतली आहे आणि कसा समन्वय केला आहे हे दाखवून दिले आहे व त्या संप्रदायाचे सार एकेका श्लोकात समाविष्ट केलेले आहे. 21 श्लोकांमध्ये 1. नारद पांचरात्र, 2. पाशुपत 3. शैव 4. शाक्त 5. पूर्णप्रज्ञ 6. रामानुज 7. निम्बार्क 8. राधिकावल्लभ 9. चैतन्य 10. वल्लभ 11. गाणपत्य 12. सौरागम 13. प्रत्यभिज्ञा 14. रामानंद 15. वैठ्ठल व 16. शांकर या 16 संप्रदायातून निवडक तत्वांचा समावेश मधुराद्वैत संप्रदायात गुणग्रहण आणि दोषत्याग तत्त्वावर केला आहे. याचे सुरेख वर्णन या लघुग्रंथात आढळून येते.

ग्रंथारंभी सृष्टीची उत्पत्ती, स्थिती व पालन करणाऱ्या भगवान वृषकेतूला नमस्कार केला असून 'हे प्रभो! माझ्या हृदयात येऊन ज्ञानेश्वररूपाने वास करा' अशी आर्त विनवणी महाराजांनी केली आहे. ईश्वरभक्तांचा विद्वेष करणे हानिकारक आहे. म्हणून सर्व संप्रदायांमधून मधुबिंदूंचे सेवन करावे म्हणून या सर्व संप्रदायांमधून भक्तिप्रेमाला पोषक असलेल्या उत्तम भावना मी ग्रहण केल्या आहेत, असे गुलाबराव महाराज म्हणतात.

संप्रदायाची व्याख्या करताना महाराज म्हणतात –

'गुरूक्ता सगुणोपास्तिवेदपौराणतंत्रगा ।
यत्रासौ संप्रदायोऽन्यच्छास्त्रं सर्वार्थदर्शनम् ।।'[228]

अर्थात् वेदानुसार, पुराणानुसार किंवा तंत्र मार्गानुसार जी सगुण उपासना श्री सद्गुरू सांगतात तोच 'संप्रदाय' होय. यानंतर 16 संप्रदायातील भक्तीला पोषक अशा भावना गुलाबराव महाराजांनी खालीलप्रमाणे सांगितल्या आहेत –

1. नारदपांचरात्र –वासुदेवाचा विग्रह हाच परमब्रह्म असून अनेक साधनांनी त्याची प्राप्ती करून घ्यावी अशी नारदपांचरात्रातील भावना घ्यावी.[229]



2. पाशुपत –जीवाचा पाश म्हणजे कर्मबंधन. या कर्मबंधनापासून निर्मुक्त असलेला, नित्य असलेला व मंत्रमय असलेला भगवान् शिव उपास्य आहे. ही भावना पाशुपतांपासून घ्यावी.[230]

3. शैव –सच्चिदानंद विग्रह आणि उमेसहित असलेल्या पंचवक्त्र शिवाची नेहमी उपासना करावी असे शैव संप्रदायातून घ्यावे.

'पशुपाशविनिर्मुक्तो नित्यो मंत्रमयः शिवः ।
एतावदेव संग्राह्यं पुष्पात्पाशुपतान्मधु ।।'[231]

4. शाक्त –सर्व स्त्रिया उमारूप असून त्यांचे ठिकाणी मातृभावना करावी. ही भावना शाक्तसंप्रदायातून घ्यावी.[232]

5. पूर्णप्रज्ञ –भगवान विष्णू स्वतंत्र असून इतर सर्व त्याच्या तंत्राने चालणारे तंत्रक आहेत. ही भावना पूर्णप्रज्ञाचार्यांच्या संप्रदायातून घ्यावी.[233]

6. रामानुज –विभवरूप, व्यूहरूप, सूक्ष्मरूप व अंतरात असलेल्या अशा श्रीहरीचे श्रौत, स्मार्त कर्मानुष्ठानसहित पंचविध अर्चन करून जीव परमेश्वर स्वरूपाला प्राप्त होतो अशी भावना रामानुजांपासून घ्यावी.

'पञ्चधेशार्चाविभवो व्यूहः सूक्ष्मोऽन्तरः स्थितः ।
भक्त्या गम्यः क्रमेणेति ग्राह्यं रामानुजान्मधु ।।'[234]

7. निंबार्क –भगवंताना नैवेद्य दाखविणे, भगवंताच्या प्रीतीसाठी दान करणे किंवा ज्यामुळे भक्त तृप्त होतील असे करणे हे दोन्ही एकरूपच आहे अशी निंबार्कांची भावना घ्यावी.[235]

8. राधिकावल्लभ –श्रीकृष्णाच्या चरणाची प्राप्ती करून घेण्यासाठी गोपीश्रेष्ठ राधेची सेवा करावी.[236]

9. चैतन्य –रासक्रीडेत श्रेष्ठ भगवान् श्रीकृष्ण वृंदावनात नित्य असतो. तो माधुर्यभक्तीनेच गम्य आहे. ही चैतन्य संप्रदायाची भावना घ्यावी.[237]

10. वल्लभ —बालरूप श्रीकृष्णाची वात्सल्यप्रेमाने पण मर्यादा राखून सेवा करावी, असे वल्लभ संप्रदायातून शिकावे.[238]

11. गाणपत्य —गणेश विघ्नहर्ता असल्यामुळे, नेहमी चिंता सोडून भगवत्प्रेमात मग्न राहावे, असे गाणपत्य संप्रदायातून शिकावे.[239]

12. सौरागम —आदित्यात असलेला पुरुष तोच मी आहे, अशी सौरागमातील उपासना घ्यावी.[240]

13. प्रत्यभिज्ञा —शिव अद्वैतस्वरूप असून सर्वांच्या हृदयात स्फूर्तिरूपाने तोच आहे व म्हणून सुलभही आहे व सर्वकर्ता आहे असे प्रत्यभिज्ञा मतातून घ्यावे.

'शिवोऽद्वैतः सर्वहृदि सुलभः स्फूर्तिरूपधृक् ।
सर्वकर्तेति संग्राह्यं प्रत्यभिज्ञासुमान्मधु ।।'[241]

14. रामानंद —अद्वैत अशा निर्गुण ब्रह्माचे ध्यान करावे आणि प्रमादरहित होऊन सद्गुरूंची सेवा करावी हे रामानंदांच्या संप्रदायातून शिकावे.[242]

15. वैठ्ठल —भगवान श्रीकृष्ण स्वधामी गेले नसून ते चंद्रभागेतीरी पंढरपुरात आपल्या भक्तांसाठी येऊन उभे ठाकले आहेत, असे वैठ्ठल संप्रदायातून घ्यावे.[243]

16. शांकर —ब्रह्म एकच असून भक्तांवर अनुग्रह करण्यासाठी अनेक रूपे धारण करतो. त्यापैकी कोणत्याही एकाचे भजन करावे. त्या रूपाशी भक्तीने ऐक्य झाले की मुक्ती मिळते हे शांकर तत्त्वज्ञानातून घ्यावे.

'एकं ब्रह्मानुग्रहार्थं बहुः स्यात्तं भजेत्सदा ।
मुक्तिर्यदैक्यात्संग्राह्यं शांकरात्कुसुमान्मधु ।।'[244]

ज्ञानाने अविद्येचा नाश झाल्यानंतर अनध्यस्त विवर्त साकार श्रीहरीचे भजन नित्य करावे हेच आमचे सर्वाधिक मधुर असलेले मधु आहे असे मधुराद्वैत संप्रदायाचे आद्यप्रवर्तक श्री गुलाबराव महाराज म्हणतात.



'अनध्यस्तविवर्तं हि साकारं श्रीहरिंभजेत् ।
ज्ञानाद् अविद्यानाशऽपीत्यत्यऽस्माकं मधुरं मधु ।।'[245]

निष्कर्ष : ''सकळ शास्त्रांची अनोळखी फिटे'' — ज्ञानेश्वरी.

सर्व शास्त्रांचे मूळ स्थान एकच आहे. ती सर्व सख्खी भावंडे आहेत, असे कळल्यावर सर्व मोह विलयाला जातो. महाराज म्हणतात, ''अद्वैतनिष्ठ असो की विशिष्टाद्वैतनिश्चयी असो, तो भगवंताचा दास असेल तर परब्रह्म स्थिती मिळविणारच!''

'अद्वैतद्वैतनिष्ठो वा विशिष्टाद्वैतनिश्चयी ।
हरेर्दासः परं याति हर्यदासः पतत्यधः ।।'[246]

याप्रमाणे विशेषांचा परित्याग करून सामान्याकडे दृष्टी ठेवली असता समन्वय होतो. या समन्वयाचे लक्षण महाराजांनी एका पत्रात केले आहे ते असे —

'एकाधिकरणक — भिन्नवृत्तित्वे सति,
संप्रदायविच्छेदरहितत्वे सति, च
पूर्वानेक — फलोपष्टंभ — अनन्तरम्
एकफलजनकत्वम् समन्वयलक्षणम् ।।'[247]

सर्व संप्रदायाचे अधिकरण एक ब्रह्मच आहे. सर्वांचे प्राप्तव्यदेखील ब्रह्मस्थितीच आहे. म्हणजे आधार आणि प्राप्तव्य एकच आहे. पण त्यांच्या वृत्ती मात्र वेगवेगळ्या आहेत. जसा समुद्र एकच असून त्यावरील लाटा भिन्न भिन्न असतात. पण कोणत्याही लाटेत बुडी मारली तरी स्नान एकाच समुद्रात होते. त्याप्रमाणे कोणत्याही संप्रदायाचा आधार घेतला तरी शेवटी ब्रह्मप्राप्तीच होते. लाटा एकाच समुद्रावर उत्पन्न होतात व त्यातच लय पावतात. त्याप्रमाणे सर्व संप्रदाय ब्रह्मावरच उदय पावतात व जीवाला ब्रह्मप्राप्तीच करून देतात.

ii) भिन्न भिन्न संप्रदायांचा समन्वय केला तरी ते संप्रदाय परंपरेपासून विच्छेद

पावत नाहीत किंवा नष्ट होत नाहीत. ते कायमच राहतात.

सर्व संप्रदाय त्या त्या संप्रदायानुरूप फळांकडे जीवांना प्रवृत्त करून अन्ततो गत्वा परब्रह्मप्राप्तीरूपी एकच फळ प्राप्त करून देतात, असे दाखविणे म्हणजे समन्वय होय.

iii) वाचस्पती मिश्रांनी देखील सांख्यतत्त्वकौमुदीत 'भिन्नानां समानरूपता समन्वयः ।' (कारिका 16) अशी व्याख्या केली आहे.

अशाप्रकारे 'संप्रदायकुसुममधु' या ग्रंथात 16 संप्रदायातून त्यांच्या भक्तीला पोषक भावना घेऊन त्यांचा महाराजांनी समन्वय साधला आहे. सर्व संप्रदायाविषयी समान भावना ठेवणारे गुलाबराव महाराज यांचा या ग्रंथातील प्रत्येक श्लोक स्वतंत्र सुभाषितासारखा प्रतीत होतो, हे या ग्रंथाचे वैशिष्ट्य म्हणता येईल.

या लघुग्रंथात दर्शविलेले संप्रदाय वैदिक असून भक्तीला पोषक असलेल्या त्यांच्या भावनांचे महाराजांनी ग्रहण केले आहे. परंतु मुस्लिम, ख्रिश्चन या धर्मात मुख्यतः व्यावहारिक तत्त्वेच अधिक आढळून येतात म्हणून त्यातील भावना ज्ञानोत्तर भक्तीच्या क्षेत्रात अगदीच गैरलागू असून अगदीच वेगवेगळ्या पातळीवरच्या आहेत. त्यामुळे महाराजांना त्यांच्या भावनांचा समन्वय करण्याची गरज वाटली नसावी.

सर्व वैदिक संप्रदायरूप कुसुमातील मधुबिंदू गोळा करून महाराजांनी रासक्रीडेतील श्रीकृष्णप्रेमाला निरनिराळ्या मधुर उन्मेष आणलेले आहेत. अद्वैतापासून ते कट्टर द्वैतापर्यंत सर्व वैदिक संप्रदायरूपी पुष्पातील मध गोळा करून महाराजांनी आपला अद्वैत संप्रदाय माधुर्यरसाने परिप्लुत केला आहे. असा समन्वयाचा प्रयत्न आजपर्यंत कोणीही स्पष्ट रूपाने केलेले नव्हता, त्यामुळे महाराजांचे संप्रदायासंबंधीचे हे समन्वयाचे नवीन वैशिष्टय आहे असे म्हणावे लागेल.



## 17. सच्चिन्निर्णयः

'सच्चिन्निर्णय' नावाच्या गद्यपद्यान्वित लघुप्रकरण ग्रंथात एकूण 36 श्लोक आहेत व काही गद्य भाग आहे. हा ग्रंथ दोन उल्लासात विभक्त आहे. 28 श्लोकांच्या पहिल्या उल्लासात 'सत्' पदार्थांचा निर्णय व 8 श्लोकांच्या दुसऱ्या उल्लासात 'चित्' पदार्थांचा निर्णय केला आहे.

सन्निर्णयः – 'सन्निर्णयः' नामक पहिल्या उल्लासात आळंदीस्थित परमात्म्याला नमस्कार करून गुलाबराव महाराजांनी ग्रंथारंभ केला आहे.

'अखण्डसच्चिदानन्दं पूर्णमद्वयमक्षयम् ।<br>
नमामि परमं ब्रह्म यदलन्द्यां विराजते ।।'[248]

आरंभी महाराजांनी स्पष्ट केले आहे की, आपल्या वर्णाश्रमानुसार योग्य कर्माच्या आचरणाने, शिव व श्रीकृष्णाच्या भक्तीने, त्यापासून झालेल्या ज्ञानाने पहिले चित्तशुद्धी, त्यानंतर चित्तस्थैर्य, त्यापासून मोक्ष प्राप्त होतो. यानंतर 'सत्' पदार्थाचा निर्णय करण्यासाठी सुरुवात केली आहे.

सत् पदार्थाच्या निर्णयासाठी काही प्रमाण आहे की नाही याचा विचार केला पाहिजे. जर प्रत्यक्ष प्रमाणाने निर्णय झाला तर ते प्रमाण त्या पदार्थापेक्षा भिन्न आहे की अभिन्न? जर सत् पदार्थच प्रमाण आहे तर मग कोणते दुसरे प्रमाणच नाही असे म्हणावे लागेल. जर प्रमाण सत् पदार्थाहून भिन्न आहे तर मग प्रमाणच नाही असे म्हणावे लागेल.

'तुष्यतु दुर्जनः' या न्यायाने प्रमाण घेतले तरीही त्याने कशाचीच सिद्धी होत नाही. ज्ञानेंद्रिय पाच असल्याने प्रत्यक्ष सुद्धा पाच प्रकारचे होते. मग त्या पाचात राहाणाऱ्या सत्तेचे ज्ञान कोणत्या प्रमाणाने होईल? तसे तर स्वप्न, इन्द्रजाल या दृश्यांमध्येही प्रत्यक्षत्व राहते आणि हे प्रत्यक्ष दिसणारे जगत् कोणत्याच प्रकारे स्वप्नाहून भिन्न नाही. बहुकाळापासून स्थिर बुद्धी असल्याने हे जगत् सत्य आहे असा भ्रम होतो. जसा विषय भ्रम आहे तसे त्याचे प्रमाणसुद्धा भ्रम असले पाहिजे.

जागृतावस्थेत अधिक काळापर्यन्त स्थिर बुद्धी असल्याने जर जगताला सत्य मानले तर सर्वकाळांमध्ये स्थिर राहणाऱ्या सत्तेला कां मानत नाहीत? त्याचे ज्ञान प्रत्यक्षाने होणार नाही. मग सत् पदार्थाचा निर्णय करण्यासाठी प्रत्यक्ष प्रमाण नाही. त्याच्यावर आधारित अनुमानसुद्धा प्रमाण होऊ शकत नाही. कारण सत् पदार्थ अनुमेय नाही. दुसऱ्या प्रमाणांनी सत् पदार्थाचे ज्ञान झाले तरी तो स्वयं असत् पदार्थ होईल. प्रमाताच नसेल तर प्रमेय आणि प्रमाणसुद्धा असत्य आहे. म्हणून आपल्याहून अभिन्न एक सत्पदार्थ ज्यामध्ये व्यभिचार नाही तो सत् एक असूनही ज्ञानाच्या विशेषणाने तो वेगवेगळा भासतो. जर जातीलाच सत्ता म्हटले तर विशेषण असत् होईल. तर असत् सत् चा आश्रय घेत असेल तर ते दोन भिन्न कसे? जेव्हा दोघांमध्ये भेदच नाही तर भेदावर आधारित साधर्म्य किंवा सादृश्य राहाणार नाही. केवळ सुखमय अशा सत्पदार्थात वैधर्म्याची कल्पना येऊ शकत नाही. अशाप्रकारे सत् पदार्थाच्या निर्णयात प्रत्यक्ष व अनुमान प्रमाण होऊ शकत नाही. हे स्पष्ट केल्यानंतर गुलाबराव महाराज उपमान, इ. प्रमाणांची चर्चा करतात.

सत् पदार्थासमान पदार्थ नसल्याने उपमान प्रमाण होऊ शकत नाही. उपलब्धी सत् पदार्थासाठी प्रमाण नाही. म्हणून परमश्रुती म्हणते, स्वअभिन्न, एक, स्वप्रकाश आणि सहज परब्रह्म सत्य आणि प्रमाण आहे. केवळ 'भूत' म्हटल्याने बालक घाबरतो. परंतु 'तो परत गेला' असे आईने म्हटले असता तो स्वस्थ होतो. तसेच स्वप्नासारखा हा सर्व व्यवहार शब्दांनी बनतो. ही केवळ माया आहे असे माता श्रुती म्हणते तेव्हा तो जीव स्वस्थ होतो. येथे जशी माता बालकाद्वारा कल्पित आहे तसेच येथे ईश्वर जीवकल्पित आहे. तरीसुद्धा मातेच्या वाक्याने बालकाचे दुःख जसे नष्ट होते तसे शिवाच्या वेदवाक्याने संसार निवर्ततो. जर असे म्हटले की अज्ञानासाठी प्रमाण कसे? जर कोणते प्रमाण असते तर ते ज्ञान कसे होईल? 'मी जाणत नाही' हेच यात प्रमाण आहे. अज्ञानाद्वारा जे कल्पित आहे ते ज्ञानाने दूर होते. अनादि ज्ञान ज्ञानोत्पत्तीपर्यंत राहते. त्यानंतर पुन्हा अज्ञानाची चिकित्सा होत नाही. जर कुणी म्हटले की, मी अज्ञानाला पाहात आहे तर यापेक्षा दुसरे



अज्ञान कोणते? अज्ञान कशापासून उत्पन्न होते? मानवापासून की अज्ञानापासून? पहिल्या विकल्पात अनवस्था होईल. दुसऱ्यात तो केवळ व्यवहार होईल. अर्थात् विरोध येईल, कारण अज्ञान ज्ञानापासून उत्पन्न होऊ शकत नाही.

अशाप्रकारे सत्ता पदार्थाच्या निर्णयासंदर्भात प्रमाणाची चर्चा केल्यानंतर गुलाबराव महाराज याचा उपसंहार करतात की, वेदान्त वाक्यांनी माया दूर झाल्यानंतर सुखी व्हायला हवे. शब्द केवळ अज्ञानाला दूर करतात. त्यानंतर स्वप्रकाश ब्रह्म केवळ राहते. हेच वेदरहस्य या ग्रंथात युक्ती व अनुभवाच्या बळावर सांगितले आहे.

'अविद्यानाशका शब्दाः ब्रह्म वेद्यं स्वयं बलात् ।
एतच्छ्रुतिरहस्यं वै प्रोक्तं युक्त्यनुभूतितः ।।'[249]

'युक्तीने पटवून देण्याचा माझा बाणा आहे.' असे गुलाबराव महाराजांचे वचन प्रसिद्ध आहे.

चिन्निर्णयः – 'चिन्निर्णयः' नावाच्या दुसऱ्या उल्लासात आठ श्लोक व काही गद्य भाग आहे. श्लोक विभागात सुरुवातीला श्रीकृष्णाला वंदन करून गुलाबराव महाराजांनी आपले विचार प्रस्तुत केले आहेत. पहिल्या उल्लासात जो सत् सांगितला आहे तोच भ्रमाचा आधार आहे. भ्रम दूर झाल्यावर तो सत् केवळ राहतो.

'अस्ति नास्तीति निर्णेतुं प्रवाहो यः प्रवर्तत्ते ।
स किं भानमभानं वा प्रथमे चिद्धि सिध्यति ।।'[250]

एखादा पदार्थ आहे की नाही याचा निर्णय करण्यासाठी जो ज्ञानप्रवाह असतो तो भान किंवा अभान आहे. जगात प्रमाता, प्रमेय, प्रमाणाचा सर्व व्यवहार भानाशिवाय होत नाही. जर तेच भान सत् आणि एक आहे तर अभान निष्प्रयोजन होते. एकाच पदार्थात भेद कसा राहील? या प्रश्नाचे उत्तर हे आहे की केवळ भानतापक्षात अभान राहणार नाही. जर भानच नसले तर भेदही राहणार नाही आणि अभेद आहे असे म्हटले तर भानही राहणार नाही. या दोघांना वेगळे समजू शकत नाही आणि

हे भानच चैतन्य आहे. ज्यात जाड्य राहात नाही. अशाप्रकारे स्वप्रकाशचैतन्यच 'चित्' पदाचा अर्थ आहे, असे स्पष्ट करून गुलाबराव महाराजांनी या विचाराला पुढे प्रवर्तित केले आहे.

प्रमाता, प्रमाण व प्रमेय यांच्यात समान भान असता एकता राहाणार नाही. तेव्हा सर्व व्यवहार होऊ शकणार नाहीत. असे जर म्हटले तर त्याचे उत्तर आहे की 'भाना' शिवाय त्यांचा व्यवहारलोपच होईल.

प्रमेय व प्रमाण यांचे काय लक्षण आहे? 'प्रमाणसाध्यं प्रमेयम् ।' असे म्हटले तर त्या प्रमाणाला सिद्ध करणारे प्रमाण आहे की नाही? जर असेल तर अनवस्था दोष होईल. जर नसेल तर प्रमाणही अप्रामाणिक होईल. 'लक्षण आणि प्रमाणाने वस्तुसिद्धी होते' हे वाक्य प्रमाणाचे लक्षण सांगत नाही. कारण त्यात प्रमाणाचे लक्षणच नाही. शास्त्रात असाधारण धर्म म्हणजेच लक्षण असे म्हटले आहे. धर्म धर्मीवर आधारित आहे. धर्मी तर द्रव्य असतो. जर प्रमाण लक्ष्य आहे तर तो धर्मी होईल. धर्मी असल्याने द्रव्य होईल. द्रव्य असल्याने प्रमेय होईल. प्रमेय लक्षण 'प्रमाणसाध्यम्' असे मानले तर पुन्हा प्रमाण येईल अशाप्रकारे चक्रिकापत्ती दोष येतो. म्हणून प्रमाणाची सिद्धी न झाल्याने प्रमेयही सिद्ध होणार नाही.

परंतु प्रमेयाच्या अनुमानाने प्रमाणाची सिद्धी होऊ शकते असे म्हटले तर त्यात अनेक दोष येतील.

1) प्रमेयाने प्रमाणाची सिद्धी व प्रमाणाने प्रमेयाची सिद्धी अशाप्रकारे अन्योन्याश्रय दोष येईल.

2) प्रमेयाद्वारे अनुमानाने प्रमाणाची सिद्धी मानली असता स्वात्माश्रय दोष येईल.

3) जेव्हा अशाप्रकारे प्रमेय – प्रमाण सिद्ध न झाल्याने प्रमाताही सिद्ध होणार नाही. तरीसुद्धा व्यवहार तर चालतो यावर गुलाबराव महाराज म्हणतात, हे सर्व ज्ञानमात्र आहे. मग त्याच्यात भेद कसा होईल? असे म्हटले तर त्याचे उत्तर आहे की, भेदसुद्धा ज्ञानमात्र आहे. जर भेद अज्ञानरूपी असता तर त्याच्या विरुद्ध ज्ञानाने



त्याची निवृत्ती कशी होईल? जर भेद ज्ञानरूपी आहे तर आत्माश्रय दोष होईल. असे म्हटल्यावर गुलाबराव महाराज म्हणतात की, येथे हे दोष प्राप्त होणार नाहीत आणि प्राप्त झाले तरीसुद्धा त्यांचे साहाय्य होत असल्याने ते दोष होत नाहीत.

यावर असे म्हटले की, हा वाद बौद्धांच्या विज्ञानवादासारखा आहे. यावर गुलाबराव महाराज म्हणतात की, बौद्धांचे विज्ञान क्षणिक आहे, वेदान्त्यांचे तसे नाही. यावर जर असे म्हटले की, भास्कराचार्यांच्या संप्रदायात जसे आहे तसे हे स्थिरविज्ञान आहे काय? तर यावर गुलाबराव महाराज म्हणतात की, हे विज्ञान त्यांच्यासारखे स्थिर नाही. कारण निद्रा व मूर्च्छा यांच्यामध्ये हे ज्ञान दिसत नाही आणि हा जैनांचा संशयवादही नाही कारण 'हा संशय आहे' अशी निश्चयात्मक वृत्ती त्यात राहते.

या विचारानंतर गुलाबराव महाराज वेदान्ताच्या दृष्टीने सिद्धान्त स्थापित करतात. एकच ज्ञानरूपी चैतन्य अज्ञानामुळे प्रमाता, प्रमेय, प्रमाण इ. रूपात भासमान आहे. हे अज्ञान सत्तेवर आधारित असून अनिर्वचनीय सदसद्विलक्षण, प्रकृती, माया, अविद्या इ. शब्दांनी सांगितले जाते आणि हे ज्ञान अज्ञानाला दूर करते. जसे बुद्धीमध्ये सूर्यकांतीचे स्पष्ट ज्ञान झाल्यावर पहिले पाहिलेले मृगजळ व त्या जळाचे ज्ञान दोनही दूर होते. ज्याप्रमाणे रज्जूचे स्पष्ट ज्ञान रज्जूच्या अज्ञानाला दूर करते. तसेच ज्ञान अज्ञानाला दूर करते.

यावर कुणी हे विचारले की चैतन्य ज्ञानरूपी असल्याने त्यात अज्ञान कसे होईल? तर यावर गुलाबराव महाराज विचारतात, अज्ञान होत नाही हे कोणत्या चैतन्यात आहे? सामान्यात की विशेषात? सामान्य चेतनेत अज्ञान संभव आहे विशेष चेतनेत अज्ञान न राहणे आम्हालाही स्वीकार्य आहे. अशाप्रकारे उपाधियुक्त चैतन्याची सिद्धी झाल्यावर उपाधिरहित चैतन्याचा विवेक करायला हवा. त्यामुळे उपाधिचाही नाश स्वयं होईल. असा जो विचार सांगितला आहे त्याचेही निराकरण समजायला हवे. कारण कल्पित पदार्थाचा अभावच अधिष्ठानाच्या रूपात असतो. यानंतर

'आलन्दिवल्लभं देवं सद्गुरुं करुणार्णवम् ।
नत्वा तत्पादयोर्ग्रन्थः परमप्रेम्णा समर्पितः ।।'[251]

असे सांगून 'चिन्निर्णयः' या द्वितीय उल्लासाची समाप्ती केली आहे.

अभिमत — या लघुग्रंथात 'सत्' आणि 'चित्' पदार्थाच्या अस्तित्वविषयक प्रमाणांची चर्चा केली आहे. प्रारंभी महाराज म्हणतात की, शिव किंवा श्रीकृष्ण यांच्या भक्तीने आणि आपापल्या वर्णाश्रमानुसार आचरण केल्याने ज्ञान किंवा भक्तीने (किंवा ज्ञानातून उत्पन्न झालेल्या भक्तीने) चित्तशुद्धी होते. त्याने मन स्थिर होवून शेवटी मोक्ष प्राप्ती होते. यानंतर महाराजांनी 'सत्' पदार्थाच्या निर्णयात प्रमाण काय होवू शकते यावर आपले विचार मांडले आहेत. पाचही इन्द्रियांनी होणाऱ्या प्रत्यक्षात सत्ता कोणत्याही प्रमाणाने ज्ञात होत नाही. प्रत्यक्षप्रमाणाने कोणत्याही कालखंडात स्थिर अशा सत्तेचे ज्ञान होणार नाही. अशाप्रकारे प्रत्यक्ष जेव्हा सत्तेचे ज्ञान करुन देत नाही, तर त्या प्रत्यक्षावर आधारित अनुमानच सत्य किंवा सत्तेच्या निर्णयासाठी प्रमाण होवू शकणार नाही.

याचप्रकारे उपमान, इ. प्रमाणे सुद्धा या सत्तेच्या अस्तित्वासाठी प्रमाण होत नाहीत. परंतु सत्ता किंवा सत्याचे ज्ञान केवळ स्वसंवेद्य आहे, असा श्रुतिप्रमाणाने अनुभव होतो.

सत्तेविषयी श्रुतिप्रमाण दाखवितांना महाराज म्हणतात की, हे सत्य चैतन्यापासून अभिन्न आहे, एक आहे, स्वप्रकाश आहे आणि सर्व विकल्परहित असे आहे. याचे ज्ञान केवळ श्रुतिद्वारेच होते. कोणाच्या तरी सांगण्यावरून यक्ष आहे अशी कल्पना करून लहान मूल घाबरते आणि आईच्या शब्दाने आश्वस्त होते तसेच मायारूपी या भयाने केवळ श्रुती साधकाला सत्याकडे घेऊन जाते. जसे आईच्या शब्दाने मुलाचे दुःख दूर होते, तसेच वेदरूप परमेश्वराच्या वाक्यांनी संसार दूर होतो. अज्ञानाने निर्मित हे सर्व ज्ञानाद्वारे दूर होते. यानंतर महाराज अज्ञानाची चर्चा करतांना म्हणतात की, अज्ञानाबाबत प्रत्येकाचा अनुभव प्रमाण आहे. जेव्हा कोणी 'मी हे जाणत नाही' असे म्हणतो, तोच अनुभव अज्ञानासाठी



प्रमाण आहे. हे अज्ञान ज्ञान होईपर्यंत राहते. हे अज्ञान सुद्धा ज्ञानापासून उत्पन्न होऊ शकत नाही आणि अज्ञानातून ज्ञानाची उत्पत्ती संभव नाही. म्हणूनच मायारूपी हे अज्ञान दूर झाल्यावर जीव आपल्या सुखस्वरूपात राहतो. हे स्पष्ट करून महाराजांनी याचा निष्कर्ष असा सांगितला आहे की, श्रुती हीच अविद्येला नष्ट करते, तेव्हा ब्रह्म स्वप्रकाशित होते हेच युक्ती आणि अनुभवाच्या आधारे सांगितलेले श्रुतिरहस्य आहे.

यानंतर महाराज 'चिन्निर्णयः' नावाच्या दुसऱ्या प्रकरणात 'चित्' पदार्थाचे स्वरूप स्पष्ट करतात की, एकच 'चित्' पदार्थ स्वतः प्रमाता, प्रमाण आणि प्रमेय या भेदाने भासमान होत अज्ञानाला दूर करतो. ते ज्ञानरूपी चैतन्य आहे. हे चैतन्याचे स्वरूप योगाचार बौद्धाच्या विज्ञानासारखे नाही. कारण योगाचार बौद्धदर्शनात विज्ञान हे क्षणिक असते. ब्रह्मवादात विज्ञान नित्य आहे, क्षणिक नाही तसे तर भास्कराचार्यांच्या सिद्धान्तात विज्ञान स्थिर किंवा नित्य आहे. तरी सुद्धा ब्रह्मवादात चैतन्य त्यापासून भिन्न आहे. कारण सर्व भेद ज्ञानरूप असल्यावर सुद्धा सुषुप्ती, मूर्च्छा, इत्यादित कोणताच भेद न राहिल्याने भेदाचे ज्ञान बाधित होते. तसेच हा जैनांचा संशयवाद किंवा स्याद्वादही नाही. कारण, हा संशय आहे असा निश्चय सुद्धा होतो. अर्थात् संशयाच्या निश्चयाने सुद्धा हा जैनांचा संशयवादही होत नाही.

अशाप्रकारे विविध मतांनी ब्रह्मवादांचे वैलक्ष्यण्य दाखवून महाराजांनी आपला सिद्धान्त असा स्पष्ट केला आहे — ''चैतन्य एकच आहे. ज्ञानरूपी आहे. तेच अनिर्वचनीय, प्रकृती, माया, अविद्या इ. नावाने प्रसिद्ध अज्ञानातून प्रमाता, प्रमाण, प्रमेय या तीन रूपांनी भासमान होते. तेच आपल्यापासून भिन्न असतांनाही आपल्याच प्रकाशावर आधारित अज्ञानाला दूर करते.'' यावर अशी शंका येऊ शकते की, चैतन्य ज्ञानरूप असल्याने चैतन्यात अज्ञान होणे सम्भव नाही. या शंकेच्या निराकरणार्थ महाराज म्हणतात, 'सामान्य चैतन्य, अज्ञानाला प्रकाशित करू शकते, वृत्ती विशिष्ट चैतन्यात अज्ञान न राहणे वेदान्ताला मान्य आहे. सर्व उपाधीपासून दूर केवळ चैतन्याला विवेकाने जाणल्यास उपाधी आपोआप दूर

होते, असे जे मत आहे ते सुद्धा योग्य नाही. कारण अधिष्ठानाचे रूप तेच आहे, जेथे कल्पित पदार्थाचा अभाव राहतो. जसे रज्जूवर सर्प हा कल्पित पदार्थ आहे. तो कल्पित पदार्थ न राहणे हे रज्जूचे अर्थात् अधिष्ठानाचे आपले रूप आहे.

अशाप्रकारे 'सत्' आणि 'चित्' पदार्थांचा निष्कर्ष महाराजांनी या ग्रंथात मांडला आहे.

सार — गुलाबराव महाराजांच्या 17 दार्शनिक ग्रंथांचे विवेचन केले असता महाराजांचे काही ठळक सिद्धांत या ग्रंथांमध्ये निदर्शनास येतात. महाराजांनी दर्शनांमधील दिसून येणारे विरोध कसे दूर करता येतील हे दाखवून दर्शन परस्परपूरक आहेत असेही स्पष्ट सांगितले आहे.

गुलाबराव महाराजांचे दार्शनिक विचार खालीलप्रमाणे आहेत —

1. हे जग 'श्रीकृष्ण' नावाच्या परम तत्त्वापासून निर्माण झालेले आहे. हा चैतन्याचा विवर्त आणि अज्ञानाचा परिणाम आहे.
2. 'श्रीकृष्ण परमेश्वर' आनंदस्वरूप व सर्व जीवांचा आश्रय आहे.
3. राजस आणि तामस या गुणांचा नाश करून केवळ सत्त्वगुणाची वृद्धी करणारा 'धर्म' होय.
4. जे उत्पन्न होते ते कार्य असून परिणामी व विवर्ती म्हणून याचे दोन प्रकार आहेत. ज्याच्यावर परिणाम होतो ते परिणामी आहे. आणि ज्याच्यावर परिणाम झालेला दिसतो पण होत नाही ते विवर्ती आहे.
5. प्रमा म्हणजे कधीही कुठल्याही साधनाने बाधित न होणारे ज्ञान.
6. प्रमाण म्हणजे तशा प्रकारच्या ज्ञानाचे साधन.
7. प्रत्यक्ष, अनुमान, उपमान आणि शब्द — ही चार प्रमाणे आहेत.
8. ईश्वराच्या अस्तित्वासाठी शब्द एकमात्र प्रमाण आहे. त्यामध्ये वेद मुख्य



प्रमाण आणि वेदवाक्याला अनुसरणारे शास्त्र वाक्य गौण प्रमाण आहे. शब्द नित्य आहे. शब्दात स्वतःचा अर्थ सांगण्यासाठी आवश्यक सामर्थ्य म्हणजेच 'शब्दशक्ती' होय.

9. एक नित्य स्फोट नावाचे पद व्यस्त किंवा समस्त वर्णांने अभिव्यक्त होते. परमेश्वर स्वयं निमित्त आणि उपादान कारण असून शब्द आणि अर्थ या स्वरूपाने व्यक्त होतो.
10. आत्म्याची नित्यता सिद्ध केल्याने परमेश्वराचे अस्तित्व सिद्ध होते.
11. केवळ योगाच्या बळाने ईश्वर आणि जीव यांच्या एकत्वाचे ज्ञान शक्य नाही. तेव्हाही शब्द प्रमाण आवश्यकच आहे.
12. वैदिक वाक्यांमध्ये अन्नमयादि अनुवादक वाक्य ईश्वराविषयी विधिवाक्यच आहेत.
13. सगळ्या पदार्थांमध्ये असलेली शक्ती ईश्वराची शक्ती आहे.
14. शास्त्रांमध्ये परस्परविरोध दिसले तर असा समन्वय करावा की, धर्मांमध्ये परस्पर विरोध असला तरी धर्मी एकमात्र परमेश्वर यात काही विरोध नाही.
15. वेदान्तींचा ब्रह्मा सांख्यदर्शनात परमप्रधान मानला गेला आहे.
16. बौद्धांचे शून्यतत्त्व गणितशास्त्रातील शून्यासारखे आहे. हे शून्यतत्त्व गौडपादकारिकेतसुद्धा सांगितले आहे.
17. वेगवेगळ्या दर्शनांचे कर्तेसुद्धा आपल्या शास्त्राचे चांगले ज्ञानी आहेत. म्हणून त्यांना भ्रम होण्याची शक्यता नाही. म्हणून शब्द व प्रत्यक्ष प्रमाणाने समन्वय सिद्ध होतो.
18. ब्रह्मसूत्रात व्यासमहर्षीनी सांख्य, इ. दर्शनांचे जे खण्डन केले आहे, ते केवळ वेदनिष्ठा वाढविण्यासाठी आहे, दर्शनांच्या खंडनाकरिता नाही.

वादात जयपराजयाच्या दृष्टीने खण्डन केलेले आहे, तत्त्वप्रतिपादनाकरिता नाही.

19. नैयायिकांच्या आरंभवादातसुद्धा मायेपासूनच सृष्टी निर्माण झाली आहे असे मानणे आवश्यक आहे.

20. विवर्त 2 प्रकारचा असतो. 1) अध्यस्त 2) अनध्यस्त. रज्जूसर्पादि अध्यस्त विवर्त आहे. कनककुण्डलादि अनध्यस्त विवर्त आहे.

21. वेदान्तात प्रपंच अध्यस्त विवर्त आहे, जो अनित्य आहे. मधुराद्वैतसंप्रदायात भगवंताचा विग्रह अनध्यस्त विवर्त आहे व नित्य आहे.

22. कोणत्याही वस्तूमध्ये असूनही जो कोणत्याच उपाधीहून संपादित केलेला नसतो तो त्या वस्तूचा स्वगत धर्म आहे. जाती, व्यक्ती, इ. भेदाने तो 18 प्रकारचा आहे.

23. शरीर स्वेदज, उद्‌भिज्ज, जरायुज व अंडज अशा चार प्रकारचे असते आणि पाचवे मनोज प्रकारचे शरीरही असते. जसे ब्रह्माच्या मानस पुत्राचे.

24. सत्ता पारिमार्थिकी व प्रातिभासिकी अशा भेदांनी दोन प्रकारची असते. व्यावहारिक सत्ता नसते.

25. ज्यामुळे सत्त्वगुणाची वृद्धी होते आणि इतर गुणांचा नाश होतो तो 'धर्म'.

26. तीव्र तपस्या करणाऱ्यांना कर्मांनी व गुणांनी ब्राह्मणत्व मिळते. आपापल्या धर्मानुसार आचरण करीत असताना एक मुख्य विषय हा आहे की, धर्माचरण केले नाही तर दोष येतो, परंतु आचरणाच्या नावाखाली स्वविवेक सोडून त्यालाच महत्त्व देणे मूर्खता आहे.

27. उपनिषदांमध्ये जी पञ्चीकरण, त्रिवृत्करण, वाक्ये सृष्टीचे प्रतिपादन करतात. त्यांचे तात्पर्य सृष्टीत नाही. परंतु चैतन्यात आहे. म्हणून सृष्टिमीमांसा व्यर्थ आहे.



28. मनांचे दृढरूपच विश्व आहे. मध्यमावस्था स्वप्न आहे आणि मृदू अवस्था कल्पना आहे.

29. विवेकज्ञानाकरिता सांख्यदर्शन, चित्तवृत्तिनिरोधाकरिता योगदर्शन, परमार्थासाठी वेदान्तदर्शन आवश्यक आहे.

30. विद्वान्, आत्मानुभवी व भक्त अशा पुरुषालाच 'गुरू' म्हणावे. तसेच श्रुती, स्मृती व पुराण यांनाच 'शास्त्र' मानले पाहिजे.

31. पुण्यकर्माने चित्तशुद्धी होते. उपासनेने स्थिरता येते आणि ज्ञानाने मुक्ती मिळते. तरीसुद्धा प्रारब्धाचा नाश भक्तीनेच होतो.

32. समाधिस्थितीत व्यतिरेक रूपात ब्रह्माचे ज्ञान होते, तर भक्तीत ब्रह्माचे ज्ञान अन्वयरूपाने होते.

33. शंकराच्या पूजेने आसक्ती नष्ट होते. परंतु वासनेचाही नाश श्रीकृष्णाच्या भक्तीने होतो.

34. आपल्या पक्षाचे समर्थन श्रुती, युक्ती व अनुभवाने करायला हवे. दुसऱ्यांचे खण्डन केवळ तर्काने करायला हवे.

35. जो लौकिक विषयांमध्ये आसक्ती ठेवतो, परंतु 'अहं ब्रह्मास्मि ।' असे म्हणतो तो नीच आहे.

36. आचार्यांच्या कृपेने विघ्ननाश होतो, तरी सुद्धा साधकाने आपल्या बुद्धीने विचार करायला हवा आणि मूर्तीच्या ठिकाणी ब्रह्मभावना करावी पण ब्रह्माचे ठिकाणी मूर्तिदृष्टी करू म्हणजे तो केवळ विग्रह आहे अशी बुद्धी ठेऊ नये.

37. आळंदी, हिमालय (केदारादि), काशी, प्रयाग, मथुरा (वृन्दावन) आणि पंढरपूर हीच 6 तीर्थक्षेत्रे आहेत. जन्माष्टमी, शिवरात्री, गोपीपूजा, गुरूचा उत्सव हे चार उत्सव सर्वदा सर्वांनी पाळावे. श्रीराम जन्मोत्सव,

नृसिंहजयंती व दत्तात्रेय जयंती हे उत्सव नेहमी साजरे करावेत.

38. प्रत्येक संप्रदायात कोणता ना कोणता उत्तम गुण असतो. तो ही आम्ही स्वीकारायला हवा.

39. आत्म्याहून अभिन्न, एक, स्वप्रकाश, अविकल्पक, सत्य परब्रह्म प्रमेय आहे आणि त्यासाठी वेद प्रमाण आहेत. ती वेदवाक्येच अविद्येला नष्ट करू शकतात.

40. धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे चार पुरुषार्थ आहेत. तरीसुद्धा मुख्य भक्ती हा पंचम पुरुषार्थ आहे. भक्तीनेच धर्माचे फळ प्राप्त होते. ही भक्ती परमपुरुष नारायणात नित्यप्रेमाच्या रूपात राहते. या भक्तीनेच ज्ञान होते आणि ज्ञानानंतर होणारी 'पराभक्ती' आहे. म्हणूनच पतंजली महर्षीनी सुद्धा योगसूत्रांमध्ये 'ईश्वरप्रणिधाना' च्या रूपात भक्तीला विशिष्ट स्थान दिले आहे.

41. भक्तीशिवाय कर्म, योग व विज्ञान हे तीनही व्यर्थ आहेत. ईश्वरावर विश्वास, 'ईश्वर आहे' अशी ज्याची बुद्धी आहे असा कुणीही भक्तीचा अधिकारी आहे. तो ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र आणि अन्त्यजही असू शकतो.

42. मन जेव्हा द्रवीभूत होते तेव्हा जो संस्कार 'अहम्' अशा ज्ञानाने वेगळा भासमान होतो, तो रसच 'भक्ती' म्हणविला जातो. हीच पराभक्ती आहे. बाह्य प्रपंचापासून हा प्रेमरूपी रस मिळणे संभव नाही. म्हणून भगवान् श्रीकृष्णाचा आश्रय घ्यायला पाहिजे.

43. जोपर्यंत मन द्रवीभूत होत नाही तोपर्यंत ज्ञानही होत नाही. तर मग भक्ती कशी होणार?

44. शिव केशवांमध्ये भेद नाही. हे अनेक शास्त्रवाक्यांनी सिद्ध होते. शिव किंवा केशव यांपैकी कोणताही गुरू होऊ शकतो.



45. शंकराचार्यांनीदेखील देवी—अपराधक्षमापनस्तोत्र, इ. कृतींमध्ये ज्ञानोत्तर भक्तीचेच समर्थन केले आहे.

46. भागवतमहापुराण 'समाधी' अर्थाने परिपूर्ण आहे. म्हणून व्युत्थान किंवा जाग्रत दशेत त्याचा अर्थ समजणे कठीण आहे.

47. समाधीमध्ये जो अर्थ स्फुरण पावतो. तो म्हणजे 'वेद' आणि जाग्रत दशेत त्याचे स्मरण म्हणजे स्मृती. म्हणून श्रुतीचा समन्वय श्रुतीनेच करायला पाहिजे, स्मृतीने नव्हे.

48. 'सांख्य' या शब्दाचा अर्थ 'उपनिषद् ब्रह्मज्ञान' असा आहे. कारण 'सम्' या उपसर्गाचा 'सम्यक्' किंवा 'एक' या अर्थात् 'ब्रह्म' हाच लक्ष्यार्थ आहे. 'ख्या' धातूचा अर्थ 'सांगणे' असा आहे. म्हणून 'सांख्य' म्हणजे 'ब्रह्मज्ञान' हा अर्थ होऊ शकतो. म्हणून 'प्रकृति—पुरुष' शब्दांचाही 'अविद्या' आणि 'ब्रह्म' असा अर्थ होऊ शकतो.

49. ब्रह्मज्ञानासाठी सांख्य व वेदान्त प्रमाण आहेत. त्यांच्यात सांख्याने आत्म्याचा सामान्य विवेक होतो किंवा 'त्वम्' पदार्थाचे ज्ञान होते किंवा सत् व चित् अंशाचा अनुभव होतो. परंतु वेदान्ताने विशेष विवेक होऊन तत्पदार्थाचे ज्ञान होते आणि आनंदांशाचा अनुभव येतो.

50. बुद्धीत प्रतिबिंबित जीवाला जन्म, मरण असते, शुद्ध चैतन्याला नाही म्हणून बन्ध किंवा मोक्ष आत्म्याला नाही. बन्ध व मोक्षाचे कारण मन हेच आहे.

51. सांख्यदर्शनात जे पुरुषबहुत्व सांगितले आहे, ते केवळ औपाधिक आहे कारण सांख्यभाष्यात तसेच प्रतिपादित केले आहे. मधुराद्वैत संप्रदायात देखील अंश, अवच्छेद, प्रतिबिम्ब, आभास हे सर्व औपाधिकच मानलेले आहे.

52. ज्ञान, वैराग्य व भक्ती ही तीनच आत्मप्राप्तीची साधने आहेत.

53. 'त्वम्' पदाचा लक्ष्यार्थ जे आत्मप्रेम आहे, तोच अभिमान सोडून 'सर्वं ब्रह्म' या बुद्धीने जेव्हा 'तत्' पदार्थ ईश्वराला लावला जातो तेव्हा तो प्रेम म्हणजेच 'भक्ती' असा असतो. भक्ती नसेल तर ज्ञान्याला व्युत्थान दशेत अहंकार होऊ शकतो. म्हणून ज्ञानानंतरच भक्ती आवश्यक आहे. तेव्हा कर्मयोग, ध्यानयोगातसुद्धा भक्तीच्या आवश्यकतेविषयी काय सांगावे?

54 ज्ञान्यातसुद्धा अविद्येचा लेश असतो. तो विक्षेपरूप असतो. परमेश्वर त्याला सुद्धा आपल्या अधीन ठेवतो. म्हणून परमेश्वराप्रती भक्तीने विक्षेपाचा नाश होतो.

55 जीवन्मुक्तदशेत बिम्बभूत परमेश्वराचे अनध्यस्त विवर्त शरीर (विग्रह) लीलारूपाने अनुभवाचा विषय होतो. म्हणून जीवन्मुक्तीतसुद्धा भक्तीचाच आश्रय घ्यावयास हवा. जीवन्मुक्तीतच नव्हे तर विदेहमुक्तीतही भक्ती शक्य आहे आणि ही भक्तीच प्रेमस्वरूप असल्याने मुक्ती आहे. अर्थात् भक्ती फळ आहे. भक्तीच्या साम्राज्यात जातीचा नियम नाही.

56. भक्तीमध्ये 'मी भोक्ता आहे' हा अभिमान नष्ट होऊन परमेश्वराप्रती प्रेमाची धारा अखंड वाहते. त्याच भक्तीला घेरण्ड आचार्य 'समाधी' किंवा 'मनोन्मनी' असे म्हणतात.

57. मधुसूदन सरस्वतींनी अद्वैतसिद्धीत ज्ञानानंतर भक्तीची अपेक्षा राहत नाही, असे जे म्हटले आहे, ते केवळ साधनभक्तीविषयी आहे, फलभक्तीविषयी नाही. या भक्तीतसुद्धा परमानन्दरूपात जीव व ईश्वर एक होतात. कर्मयोगात कर्माचे अर्पण हीच ईश्वरभक्ती आहे. भक्तीमध्ये कर्माची अपेक्षा नसते. परंतु कर्मात भक्तीची अपेक्षा असते.

58. ज्ञानी योगाभ्यासरूपाच्या प्रयत्नांनी प्रारब्धाला जिंकू शकत नाही. त्यासाठी त्यालाही भक्तीची आवश्यकता असते.

59. जसे वेदान्ती तत्त्वज्ञान, मनोनाश व वासनाक्षय या तिघांना मिळून



जीवन्मुक्त अवस्थेचे साधन मानतात. तसे मधुराद्वैत संप्रदायात तत्त्वज्ञान, वैराग्य आणि पराभक्ती हे जीवन्मुक्त अवस्थेचे साधन मानले जाते.

60. ब्रह्मज्ञानानंतरही गुरूची अपेक्षा राहते. हेच ज्ञानेश्वर महाराजांचे मत आहे.

61. ज्ञान्यालासुद्धा प्रारब्ध भोगावेच लागेल, असे जे म्हटले जाते ते साधारण लोकांच्या समाधानाकरिता आहे. वस्तुतः ज्ञानोत्पत्तीनंतर प्रारब्ध राहत नाही, हेच शास्त्रसिद्ध बाहे.

62. अंतिम जन्मात ज्ञान उत्पन्न होते, असे म्हणणे योग्य नाही. परंतु ज्या जन्मात ज्ञान उत्पन्न झाले तोच अंतिम जन्म आहे हे म्हणणे योग्य आहे.

63. राग, द्वेष, मोह या तीन दोषांनी जेव्हा मन पूर्ण होते. तेव्हा रोग उत्पन्न होतात. अधर्माने रोग होतात व धर्माने स्वास्थ्य लाभते. रागाने वात, द्वेषाने पित्त व मोहाने कफ उत्पन्न होतो. यासर्वांवर औषध केवळ 'सत्संगती' हेच आहे. आहारावर नियंत्रण ठेवल्याने इंद्रिये व मन काबूत राहतात. सात्त्विक आहार आणि ईश्वरभक्ती सर्व रोगांवरचे औषध आहे.

64. व्यक्तीचे प्रमाद स्थूल दशेला आले म्हणजे 'रोग' ही संज्ञा धारण करतात. विकार हेच स्थूलरूपाला आहे की रोगरूप होतात.

65. सर्व प्रकारच्या व्याधी या दुष्कर्मावर अवलंबून असतात आणि दुष्कर्मासाठी पूर्वीचा प्रज्ञापराध कारणीभूत असतो.

66. संतांचा उपदेश देहाला होऊ शकत नाही आणि आत्म्याला होऊ शकत नाही. तर देह व आत्म्यांना साधंणारा दुवा म्हणजे 'मन' होय. म्हणून त्यालाच उपदेश करणे योग्य आहे.

67. अन्तःशुद्धीसाठी मानसिक त्यागाबरोबर कायिक त्यागही आवश्यक आहे.

68. सर्व रोगांचे मुख्य कारण 'अधर्म' हेच होय. सर्व रोगांवर खरे औषध म्हणजे अत्यंत श्रद्धेने श्रीहरीची सेवा करणे हेच होय.

69. प्रारब्धाभिभव करण्यासाठी मानसिक व्याधी दूर करण्यात वेदान्त व योगाचा आश्रय घ्यावा. तर शारीरिक व्याधी दूर करण्यासाठी वैद्यकशास्त्राचा आधार घ्यावा.

70. पामरांना विषयसुख मिळविण्यासाठी, विषयी लोकांना धर्मपरिहार होण्यासाठी, मुमुक्षूंना तितिक्षावर्धनार्थ व परोपकारार्थ, सिद्धाना भक्तियोग वेदान्ताप्रमाणे प्रारब्धाचा अभिभव करण्यासाठी वैद्यकशास्त्राचा उपयोग होतो.

71. प्रारब्धाभिभव करण्यासाठी व मानसव्याधिजय मिळविण्यासाठी योगाचा आश्रय करावा व शारीरव्याधिजयासाठी औषधींचा उपयोग करावा.

गुलाबराव महाराजांच्या संस्कृतमध्ये असलेल्या सर्व दार्शनिक रचनांचे अध्ययन केले व त्यांचे वरीलप्रमाणे दार्शनिक विचारही जाणून घेतले. त्यावरून असे लक्षात येते की, 'ईश्वरदर्शनम्' हा ग्रंथ सूत्रस्वरूपाचा असल्याने जेथे गुरु व शिष्याचा मौखिक संप्रदाय अखंडित आहे आणि जेथे सूत्रकार स्वतः आपल्या शिष्यांना सूत्राचा अर्थ समजावून सांगतो किंवा त्या सूत्रांवर स्वतः भाष्य किंवा व्याख्यान करतो, तेव्हा त्या संप्रदायाच्या सूत्रग्रंथांचा समन्वय होतो. या सूत्रांवर सूत्रकाराचे किंवा त्या संप्रदायातील अन्य प्रामाणिक व्यक्तीचे भाष्य किंवा व्याख्यान नाही, तसेच काही सूत्रांमध्ये मुद्रणदोष असल्याने मुद्रित सूत्रपाठाने सूत्रांचा अन्वय होत नाही. उदा. 'उपाध्यवच्छेदानवच्छिन्नः ।' ऐवजी 'उपाध्यवच्छेदेनावच्छिन्नः ।' असे असते तर सूत्राचा अन्वय झाला असता. सूत्रांवर प्रामाणिक व्यक्तीचे भाष्य असते तर सूत्र स्पष्ट झाले असते.

'समसूत्री' या ग्रंथात महाराजांनी काही प्रमुख सांख्यसिद्धान्तांची समसूत्री बनविण्याचा संकल्प केलेला आहे. परंतु दुःखत्रय सोडून सांख्यदर्शनाचा कोणताच प्रमुख सिद्धांत सूत्रबद्ध केलेला नाही, असे आढळून येते. ग्रंथ अपूर्ण असल्याने असे झाले असे म्हणता येईल.



'न्यायसूत्राणि' या ग्रंथात साधारण तर्कापेक्षा वेदान्त तर्क दर्शविला असून त्याला ''निगमान्त तर्क' असे नाव दिलेले आहे. उपलब्ध दार्शनिक ग्रंथांमध्ये आवश्यक असलेले 'हेत्वाभास' हे कुठेही दिसत नाहीत. 'न्यायसूत्रम्' व 'न्यायसूत्रविवरणम्' या ग्रंथांचे नामसाधर्म्य वगळता अन्य संबंध दिसून येत नाही. 'न्यायसूत्रम्' या ग्रंथात दर्शनांचा केवळ परिचय करून देण्यात आलेला आहे. 'न्यायसूत्रविवरणम्' या ग्रंथाच्या प्रथम निर्णयात कारण, द्वितीय निर्णयात लक्षण आणि तृतीय निर्णयात प्रमाणाचे विवरण केलेले आहे. द्वितीय निर्णयातील सर्व सूत्रे न्यायसूत्रभाष्यांवर आधारित आहेत. तसेच तृतीय निर्णयातील प्रत्यक्ष व अनुमानासंबंधी सूत्रे ही गौतमन्यायसूत्रांवर आधारित असल्याचे आढळते.

'युक्तितत्त्वानुशासनम्' या ग्रंथात सांख्य, योग, न्याय व वेदान्त दर्शनांच्या आधारे वेगवेगळ्या पदार्थांचे विवेचन गुलाबराव महाराजांनी केलेले आहे. यात परिमाण, क्रिया, गुण, स्नेह या पदार्थांच्या विवेचनात विलक्षणता दिसते. न्यायशास्त्रात अणू, महत्, दीर्घ आणि ह्रस्व असे चार प्रकारचे परिमाण सांगितले आहेत. परंतु गुलाबराव महाराजांनी ह्रस्व व दीर्घ परिमाणांना मध्यम परिमाणात अंतर्भूत केले आहे. महाराजांच्या मते, अत्यंत सूक्ष्म परिमाण म्हणजे 'अणू' व अत्यंत महत् परिमाण म्हणजे 'विभू'. म्हणून ही दोन परिमाणे सोडून मध्यम परिमाण जे असेल त्यात ह्रस्व व दीर्घ राहू शकतो. म्हणून परिमाण तीन प्रकारचे आहे असे महाराजांचे म्हणणे युक्तिसंगत वाटते.

वैशेषिक दर्शनात 24 गुण मानलेले आहेत. मात्र गुलाबराव महाराजांनी केवळ रूप, रस, गंध, स्पर्श, परिमाण, गुरुत्व, द्रवत्व, स्नेह, अदृष्ट व शब्द असे 10 गुण मानले आहेत. वैशेषिकांच्या 24 गुणापैकी संख्या, पृथक्त्व, संयोग, विभाग, शब्द, परत्व, अपरत्व, बुद्धी, सुख, दुःख, इच्छा, द्वेष, प्रयत्न, धर्म, अधर्म, संस्कार, भावना हे गुण दिसत नाहीत. या गुणांचा अंतर्भाव कशात होऊ शकतो, हे या ग्रंथावरून स्पष्ट होत नाही. जसा परिमाणात ह्रस्व, दीर्घ परिमाणाचा अंतर्भाव मध्यम परिमाणात केला, तसा गुणांचा अंतर्भाव करणे सुद्धा सुकुमारमतिकरिता आवश्यक

वाटते. तसेच स्नेहाचे दोन प्रकार महाराजांनी सांगितले आहेत. 1) बुद्धीने होणारा 2) पाण्याने होणारा. बुद्धीने होणाऱ्या स्नेहाचे उदा. पक्षी व वृक्षांचा संयोग. गुलाबराव महाराज याला स्नेहाचा प्रकार मानतात. परंतु बुद्धीने होणारा हा संयोगाचाच प्रकार असायला हवा. जर सतत अशाप्रकारचा संयोग झाला असता तर तो वासनेमुळे होणारा संयोग असे म्हणणे उचित होईल. तेव्हा त्याला स्नेहाचा प्रकार मानण्याची आवश्यकता राहाणार नाही.

गुलाबराव महाराजांनी 'स्मृती' ला यथार्थ ज्ञानाचा प्रकार मानला आहे. शास्त्र संप्रदायात स्मृती म्हणजे 'यथार्थ ज्ञान' याबाबत एकमत नाही. कारण ज्याप्रकारच्या अनुभवाने स्मृती होते, ती त्याच प्रकारची होते. अर्थात् यथार्थ अनुभवाने यथार्थ स्मृती व अयथार्थ अनुभवाने अयथार्थ स्मृती होते. म्हणून स्मृतीला यथार्थ म्हणणे एकपक्षीय मत आहे. यथार्थ ज्ञानाचे चार प्रकार गुलाबराव महाराजांनी सांगितले आहेत. ते म्हणजे संस्कार, स्मृती, प्रत्यभिज्ञा व प्रमा. शास्त्रसंप्रदायात यथार्थ ज्ञानालाच 'प्रमा' म्हणतात. तेव्हा यथार्थ ज्ञानाचा 'प्रमा' हा प्रकार आहे, असे म्हणणे योग्य वाटत नाही. कारण पर्यायी शब्द हा प्रकार मानला जात नाही.

'षड्दर्शनलेशसंग्रह' या ग्रंथात पूर्वमीमांसाशास्त्रानुसार सहा प्रमाण सांगून त्यात 'अनुपलब्धि' प्रमाणाचे लक्षण गुलाबराव महाराजांनी 'अभावज्ञानमनुपलब्धि' असे दिले आहे. अर्थात् अभावाचे ज्ञान म्हणजे 'अनुपलब्धी' प्रमाण आहे. तेव्हा अशी शंका येते की, या प्रमाणाने होणारे ज्ञान कोणते आहे? कारण मीमांसाशास्त्रात अनुपलब्धी प्रमाणाने अभावज्ञान होते. तर मग अनुपलब्धीचे 'अभावज्ञान' असे लक्षण केल्याने अनुपलब्धी प्रमाणाचे फळ काय आहे? अशी शंका उत्पन्न होते. केवळ प्रत्यक्ष प्रमाणाने ही समस्या दूर होऊ शकते. त्यात 'प्रत्यक्ष' यालाच प्रमाण व प्रमाणाचे फळ सांगितले आहे, तसे येथे अभावज्ञान प्रमाण आहे व प्रमाणाचे फळही आहे. परंतु इन्द्रियार्थसन्निकर्ष हे प्रत्यक्ष प्रमाण आहे आणि सविकल्प किंवा निर्विकल्प ज्ञान त्याचे फळ आहे. अभावज्ञानात अशाप्रकारचा कोणता तरी भेद



दाखवावा लागेल.

'तत्त्वबोध' या ग्रंथात गुलाबराव महाराजांनी प्रातिभासिक सत्तेचे लक्षण 'ब्रह्मज्ञानं विनाऽपि बाध्यते, तत्प्रतिभासिकम् ।' असे दिले आहे आणि व्यावहारिक सत्तेचे लक्षण 'ईश्वरादिकस्य जगतो व्यावहारिकी सत्ता' असे दिलेले आहे. परंतु, ज्याप्रमाणे शुक्तिवर रजताचा आरोप होतो, तसाच ब्रह्मावर (चैतन्यावर) जगताचा आरोप होतो. जसे रजताचा आरोप झाल्याने प्रातिभासिक अस्तित्व म्हटले जाते, तसे आरोपित झाल्यामुळे जगताचे अस्तित्वसुद्धा प्रातिभासिकच मानले जाते. म्हणून 'परत्रपूर्वदृष्टावभासः' हेच प्रातिभासिक सत्तेचे लक्षण मानणे योग्य वाटते. तसेच या ग्रंथात 'ब्रह्म न बाध्यते । तच्च ज्ञेयम् ।' असे जे म्हटले आहे, त्याचासुद्धा पुनर्विमर्श व्हायला हवा. कारण उपनिषद् पारमार्थिक ब्रह्माला 'ज्ञान' मानतात, 'ज्ञेय' नाही. 'सत्यं ज्ञानं अनन्तं ब्रह्म' हे तैत्तिरीय उपनिषदाचे वाक्य यासाठी प्रमाण आहे. तसेच बृहदारण्यक उपनिषद् 'विज्ञातारमरे केन विजानीयात् ।'[252] या वाक्याने ब्रह्म ज्ञानस्वरूपी आहे, ज्ञेयस्वरूपी नाही असे म्हणते. जे ज्ञेय आहे ते सगुण ब्रह्म म्हटले जाते. सत्तेविषयी हाच विषय स्पष्ट करतांना गुलाबराव महाराज म्हणतात, 'न व्यावहारिकं तृतीयं सत्यमस्ति ।'

अशाप्रकारे महाराजांचे दार्शनिक विचार जाणून घेतल्यानंतर पुढील प्रकरणात त्यांच्या वेद व पुराणविषयक ग्रंथांचे अध्ययन करण्यात येईल.

— संदर्भ —


1. ई.द.1 |1 |1
2. ब्र.सू. 1 |1 |1
3. ब्र.सू. 2 |1 |34
4. ई.द.1 |2 |6
5. मीमांसा 1 |2 |1
6. त.सं. पृ 58
7. न्या.कु.स्तबक 5 श्लोक 173
8. ई.द. 1 |2 |11
9. ई.द. 1 |2 |12
10. ई.द. 1 |2 |13
11. ई.द. 1 |2 |14
12. ब्र.सू. 1 |1 |3
13. ई.द. 1 |1 |4
14. ई.द. 2 |1 |6
15. केन.उ. — खण्ड 1/5, श्लोक पृ. क्र. 85
16. बृ.उ. अध्याय 2, ब्राह्मण 4, पृ. क्र. 362
17. ई.द. 2 |1 |24
18. श्री.भ.गी. 15 |7
19. पु.मी.भा. पृ.क्र. 65
20. ई.द. 1 |1 |1
21. ई.द. 2 |1 |24
22. अ.सं. मंगलाचरण
23. अ.सं. 1





24. अ.सं. 2
25. अ.सं. 4
26. अ.सं. 13
27. अ.सं. 20
28. अ.सं. 25, 26
29. अ.सं. 27
30. अ.सं. 33
31. अ.सं. 42
32. अ.सं. 43
33. अ.सं. 60
34. यो.सू. 4 |1
35. यो.सू. 4 |6
36. अ.सं. 63
37. अ.सं. 64
38. अ.सं. 65
39. अ.सं. 66
40. अ.सं. 67
41. अ.सं. 68
42. अ.सं. 69
43. अ.सं. 70
44. ब्र.सू. 1 |1 |3
45. यो.सू. 1 |25
46. यो.सू. 3 |33
47. अ.सं. 95

48. अ.सं. 97
49. अ.सं. 99
50. अ.सं. 111
51. अ.सं. 132
52. अ.सं. 142
53. अ.सं. 158
54. यो.सू. 4 ।1
54अ. छा.उप. अध्याय 4 खंड 1 – जानश्रुती–रैक्व कथा
55. अ.सं. 213
56. अ.सं. 214
57. अ.सं. पृ.क्र. 8
58. अ.सं. 213
59. स.सू. 1
60. स.सू. 2
61. दृष्टवदानुश्रविकः स ह्यविशुद्धिक्षयातिशययुक्तः । (सां.का.2)
62. दृष्टे साऽपार्था चेन्नैकान्त्यात्यन्ततोऽभावात् । (सां.का.2)
63. मु.उ.
64. न स्वभावतो बद्धस्य मोक्षसाधनोपदेशविधिस्तदनपायित्वात् । (स.सू. 8)
65. प्रकृतिनिबन्धनाच्चेन्न तस्यापि पारतन्त्र्यम् । (स.सू. 15)
66. स.सू. पृ. 21
67. दु.त. प्रथम उपदेश 1
68. दु.त. द्वितीय उपदेश 1
69. श्री.भ.गी. 12 ।3
70. दु.त. द्वितीय उपदेश 16



71. दु.त. द्वितीय उपदेश 17
72. त.सं. पृ 148
73. येन जातं ज्ञानं त्यक्तुं न शक्यते स तर्कः । (न्या.सू.1 ।2 पृ. क्र. 42)
74. अपेक्षा द्वेधा भावाऽभावरूपेतिभेदात् । (न्या.सू. 1 ।6 पृ.क्र. 42)
75. न्यायसिद्धान्तमुक्तावली प्रत्यक्ष खण्ड श्लोक क्र. 12, पृ. 18
76. न्या.सू. निगमान्ततर्कलक्षण 24 पृ.क्र. 43
77. गौ.न्या.सू. 1 ।1 ।4
78. गौ.न्या.सू. 1 ।1 ।4 वरील वात्स्यायन भाष्य
79. न्या.सू. निगमान्ततर्कलक्षण 5 पृ.क्र. 42
80. न्या.सू. निगमान्ततर्कलक्षण 6 पृ.क्र. 42
81. न्या.सू. निगमान्ततर्कलक्षण 7 पृ.क्र. 42
82. न्या.सू. निगमान्ततर्कलक्षण 8 पृ.क्र. 42
83. न्या.सू. निगमान्ततर्कलक्षण 9 पृ.क्र. 42
84. न्या.सू. निगमान्ततर्कलक्षण 17 पृ.क्र. 43
85. गौ.न्या.सू. 1 ।1 ।6 वरील वात्स्यायन भाष्य सूत्र
86. न्या.सू. निगमान्ततर्कलक्षण 18 पृ.क्र. 43
87. तत्राद्या, देवदत्तः पीनो न भुङ्क्ते, अतस्तद्रात्रौ भोजनं कल्पनीयम् । ( न्या.सू. निगमान्ततर्कलक्षण 20 पृ.क्र. 43)
88. न्या.सू. निगमान्ततर्कलक्षण 21 पृ.क्र. 43
89. न्या.सू. निगमान्ततर्कलक्षण 22 पृ.क्र. 43
90. तदेतान्निरूपितं येन यन्न परीक्ष्यते, तत्सर्वं हेत्वाभासे प्रक्षिप्तम् । ( न्या. सू. निगमान्ततर्कलक्षण 26 पृ.क्र. 43)
91. न्या.सू. 1 ।2
92. न्या.सू. 1 ।2

93. न्या.सू.वि. पृ.क्र. 43
94. न्या.सू.वि. पृ.क्र. 44
95. न्या.सू.वि. पृ.क्र. 45
96. तत्रैव
97. तत्रैव
98. तत्रैव
99. तत्रैव
100. तत्रैव
101. न्या.सू.वि. पृ.क्र. 46
102. तत्रैव
103. तत्रैव
104. तत्रैव
105. तत्रैव
106. शा.स. श्लोक क्र. 1
107. तत्रैव श्लोक क्र. 2, 3
108. तत्रैव श्लोक क्र. 4
109. तत्रैव श्लोक क्र. 5
110. तत्रैव श्लोक क्र. 14
111. तत्रैव श्लोक क्र. 18
112. तत्रैव श्लोक क्र. 20
113. तत्रैव श्लोक क्र. 21
114. तत्रैव श्लोक क्र. 27
115. कारिकावली (विश्वनाथ) 125
116. शा.स. श्लोक क्र. 35



117. तत्रैव श्लोक क्र. 36
118. तत्रैव श्लोक क्र. 46, 47
119. तत्रैव श्लोक क्र. 49
120. तत्रैव श्लोक क्र. 51
121. तत्रैव श्लोक क्र. 56
122. तत्रैव श्लोक क्र. 57
123. तत्रैव श्लोक क्र. 63
124. महाभारत शांतिपर्व अध्याय 349 श्लोक क्र. 1
125. ब्र.सू. 1 |1 |3
126. यो.सू. 1 |25
127. शा. स. श्लोक क्र. 70
128. ब्र. सू. 2 |1 |11
129. शा. स. श्लोक क्र. 71
130. तत्रैव श्लोक क्र. 78
131. श्री.भ.गी. अ. 13 श्लोक क्र. 24, 25
132. भाग.स्कंध 11 अ. 22 श्लोक क्र. 4
133. भाग. स्कंध 3 अ. 12
134. भाग. स्कंध 10, नरकोपाख्यान
135. यु. शा. श्लोक क्र. 1
136. यु. शा. पृ. क्र. 92
137. तत्रैव
138. तत्रैव
139. तत्रैव
140. तत्रैव

141. यु.शा.पृ.क्र. 93
142. तत्रैव
143. तत्रैव
144. तत्रैव
145. तत्रैव
146. तत्रैव
147. तत्रैव
148. यु.शा.पृ.क्र. 94
149. तत्रैव
150. तत्रैव
151. तत्रैव
152. तत्रैव
153. तत्रैव
154. तत्रैव
155. तत्रैव
156. तत्रैव
157. तत्रैव
158. यु.शा.पृ.क्र. 95
159. तत्रैव
160. श्री. गुलाबराव महाराज विरचित 'ाेडशयष्टी भाग 2 का.पु. श्लोक 12 पृ. क्र. 78
161. तत्रैव श्लोक क्र. 24 पृ. क्र. 79
162. तत्रैव
163. ष.ले. मंगलाचरण पृ.क्र. 97



164. तत्रैव
165. तत्रैव
166. तत्रैव
167. ष.ले. पृष्ठ क्र. 98
169. तत्रैव
170. तत्रैव
171. त.बो. प्रथम प्रकरण पृ. क्र. 99
172. श्री. भ. गी. अध्याय 5 श्लोक क्र. 15
173. तत्रैव अ. 15 श्लोक क्र. 7
174. ब्र. सू. 4 |1 |1
175. श्रीधरकृत मूळ श्लोक क्र. 1 पृ. क्र. 179
176. तत्रैव श्लोक क्र. 2 पृ.क्र. 180
177. तत्रैव श्लोक क्र. 3 पृ.क्र. 183
178. तत्रैव श्लोक क्र. 7 पृ.क्र. 185
179. यो.सू. 1 |15
180. श्रीधरकृत मूळ श्लोक क्र. 8 पृ. क्र. 186
181. ब्र.सू. 3 |1 |22
182. श्रीधरकृत मूळ श्लोक क्र. 10 पृ. क्र. 187
183. यो.सू. 2 |3
184. श्रीधरकृत मूळ श्लोक क्र. 11 पृ. क्र. 189
185. श्रीधरकृत मूळ श्लोक क्र. 13 पृ. क्र. 190
186. श्रीधरकृत मूळ श्लोक क्र. 14 पृ. क्र. 191
187. श्रीधरकृत मूळ श्लोक क्र. 15 पृ. क्र. 192
188. यो. सू. 3 |4

189. श्री.पु. श्लोक क्र. 15 चे व्याख्यान पृ. क्र. 192
190. श्रीधरकृत मूळ श्लोक क्र. 16 पृ. क्र. 195
191. तत्रैव श्लोक क्र. 17, 18 पृ.क्र. 195
192. तत्रैव श्लोक क्र. 21 पृ.क्र. 199
193. श्री. पु. पृ.क्र. 181
194. श्रीधरीय व्याख्या उ.पु.(उच्छिष्टपुष्टिलेशः)श्लोक क्र. 1 पृ.क्र. 164
195. श्रीधरीय व्याख्या उ.पु. श्लोक क्र. 2 पृ.क्र. 168
196. श्रीधरीय व्याख्या उ.पु. श्लोक क्र. 3 पृ.क्र. 169
197. श्रीधरीय व्याख्या उ.पु. श्लोक क्र. 4 पृ.क्र. 197
198. श्रीधरीय व्याख्या उ.पु. श्लोक क्र. 5 पृ.क्र. 198
199. उ.पु. पृ.क्र. 166
200. श्री.भ.गी. 18 |54
201. श्रीधरीय व्याख्या उ.पु. श्लोक क्र. 2 पृ.क्र. 168
202. भागवत द्वितीय स्कंध दशम अध्याय श्लोक क्र. 6
202अ. काव्यप्रकाश उल्लास 7, कारिका 51, पृ.क्र. 268
202ब. कुमारसम्भवम् सर्ग 5, श्लोक 71
203. भागवत द्वितीय स्कंध दशम अध्याय
204. उ.पु. श्लोक क्र. 84, 85, 86 पृ.क्र. 173
205. बा. वा. पृ.क्र. 323
206. बा. वा. मंगलाचरण श्लोक क्र. 1, 2 पृ.क्र. 284
207. वेदान्त वाक्य
208. विवेकचूडामणिः श्लोक क्र. 171
209. श्रुतिवाक्य
210. बा. वा. द्वितीय प्रकरण, पृ. क्र. 286



211. तर्कसंग्रह पृ. क्र. 56
211अ. नीतिशतकम् श्लोक क्र. 92
ब्रह्मा येन कुलालवन्नियमितो ब्रह्माण्डभाण्डोदरे
विष्णुर्येन दशावतारगहने क्षिप्तो महासंकटे |
रुद्रो येन कपालपाणिपुटके भिक्षाटनं कारितः
सूर्यो भ्राम्यति नित्यमेव गगने तस्मै नमः कर्मणे ||
211ब. विवेकचूडामणिः कारिका क्र. 461, भाष्यकार – पी.शंकरनारायण
प्रारब्ध–सिध्यति तदा यदा देहात्मना स्थितिः |
देहात्मभावो नैवेष्टः प्रारब्धं त्यजतामतः ||
शरीरस्यापि प्रारब्धकल्पना भ्रान्तिरेव हि |
212. ब्र.सू. 4 |4 |17
213. बा.वा. द्वितीय प्रकरण, पृ.क्र. 286
214. स्व.नि.श्लोक क्र. 1, 2
215. तत्रैव श्लोक क्र. 3
216. तत्रैव श्लोक क्र. 5
217. तत्रैव श्लोक क्र. 7
218. तत्रैव श्लोक क्र. 16
219. तत्रैव श्लोक क्र. 18
220. तत्रैव श्लोक क्र. 30
221. तत्रैव श्लोक क्र. 33
222. तत्रैव श्लोक क्र. 38
223. तत्रैव श्लोक क्र. 39
224. तत्रैव श्लोक क्र. 44
225. तत्रैव श्लोक क्र. 47

226. तत्रैव श्लोक क्र. 89

227. तत्रैव श्लोक क्र. 109

228. सं.कु. श्लोक क्र. 3

229. वासुदेवः परं ब्रह्म गम्योऽभिगमनादिभिः ।
एतावदेव संग्राह्यं पाञ्चरात्रसुमान्मधु ।। सं.कु. श्लोक क्र.4

230. पशुपार्शाविनिर्मुक्तो नित्यो मंत्रमयः शिवः ।
एतावदेव संग्राह्यं पुष्पात्पाशुपतान्मधु ।। सं.कु. श्लोक क्र. 5

231. सं.कु. श्लोक क्र. 6

232. उमारूपाः स्त्रियः सर्वास्तासु स्यान्मातृधीरतः ।
एतावदेवं संग्राह्यं सच्छाक्तात् कुसुमान्मधु ।। सं.कु. श्लोक क्र. 7

233. स्वतन्त्रो भगवान् विष्णुरन्यत् सर्वं च तन्त्रकम् ।
एतावदेवं संग्राह्यं पूर्णप्रज्ञसुमान्मधु ।। सं.कु. श्लोक क्र. 8

234. सं.कु. श्लोक क्र. 9

235. नैवेद्यदानाद्धरये भक्ततृप्तिर्भवेद्यतः ।
कल्प्या तयोरेकतेति ग्राह्यं नैम्बार्कतो मधु ।। सं.कु. श्लोक क्र. 9

236. सेवनीया सदा राधा श्रीकृष्णपदलब्धये ।
तदात्मत्वादिति ग्राह्यं राधिकावल्लभान्मधु ।। सं.कु. श्लोक क्र. 11

237. वृंदावने सदैवास्ते कृष्णो व्यूहगणाद्वरः ।
माधुर्यगम्यो ग्राह्यं वै चैतन्यकुसुमान्मधु ।। सं.कु. श्लोक क्र. 12

238. मर्यादायुतया पुष्ट्या वात्सल्याद् बालरूपधृक् ।
कृष्णः सेव्य इति ग्राह्यं वाल्लभात्कुसुमान्मधु ।। सं.कु. श्लोक क्र. 13

239. विघ्नहर्ता गणेशो नो नित्यं निश्चिन्ततां व्रजेत् ।
एतावदेवाकृष्टव्यं गाणपत्यसुमान्मधु ।। सं.कु. श्लोक क्र. 14

240. आदित्ये पुरुषः सोऽसावहमित्यवधारयेत् ।
एतावदेव संग्राह्यं पुष्पात्सौरागमान्मधु ।। सं.कु. श्लोक क्र. 15



241. सं.कु. श्लोक क्र. 16

242. ब्रह्मैकं निर्गुणं ध्यायेत्प्रमादरहितो गुरुम् ।
सेवेत चेति संग्राह्यं रामानन्दादितो मधु ।। सं.कु. श्लोक क्र. 17

243. न स्वधाम्नि गतः कृष्णो भीमातीरे समागतः ।
एतावदेव संग्राह्यं वैठ्ठलात् कुसुमान्मधु ।। सं.कु. श्लोक क्र. 18

244. सं.कु. श्लोक क्र. 19

245. सं.कु. श्लोक क्र. 20

246. शा.स. श्लोक क्र. 15 पृ. क्र. 80

247. श्री. गुलाबराव महाराज विरचित यष्टी 7, पृ. 148

248. स. नि. सन्निर्णयः – श्लोक क्र. 1 पृ. क्र. 129

249. तत्रैव श्लोक क्र. 27 पृ. क्र. 130

250. स. नि. चिनिर्ण्णयः – श्लोक क्र. 3 पृ. क्र. 131

251. स. नि. चिनिर्ण्णयः – श्लोक क्र. 8 पृ. क्र. 132

252. बृ.उ. अध्याय 2, ब्राह्मण 4, पृ. क्र. 362

————————————

